A. R. No. 169

२८ मोहरम ११९६ हिजरी
९ जानेवारी १७८२

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता छ (२४) माहे मोहरम मु।। का।। पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेषे येथील वर्तमान छ २१ माहे मजकूर रोज रविवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल तद-नंतर येथील वर्तमान तिसरे प्रहरी राजेश्री नाना हरिपंताचे डेन्यास गेले होते. हरिपंताचा व नानाचा खिलवत जाला. उपरांतिक नाना आपले घरास आले. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की गायेकवाड याची एकमती जाली. त्याची काहीयेक खर्चाविसाची सोये करून वाटेस लावावे. दुसरे, कृष्णरावजीकडे पत्रें लिहिणार व येजमानसाहेबांसही आर्जियां लिहिणार या अर्थी खिलवत जाला. शृत होये गायेकवाडाची एकरती गुजरात प्रांती जाली हे वर्तमान पूर्वी येकदोन विनंतीपत्री लेखण केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. गायेकवाड मजकूर याजवल दोन हजार फौज जमली होती. येथून कूच करून गेल्यावर गंगेपावेतो दाहाबारा हजार फौज जमा व्हावी यैसा नेम आहे. त्यास गायेकवाड मजकूर याणी आत कोसाचे कूच केले. लोकास खर्चाविशाची सोये नाही म्हणून फौजे लोक तळावरच राहिले. सातसे आठसे लोक त्याचेसमागमे मात्र मुकामापावेतो गेले. बाकी लोक तळावरच राहिले कारण की लोकाचे पैक्याची सोये नाही. पैक्याची सोये जाल्यास गोविंद-राव गायेकवाडापासी फौज जमेल यैसे आहे येविशी गायेकवाडां-कडील कारभारी नानासी व हरिपंतासी रदबदली करितात की खर्चा-ची सोये केल्यास आमचे जाणे होईल. नाहीतरी कलतच आहे. अशानसी सरकारातून लाख पाऊन लाख रुपये देतील. परंतु प्रस्तुत

थोडे तऱ्ही दाहापंधरा लक्ष रुपये पाहिजेत तेव्हां गायेकवाड मजकूर याचे फौजेची मचरणी होईल तेव्हां कोंडाईबारीपावेतो हे पोहचतील यैसे आहे. प्रस्तुन गायेकवाडाची रवाणगी जाली आहे. येथून दोनतीन कोसावर हजारा रावतानसी मुकाम करून आहेत. सोये जाल्यास पुढे कोडाईबारीकडे जातील. नाहीतरी त्याचा गात्र दावडी आहे तेथे जाऊन मुकाम करतील. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. विदित होये. छ २२ माहे मजकूर रोज सोमवार. करनेल गाडर इंग्रज तो ममईस आहे. पांचच्यार पलटने कल्यानी व विठल-वाडी वगैरेवर आहेत. प्रस्नुत वर्तमान आहे की विटलवाडीहून दोन पलटने तीन कोस पुढे बदलापुरावर आली. पुढे ते घाटाकडे येतात किंवा कोणीकडे जानात हे पाहावे. परंतु वदंता आहे की दोन पल-टने पुढे आली याआर्थी पाणसे वगैरे येथून साहासातां कोसावर आहेत तेही बोरघाटाकडे जाणार आणि काही किरकोल पतके येथून रवाणां करणार. दुसरे, हरिपंतही तळ ढाळून नदीपार संगमावर मुकाम करणार यैसे आहे. मागती इंग्रजाकडील वर्तमान आलियां लेखण केले जाईल शृत होये. गणेशपंत बेहरे वगैरे पांचच्यार हजार फौजे-नसी कोंडाईबारीवर आहेत व इंग्रजाची पलटने व फतेसिंग गायेक-वाडाकडील हजार दोन हजार स्वार व सटोजी भोसले व बाजीराव बर्वे वगैरे फौज सोनगडास आहे ते पुढे चाल करून कोंडाईबारीकडे येनार. त्याजवरून येथून काही किरकोल पतकेही गनेशपंताकडे रवाना करितात व गोविंदराव गायेकवाडाचीही रवाणगी जाली आहे. परंतु याचे जाणे दीर्घसूत्रावर आहे. सोनगडावर पलटने आहेत ते पुढे चाल करून येणार यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये छ २३ माहे मजकूर रोज मंगळवार. राजश्री हरिपत गारपीरावर पुण्याबाहेर मुकाम करून होते तेथून तळ ढाळून पुण्याचे नदीपार संगमावर मुकाम करून राहिले. रुग्त तळेगावचां दिल्हा आहे. तळ ढाळावयाचे कारण कीं त्याच जागें-वर मुकाम फार जाले. दुसरे, इंग्रजाचेही वर्तमान आहे की दोन पलटने बदलापुरावर आली. त्याजवर शह पडावां या अर्थी हरिपंत

तळ ढाळून संगमावर आले. पाव कोसाचे कूच केले. उगाच तळ ढाललां. प्रस्तुत हरिपंत पुण्याबाहेर संगमावर मुकाम करून आहेत. हरिपंताजवळ फौज दोनतीन हजार कसर कम आहे. रास्तियाची फौज दोनअडीच हजार येथून पांचच्यार कोसावर आहे. शृत होये. प्रस्तुत इंग्रज घाटाकडे येऊन उपद्रव करितात यैसा प्रकार नाही. कारण कीं मुलखगिरीचे दिवस थोडके. यां अर्थी ते उद्योग करून येणार नाहीत. परंतु आवयां मात्र आहेत. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. नाना फडनीस घाडगे म्हणोन सरदार आहेत त्याचे येथे बहुमानास गेले होते. घटकाभर बसून मागती आपल्या वाड्यास आले. विदित होये. राजेश्री भवाणी सिवराम याची रवाणगी हिंदुस्थाण प्रांती सिंद्याकडे करावी यैसा निश्चये आहे. दुसरा निश्चये आहे की गुजरात प्रांती कोंडाईबारीकडे पाठवावे, यैसे दोन निश्चये आहेत. हिंदुस्थाण प्रांती पाठवितील तरी मानबर फौजेची सचणी करून दिल्ह्यास जातील. परतु दोनतीन हजार फौज देऊन भवाणी सिवरामास कोंडाईबारीकडे पाठवितील. मग काये निश्चये करून कोन्हीकडे त्याची रवाणगी करितील हे लेखण केले जाईल. शृत होये. छ २४ माहे मजकूर रोज बुधवार. सिद हिंदुस्थाण प्रांती आहेत. तिकडील राजेरजवाडे त्यास मिलाले आहेत. त्या प्रांताचा बंदोबस्त करितात यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री रंगराव वोढेकर पाचच्यारसे रावतानसी आज येथे आले. हरिपंताचे जवल येऊन उतरले आहेत. विदित होये. होलकराचे मुलाचे लग्न माघ मासी आहे म्हणोन होलकर मजकूर वाफगावास मुकाम करून आहेत. शृत होये. हैदर नायेकाकडील वकील कारभाऱ्याकडे आले होते. कारभाऱ्यासी व वकीलासी खिलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की नाईक मजकुरास पत्रे लिहिणार. शृत होये. कासीच्या राज्याकडील वकील येथे येतो. खानदेशात आला. त्यास समाधान वाटत नवते म्हणोन त्यास आणावयास येथून कारकून पाठविला होता हे पूर्वी लेखण केले होते. त्यास वकील मजकूर राज्याकडील आज येथे आले. पुढे वकीलासी व कारभाऱ्यासी

भेट होऊन काये जे वर्तमान असेल हे ध्यानास आणून लेखण केले जाईल. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 170**

२७ मोहरम ११९६ हिजरी
१२ जानेवारी १७८२

पैा छ ८ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे.

श्रीनिवास

अखबार पुणें अज ल्ला छ २५ मोहरम लगायत छ २७ माहे मार दोन प्रहर दिवस सन ११९६ हिजरी.

मुंबईकर जनरालाचे तरफेनें वकील मौजे खोंपवलीस घांटाखालें आला म्हणोन वर्तमान आलें. रास्ते व प्रतिनिधि वगैरेची फौज तळेगांवांचे रुखें गेली व हरिपतानी गारपीरापासून हरकत करून मुळा व मुठा नदीचे संगमासमीप जाऊन उतरले व चेतसिंग कासीकर जमीदाराचा वकील येरंडोळासमीप होता तो पुण्यास आला याव्यतिरिक्त अन्यत्र वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान दफेवार लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल.

मुंबईकर इंगरेजाकडील वकील पुण्यास येणार त्याचे बातमीकरितां सेवकाकडील तैनाती हरकारे गेले आहेत त्यापैकीं काल छ २६ माहे मारी हरकारे खबर घेऊन आले. त्यांचे जुबानीची खबर इंगरेजांकडील वकील मौजे खोंपवलीस च्यारपांचसे स्वार व अवांतर माणसे पांचसें येकून हजार जमियेतसुधां आला घांटतोडी दोन तीनसे प्यादे पंतप्रधानाकडील चौकीस आहेत त्यानीं अटकाव केला की बालाजीपंत फडनीसांची परवानगी येईल त्याप्रमाणें जमीयत

हमराह घेऊन येणे. त्यावरून मुंबईकर वकीलासमागमें बालाजी-पंताकडील वकील आहे त्याचें पत्र पंत मारनुलेस आलें कीं मुंबईकर वकीलानी कितेक जमीयतेनसीं घांटावर व पुण्यास यावें त्यांचे प्रत्योत्तर गेले कीं दोनसे लोकानसीं यावें. त्याप्रमाणें छ २५ माहे मारी मौजे खंडाळ्यास घांटावर इंगरेजाकडील वकील आला. छ २६ माहे मारीं मौजे वडगांव, तळेगावीहून दोन कोस, पुढें पुण्याहून बारा कोस ते स्थळीं वकीलाचा मुकाम जाहला. आजी छ मारीं मौजे चिंचवडासमीप येणार म्हणोन यैकिलें. वडगांवासमीप गंगाधरराव रास्ते व प्रतिनिधि व होळकराकडील मिळोन तीन हजार फौज आहे. याचप्रमाणें तीनच्यार कोसाचे फासल्याने पुण्यापर्यंत हजार दोन हजार फौजेचे सरदार ठेविले आहेत. राजश्री हरीपंतासमीप च्यार हजारपर्यंत लाहान मोटीं घोडी व मुसा नारंज व मुसा मोतरम वगैरे फरासीस हजारबारासे बार व पनाससाठपर्यंत गोरेमुधां लष्करांत आहेत. बाणाच्या कैच्या पंचेवीस व तोफा पंधरा जरब यावितरिक्त जगी सरंजामासुधां जलसी लष्कर उतरविलें आहे. डेरे दांडे दुचंद सरंजाम उभा केला आहे.

२

पुरवणी अखबार छ २७ मोहरम सन ११९६ हिजरी.

मुंबईकर वकीलाचें नांवें करनल इप्टन* म्हणोन यैकिलें. पुन्हां तहकीक करून लिहून पाठऊं. वकीलासमागमे सरंजाम दोनसे बारचे जवान व पचेंवीस तुरक स्वार व साहा पालखीनिसीन इंगरेज व दोन हाथी, पैकी येकावर हौदा व येक खेमे वगैरे बारबरदारीचा व शागिर्दपेशा व कामाठी वगैरे दोनसे माणसें येणंप्रमाणे सरंजाम आहे म्हणून यैकिलें.

छ २९ माहे मार माघ शुध प्रतिपदेस मुंबईकर इंगरेजाकडील

*हा मुंबईकडचा वकील म्हणजे कर्नल वाटर्सन. अखबारनवीसानी याच्या नांवाचा नाहेवाईक अपभ्रंश केलेला आहे. पुढील अखबारांतून याच्या नावाचे 'इप्टन' 'ईप्टन' 'उदेष्टण' इत्यादी प्रकार आढळतात.

वकील पुण्यास येणार व छ मारींच येथील कारपरदाजांची भेट घेणार म्हणोन यैकिलें आहे.

वकीलास पुण्यापर्यंत आणावयाकरितां येथील कारभाऱ्यांचे सूचनेनुरूप आजी छ मारीं राजश्री माधवराव सदासिव पुण्याहून चिंचवडास गेले. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

पौा छ ४ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे.

श्रीनिवास

विनंती जे वोढेकर खंडेराव त्र्यंबक पांचसे स्वारानसी छ २४ माहे मारी पुण्यास आले. छ २९ माहे मारीं पंतप्रधान व कार भाऱ्याची भेट घेणार हे विनती.

पौा छ ४ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे.

---

**A. R. No. 171** २७ मोहरम ११९६ हिजरी
१२ जानेवारी १७८२

पौा छ ४ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे.

श्री

विनती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ २७ माहे मोहरम मुाा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २५ माहे मजकूर रोज गुरुवारी प्रातःकाली विनतीपत्र सरकारचे डांके-समागमे सेवेसी प्राा केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल तदनंतर येथील वर्तमान इग्रजाची पलटणे दोनतीन आली व पुढे ते बोरघाटाकडे येणार यैसे वर्तमान होते त्याजवरून सेवेसी लेखन केले होते. दों प्रहरा येथे वर्तमान आले कीं इंग्रजाकडील वकोल येथे येतो. त्याजवरून याणीहीं येथून जासूदजोड्या वगैरे बोरघाटाकडे पाठविले कीं कितीक जमावनसी येतो यैसी बातमी

येऊन येणे. संध्याकाली मागती वर्तमान आले की वकील मजकूर बोरघाट चढून खंडाल्यावर मुकामास आला. वकीलासमागमे दोनसे तुरक स्वार व हजारयेक मनुष्य होते. या जमावनसी येत होते. श्रीमंताकडील फौजा व माणसे घाटावर होती. त्यानी वकीलास मागून पाठविले कीं इतक्या जमावनसी यावे यैसी आज्ञा नाही. तीन च्यारसे मनुष्यानसी वरते यावे यैसी आज्ञा आहे. त्याजवरून इंग्रजाकडील वकील तीनच्यारसे मनुष्ये व तीसचालीस तुरक स्वार व दोन हाती या जमावनसी घाट चढून खंडाल्यास मुकामास आले. येथून दोनसे स्वार व येक कारकून वकीलास आणावयास गेले. उदईक वकीलाचा मुकाम तळेगांवापुढे दोन कोस वडगांवास आहे. येथून वडगाव दाहाआकरा कोस आहे. वकील मजकूर ममईवाल्याकडून येतो. पूर्वीही येकदोन पत्रे ममईवाल्याकडून येथे या मधानाची आली होती. त्याजवरून यांचेही उतरे गेली की वकील जावसालास येक यावा. त्याजवरून ममईवाल्यानी वकीलाची रवानगी करून पाठविला. वकील मजकूर येथून दाहाअकरा कोसावर आले घाटाखाली साहासाता कोसावर बदलापुरास त्यांची दोनतीन पलटणे आहेत. वकील मजकूर येथे येका दो दिवसानी दाखल होणार. वकील मजकूर येथें यावयाचे कारण कीं ममईवाल्याचे चित्तान की कोणेही प्रकारे दारमदार होऊन सलुक व्हावा, वमई वगैरे स्थले याची यांस घावी व दादासाहेबाचाही येखादा दारमदार करावा दुसरे. ममई वगैरे बंदराचे माल बंद पडले आहेत त्याची मोकळीक व्हावी दारमदार होऊन सलुक व्हावा याअन्वये वकील इंग्रजाकडील येथे येतात. येका दो दिवसानी येथे येऊन दाखल होणार. दाखल होऊन कारभारियाच्या व वकीलाच्या भेटी होऊन काये ज वर्तमान ध्यानास येईल तें सेवेसी लेखन केले जाईल. वकीलाच्या भेटी बाहेरच व्हाव्या म्हणोन नानानीही आपला डेरा हरीपंताच्या लस्करात उभा केला. भेटी बाहेर डेन्यासच होणार. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैरे कामकाज जाले. विदित होये. छ २६ रोज शुक्रवार, संक्रमणाचा दिवस म्हणोन श्रीमंतानी व कारभारियाणी

दरबार वगैरे केला होता. तमाम मुछदी व कारभारी व सरदार व सिलेदार वगैरे लोकानी श्रीमंतास तील दिल्हे. या प्रो तीलाचा समारंभ जाला. श्रुत होये. इंग्रजाकडील वकील घाट चढून खंडाल्याग होते. तेथून कूच करून वडगावास आलेत येका दो दिवसा येथे येऊन दाखल होणार. वकीलास आणावयास उदईक राजश्री माधवराव सदासिव जाणार. वकीलासमागमे दोनसे गाडदी व सातआठ गोरे पालखीनसीन व दोनसे मनुष्य शागीर्दपेशा वगैरे व दोन हाती व तीस च्यालीसेक तुरक स्वार इतका जमाव आहे म्हणोन वर्तमान आहे. सोमवारी वकीलाच्या भेटी होणार. वकील मजकूर येथे आल्यावर भेटी होऊन वर्तमान लेखन केले जाईल. वकील मजकूर येथे येतात म्हणोन हरीपंत वगैरे आपले फौजेची खबरदारी करितात व तोफा वगैरे लस्करात नेऊन ठेवल्या. जागा जागा लोक होते त्यासही जवल आणविले. घाटाचे बंदोबस्तास प्रतिनिधिकडील व रास्त्याकडील व पानशाकडील वगैरे पांच्यार हजार फौज आहे ते घाटाच्याच रखवालीस आहे. श्रुत होये. कासीचे राज्याकडील वकील येथे आला हे पूर्वी विनतीपत्री लेखन केले त्याजवरून ध्यानास आले असेल. वकीलाची भेट उदईक शनवारी होणार. राज्याकडील वकील येथे यावयाचे कारण यैकिल्यांत आले कीं कासीचा राजा सिंद्याम येऊन भेटला. त्यानी सिंद्यासी पैगाम केला कीं वीस लक्ष रुपये घ्यावे व इंग्रजाचे पारपत्य करून कासीचे ठाणे आमचे आम्हांस इंग्रजापासून घेऊन द्यावे. प्रस्तुत इंग्रजासी व सिंद्यासी दारमदार जाला आहे. त्यासी हे गोष्ट कैसी घडते ? सिंद्यानी राज्याचे मनोगत धरून राज्यासी जाबसाल केला की पाऊण क्रोड रुपये दिल्हयास तुमचे साहित्य आम्ही करूं. हे राज्यास मान्ये न होता येथे वकील पाठविला की वीस लक्ष रुपये घेऊन आमचे साहित्य करून फौजेची नेमणूक करून पाठवावी. प्रस्तुत राज्याकडील वकील येथे आला आहे. कारभारी याच्या भेटी होऊन काये जे ठरल ते पाहावे. भवानी सिवराम याची रवानगी हिंदुस्थान प्रांती करावी यैसी यौजना आहे. मग राज्याच्या साहित्यास त्याची रवानगी करितात किंवा काये निश्चये करितात हे

मागाहून लेखन केले जाईल. परंतु कासीचे राज्याचे वकीलासमागमे वीस लक्ष रोयाच्या हुंड्या आहेत म्हणौन वदता आहे. श्रुत होये. सिंद्याचे वर्तमान आहे कीं कालपीस आहे. तिकडील राजे वगैर त्यास भेटले. तिकडील मुलकाचा बंदोबस्त करितात यैसे वर्तमान आहे. शृत होये. छ २७ रोज शनवार इंग्रजाचे वकीलाचा मुकाम चिचवडचा आहे. त्यास अनावयास माधवराव सदासिव जातात. सोमवारी वकीलाच्या भेटी होनार. शृत होये. राजश्री नाना हरिपंताचे डेऱ्यास गेले आहेत. खलवत वगैर होऊन मागती घरास येनार. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 172**

२९ मोहरम ११९६ हिजरी
१८ जानेवारी १७८२

पैा छ ६ सफर सन ११९६ हिजरी इंदुवासर सांइकाल मये दारोगे हरकारे.

श्रीनिवास १४८

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ताा छ २९ मोहरम माघ शुध प्रतिपदा इंदुवासरपर्यंत मो पुणे स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष यापूर्वी छ २७ माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी डाकेवर पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल त्यानतर छ मारीं मुबईकर इगरेजांकडील वकील दीष्टण पुण्याहून अद कोस बागांत येऊन उतरला व बालाजीपंतांचे डेऱ्यास येऊन भेट घेतली याचा तपसील अखबारच बंदांत लिहिला आहे त्यावरून सेवेसी व हुजूर श्रुत होईल. हुजूर अर्जी व अखबार पाठविली तें व स्वामीचे

सेवेसी पत्र दारोग्याचे विद्यमानें पावले. इंगरेजांचे भेटीचे समारंभात सर्वत्रास कारपरदाजानीं बोलाविलें होतें. सेवकासही येणे म्हणोन चोपदार आला होता. सेवकाची प्रकृती स्वस्थत नव्हती याकरितां चिरजीव केशवराव यांस पाठविलें होतें. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ ६ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे इंदुवारी साइंकाळी.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २८ मोहरम लगायत छ २९ माहे मार सन ११९६ हिजरी माघ मास सोमवार.

मुंबईकर इंगरेजांचे तरफेचा वकील वडगांवास आला व छ २८ तारखेस चिंचवडास येणार व येथील कारपरदाजानीं माधवराव सदासिव यांस छ २७ माहे मारी वकील माराकडे रवाना केले म्हणोन अखबार हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्र लिहून डांकेवर रवाना केलें ते पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दर्फेवार लिहिलें आहे.

छ २७ माहे मारीं वडगांवीहून चिंचवडचे मुकामास मुंबई-कराचा वकील दीष्टंन येणार याकरितां येथील कारपरदाजानीं माधवराव सदासिव यांस रवाना केले. मारनुले पुण्याहून तीन कोस मौजे आंउदपर्यंत गेले. तेथें वर्तमान यैकिलें कीं रास्ते व होळकरां-कडील सरदारानीं वकीलास कूच करून जाण्याविषई मना केलें की बाळाजीपंताकडील परवानगी आणविली आहे, आल्यानंतर जाणें. दोन प्रहर दिवसानंतर बाळाजीपंताकडील सुतरस्वार जाऊन पोंह-चला. त्यानंतर वडगावीहून कूच करून जाण्याविषई परवानगी दिधली. परंतु वकील मारानीं मुकाम केला. याप्रकारें वर्तमान यैकिल्यानंतर माधवराव सदासिव माघारा पुण्यांस आले.

छ २८ माहे मारीं दीष्टन, मुंबईकरांचा वकील, वडगावीहून कूच करून मौजे आंउंद येथें मुळा नदीचे कांठीं पुण्याहून तीन कोसी येऊन मुकाम केला. बालाजीपंताचे तरफेचा वकील हरीपंत नामे दीष्टणासमागमें आहे. त्यास बालाजीपंतानी सांगोन पाठविलें की उदईक माधवराव सदासिव दीष्टण वकीलाकडे येतील. त्यानंतर वकील मारास भेटीस घेऊन येणें.

छ २९ माहे मारीं चवदा घटका दिवसानंतर माधवराव सदासिव दीष्टण वकीलाचे डेऱ्यास मौजे आउंद येथें गेले. समागमें हाती अंबारीसहित व शंभर बारचे जवान कारपरदाजानी दिल्हे. त्यानंतर बालाजीपंत फडनीस आपले हवेलीहून स्वार होऊन हरीपंताचे लश्करांत डेरे दिधले होते तेथें गेले. लक्ष्मणराव रास्ते व कृष्णराव बळवंत वगैरे लाहान मोठे तमाम सरदार व नूरमाखान व नरसिंगराव व मुधोजी भोंसल्याकडील वकील व सेवकासहीं बालाजीपंतानी बोलाविलें होते त्याप्रमाणें सर्वत्र समाज डेऱ्यांत हाजर होता. बख्तरपोष वगैरे शंभर आमामी डेऱ्यांत बसविले होते व लश्करापासून येक कोसपर्यंत

---

पै।। छ ६ सफर सन ११९६ हिजरी इंदुवार सांझकाल मये दारोगे.

२

पुरवणी आग्ववार छ २९ मोहरम सन ११९६ हिजरी

दुरस्ता स्वार उभे केले होते. त्याउपरी च्यार घटका दिवस बाकी राहिला त्यासमई दीष्टण वगैरे पांच असामी इंगरेज पालखीनिसीन व दीडसे बारचे ज्वान व पताम स्वार कंदारी तुरक स्वार बालाजीपंताचे डेऱ्यास आले व पांच आसामी व शागिदपेश्याचे लोक मानआठ येणेंप्रमाणें डेऱ्यांत येऊन माधवराव सदासिवाचे विद्यमानें वीस असामीस भेटले. त्याउपरी हरीपंत व बालाजीपंत उभयतां

भेटले. पाव घटका डेऱ्यांत बसले. त्यानंतर बालाजीपंत व हरीपंत खिलवतेचे डेऱ्यांत गेले. माधवराव सदासिव व दीष्टण वगैरे वकील व पंतप्रधानाकडील मातबर सरदार व मातबर मुतसदी व उमद्याकडील वकील बमोजिब तलब खिलवतेचे डेऱ्यांत गेले. दोन घटकापर्यंत निशस्त जाहली. दीष्टण मा।र फारसीख्वान व फारसीगो आहे व दुभासी सेणवी आहे. कारपरदाजाचे तरफेनं माधवराव सदासिव फारसी जुबानें करून कुशल वर्तमान व मुंबईहून निघोन किती दिवस जाहले व गाडर व जनरालाचें वर्तमान विचारिलें. दिष्टणानें फारसीनें उतर केलें. त्याउपरी अतरपानदान देऊन दिष्टण वगैरेस रुखसत केलें. ते समई तुरक स्वारांपैकीं तीन आसामी मातबर होते त्यांस डेऱ्यांत बोलाऊन बालाजीपंताकडून विडे देविले. तुरक स्वारानी नजर धरली होती ते बालाजीपंतानीं कबूल केली नांहीं. त्यानंतर दीष्टण मा।र स्वार होऊन अद कोसचे फासल्यानें बागांत डेरे देविले तेथें जाऊन उतरले. वकील मा।र बालाजीपंताचे डेऱ्यांत आले ते समई पांचा इस्मानी टोप्या काहडल्या होत्या. ते रुखसत घेऊन डेऱ्याबाहेर गेले ते समई टोप्या घातल्या. कारपरदाजानी खुष्क व तर मेवेजात व मिठाई वकीलाचे डेऱ्यास पाठऊन दिधली. हरीपंताचे लश्कराचे आघाडीपासून बाणअंदाज दीष्टण वकील उतरला आहे व लश्करचे आघाडीस तोपखाना व मुसा नारज व मुसा मोनरम हजारबारासे बारचे जवानासहित उतरले आहेत. बालाजीपंतानी तमाम लोकांस रुखसत करून च्यार घटका रात्रीस आपले हवेलीस आले.

कासीकर चेतसिंग जमीदाराचा वकील नारोपंत नामे छ मा।री बालाजीपंतास भेटला जमीदार मा।राकडून पारचे वगैरे जिनस पंतप्रधानाकरिता आणिले आहे तें बालाजीपंतास दाखविले व पंत मा।रास वस्त्रें जमीदार मा।राकडील दिधलीं. शालजोडी व चिरा व बंगा—

---

३

पुरवणी आखबार छ २९ मोहरम सन ११९६ हिजरी.

ली ज्यामेवार सफेद दोन थानें व कासीचा दुपटा बादली व पितांबर नेसावयाचे दोन बालाजीपंतास दिधले व याचप्रमाणें पंत-प्रधानाकरितां वस्त्रें आणलीं आहेंत. जवाहरपैकीं कंठी मोत्याची आहे. श्रीमंतांचे समक्ष भेटीनंतर वस्त्रें व जवाहर वकील देईल.

मुंबईकर वकीलासमागमें तुरक स्वार पंचवीसतीसपर्यंत आहेत म्हणोन हरकाऱ्याचे जुबानी यैकिल्या प्रा पूर्वी लिहिलें होतें प्रस्तुत तहकीक करितां पनास स्वार व दाहाबारा याबू व वकील वगैरे इंगरेजांची दाहा घोडीं व उंट वीस व हाती दोन व दोनसें बारचे जवान व दोनअडीचसें माणसें येणेप्रमाणें सरजाम आहे. याउपरी जें आमलांत येईल त्याची सूचना सेवेसी लिहोन हे विनती.

पौा छ ६ सफर सन ११९६ हिजरी मये दारोगे हरकारे इंदुवारी साइंकाळ.

---

**A. R. No. 173**

३० मोहरम ११९६ हिजरी
१५ जानेवारी १७८२

पौा छ ६ माहे सफर सन ११९६ हिजरी रोज इदुवासर साइं-काल मये दारोगे हरकारे.

श्री ११२

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ ३० माहे मोहरम पाा काा पुणं स्वामीचे कृपावलोकणेकरून स्वांनंद लेखण आज्ञा करीत

असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २७ माहे मजकूर रोज शणंवारी संध्याकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. इंग्रजाकडील वकील आले. सोमवारी कारभाऱ्याच्या व त्याच्या भेटी होणार. त्यास आणावयास पेशवा राजश्री माधोराव (सदा)सिव गेले हे वर्तमान सविस्तर विनंतीपत्री लेखण केले होते त्याजवरून शृत जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान इंग्रजाकडील वकील इंग्रज पांचसाहा आसाम्या आहेत त्याची नावनवेसी व त्याजबरोबर सरंजाम वगैर आहे त्याची याद अलाहिदां करून पाठविली आहे त्याजवरून ध्याणास येईल. छ २९ माहे मजकुरी वकीलाच्या भेटी होनार. वकीलासमागमे दुभाशा हरबा नामे म्हणोन आहे. वकीलाच्या भेटीकरितां राजश्री नानानी डेरे हरीपंताचे लस्करात दिल्हे. डेऱ्यातच त्यांची भेट होणार. विदित होये. छ २८ माहे मजकूर रोज रविवार. इंग्रजाकडील वकील याणी वडगावीहून कूच्य केले ते अवंधास येथून दो अडचा कोसावर मुकाम केला. उदईक पुण्याजवल येणार. कारभाऱ्याच्या व वकीलाच्या भेटी होनार. शृत होये. कासीच्या राज्याकडील वकील आले आहेत. त्याजकडील वर्तमान सविस्तर विनंतीपत्री लेखण केले होते त्याजवरून ध्याणास आले असेल. उदईक सोमवारी त्याची व कारभाऱ्याची भेटी होणार. भेटीनंतर त्याजकडील काये जे वर्तमान ध्याणास येईल ते लेखण केले जाईल शृत होये. दरबार वगैरे जाला होता. विदित होये. छ २९ माहे मजकूर रोज सोमवार. इग्रजाकडील वकील येथून दो कोसावर होते त्यास आणावयास प्रातःथकालीच माधोराव सदासिव गेले. दर्कोल मजकूर दो प्रहरां हरीपंताच्या लस्करांजवल पाव कोसाचे तफावतीने उभे होते. दो प्रहरानंतर नाना फडनीस डेऱ्यास गेले वकीलाच्या भेटी होनात म्हणोन तमाम सरदार व सिलेदार वगैरे बोलाऊन जमाव केला. जमाव करून डेऱ्यांत बसले होते. फौज वगैरे तयार करून डेऱ्याबाहेर दुरस्ता उभी केली होती. इंग्रजाकडील वकील इंग्रज पांच आसाम्या तिसरे प्रहरी नानाचे डेऱ्यास आले. नाना व हरिपंत वगैरे

डेऱ्यात बसले होते. इंग्रजाकडील वकील डेऱ्यास आले. नाना व हरिपंत वगैरे याच्या व इंग्रजाचे वकीलांच्या डेऱ्यात भेटी जाल्या. इंग्रजाकडील वकील डेऱ्यास येता कारभाऱ्यास पाहून टोप्या काढून उभे राहिले. उपरांतिक बसले. दोन घटका बसून पान अतर वगैरे समारंभ जाला. उपरांतिक वकील मजकूर पालख्यात बसून आपले बिऱ्हाडास गेले. वकीलास उतरावयास जागा हरीपंताचे लस्करापासून पाव कोसावर बाग आहे त्या बागात उतरावयास जागा दिल्ही. त्या बागांत खपरल आहे त्यात वकील राहिले. बाकी लोक वगैरे डेरे राहुटियां देऊन राहिले. प्रस्तुत इंग्रजाकडील वकीलांच्या भेटी जाल्यां. पुढे येका दो दिवसानी त्याचे खिलवत होणार. खिलवत होऊन काये जे वर्तमान ध्याणास येईल ते लेखण केले जाईल. इंग्रजाचे वकीलाचे भेटीचे समई हैदर नायेकाकडीलही वकील बोलाऊन नेले होते. इंग्रजाकडील वकील आले व भेटी वगैरे जाल्यां हे वर्तमान कारभारी हैदर नायेकास लिहिणार व त्याजकडील वकीलही लिहिणार. पत्रे लेहून येका दो दिवसानी कासदजोडी नाईक मजकुराकडे रवाणा होनार. वदंता आहे की तिकडे नाईक मजकुरासी व इंग्रजासी दारमदार लागला आहे. शृत होये. कासीच्या राज्याकडील वकील येथे आले त्याची भेट आज होणार होती ते राहित जाली. कारण कीं आज इंग्रजाचे वकीलाची भेट जाली म्हणोन त्या कासीच्या राज्याचे वकीलाची भेट जाली नाही. येका दो रोजानी कासीच्या राज्याचे वकीलाची भेट होनार शृत होये. इंग्रजाच्या वकीलाच्या भेटी वगैरे डेऱ्यापास जाले. कुल वकील मजकूर आपल्या बिऱ्हाडास गेले. उपरांतिक नाना डेऱ्याहून आपले घरास आले. शृत होये सक्रमणाचे तील शर्करायुक्त छ २७ माहे मजकुरी विनतीपत्र सेवेसी रवाना डांकेसमागमे केले. लाखोटियांत तिलाच्या पिसळ्या घालून पाठविल्यात त्या पावतील. पावलीचे उतर सादर जाले पाहिजे. शृत होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती

———

**A. R. No. 174**

३ सफर ११९६ हिजरी
१८ जानेवारी १७८२

पैा छ १० माहे सफर संन ११९६ हिजरी रोज शुक्रवार चार घटका दिवस राहता डांकेवर मै दारोगा. बंद चार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ताा छ ३ सेफर माघ शुध पंचमी भृगुवासरपर्यंत वास्तव्य पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे.

विशेष पूर्वी छ ३० सफरी* हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन वर्तमान हुजूर व स्वामीस श्रुत जाहलें असेल. त्यानंतर कृपापत्र छ २३ मोहरमचें पाठविले तें चिरजीवांचे लिफाफ्यासहित छ २ माहे सफर गुरुवारीं पाऊन संतोष जाहला. सांप्रत येथील अखबार हुजूर व स्वामीचे सेवेसी पृथक पत्रीं लिहून डांकेवर पत्रें रवाना केलीं आहेत. दारोग्याचे विद्यमानें पावतील. चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांस पत्र पाठविलें आहे, स्वामी देतील. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

२

†पुरवणी अखबार छ ३ सफर सन ११९६ हिजरी.

बज्याबा पुरंदरे यास कैदेतून सोडणार याचा माार पूर्वी लिहिला आहे. सांप्रत यैकिलें कीं पुरंदरे मारानीं अडीच लाख रुपये देऊन सासवडीं स्नानसंध्या करून राहावें. धोंडो आपा पुरंदरे जामीन जाहले. पंतप्रधानांचे तरफेची चौकी ठेवणार होते ते मवकूफ केली रुपयाची निशा होणें आहे. निशा जाहल्यानंतर गडाहून उतरवितील

---

*"मोहरम". सफर नव्हे हा दोष मुळांतच आढळतो.

†प्रस्तुत अखबारची पूर्वीचीं पाने अनुपलब्ध.

रो॥ भवानी सिवरामानीं येथील कारपरदाज्यांचे सूचनेनुरूप छ ३० मोहरमीं डेरे बाहेर दिधले. . छ ५ सफरी डेरे दाखल होणे म्हणोन कारपरदाज म्हणत आहेत. परंतु भवानी सिवरामासमीप स्वार वगैरे सरंजाम कांहीं दिसत नांहीं व बंगाल्यास रवाना करितों म्हणोन शोहरत जाहली. परंतु कारपरदाजाचे तरफेनें रवानगीची सुस्ती दिसती आहे. हैदरअलीखानाकडून पेशकशीचे रुपये घेणें व इंगरेजांवर दाब पडावा याकरितां भवानी सिवरामाचे रवानगीची शकल कारपरदाजानीं काहाडली आहे.

गोविंदराव गाइकवाडास बालाजीपंतानी उमेदवार केलें. परंतु येक रुपया दिधला नांहीं व सावकार येक रुपया देत नांहीत. गाइकवाड मा॥र व रास्त्यांची फौज कोंडाईबारीकडें पाठवितों म्हणोन शोहरत इंगरेजांवर दाब पडावा याकरितां कारपरदाजाकडून दिसतें. सेवेसी श्रुत होय.

उदेष्टेण वकीलास दररोज पनासा मनुष्याचा सिदा व दाहा बारा घोडीं व उंट वगैरेस दाणा व वेरण छ ३ माहे मा॥रपर्यंत कारपरदाजानी पाठविली.

पौ॥ छ १० माहे सफर संन ११९६ हिजरी रोज शुक्रवार चार घटका दिवस राहता डांकेवर मै दारोगा

---

A. R. No. 175

४ सफर ११९६ हिजरी
१९ जानेवारी १७८२

पौ॥ छ १० माहे सफर संन ११९६ हिजरी रोज शुक्रवार चार घटका दिवस राहता डांकेवर मै दारोगा हरकारा.

श्री

विनंती विज्ञापना येसी जे येथील कुशल ता॥ छ ४ माहे सफर ता॥ पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखण

आज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेप येथील वर्तमान छ ३० माहे मोहरम रोज मंगलवारी प्राथकाली विनंतीपत्र इंग्रजांच्या वकीलाच्या भेटी जाल्याचे सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान तिसरे प्रहरी राजेश्री नाना घराहून बाहेर डेऱ्यास गेले होते. इग्रजांकडील वकील येक आसामी मुख्यं व हरबा दुभासे यैसे उभयेता नानानी डेरा दिल्हा तेथे आले होते. नाना व हरीपंत व माधोराव सदासिव व इंग्रजाकडील वकील यैसे याचा खिलवत डेऱ्यात येक प्रहरपर्यंत जाला. खिलवतीचे वेलेस डेऱ्याजवल आसपास कोन्ही मणुश उभे राहू दिल्हे नाही. खिलवत वगैरे होऊन इंग्रजाकडील वकील आपले डेऱ्यास गेले. संध्याकाळी नाना डेऱ्याहून आपले घरास आले. खिलवतीचा भाव अद्याप कांही प्रगटात आला नाही. परंतु आंतस्थे वर्तमान आहे कीं कोन्हेही प्रकारे दारमदार करून सलूक करावा. कारणं की उभयेपक्षी कलहामुळे खर्चात आले याअर्थी दारमदार करून तह करावा यैसे उभयेपक्षीही मानस आहे. कारभाऱ्याचेही मानस आहे की कोन्हेही प्रकारे दारमदार करून सलूक करावा. इंग्रजाचेही मानस आहे की कलहामुळे खराबी फार जाली. ममई वगैरे येथील साहुकार वगैरे याचां माल बंद पडला. खरीदी फरोख्ती न चाले याअर्थी साहुकार आर्जुदा. याअर्थी दारमदार करून सलूक करावा याजकरितां वकील मजकूर येथे आले. भेटी होऊन येक खिलवत जाला. पुढे खिलवत वगैर होऊन काये निश्चये होऊन दारमदार ठैरतो हे पाहावे. इकडील मुदे कारभाऱ्याचे आहेत की वसई वगैर स्थळे घेतली आहेत ते द्यावी व दादासाहेबांचा पक्ष न करतां त्यास आमच्यां हवाला करावे. आणिकही कितिका प्रकारचे याचे मुदे आहेत. इंग्रजाकडीलही मुदे आहेत की दादासाहेबामुळे आम्ही खर्चात फार आलो. त्याची सोये करून द्यावी व दादासाहेबाचाही बंदोबस्त करून द्यावा याप्राणे तिकडीलही मुदे आहेत मग काये निश्चये होऊन उभयेपक्षी दारमदार होईल ते पाहावे. शृत होये. छ १ माहे सफर रोज

बुधवार वितिपात म्हणोन नाना डेऱ्यास गेलें नाहीत. घरीच होते. इंग्रजाकडील वकीलास मेजमाणी हजार रुपये नख्त व सिधां व मेवां वगैर मिठाई पाठविली. शृत होये. वदंता आहे की इंग्रजाचे बोलणे कीं वसई वगैर स्थळें तुमची घेतली आहेत हे घ्यावी व दादासाहेबाचा बंदोबस्त करून द्यावा व हैदर नायेकाचे बिघाड करावा यैसें आतस्थे बोलणे त्याचे आहे यैसे वर्तमान यैकिल्यात आले. परंतु प्रस्तुत हैदर नायेकाचे बिघाडाचां मुदां हे यैकतील यैसा अर्थ दिसत नाही यैसे आंतस्थे कितिक त्याचे बोलणे आहे यैसा भाव यैकिल्यात आला. मग निश्चयेरूप काये बोलणे होऊन यैकिल्यात आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. दरबार वगैरे जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. विदित होये. छ २ माहे मजकूर रोज गुरुवार. कासीच्या राज्याचा वकीलाची भेट जाली. वकीलानी कारभाऱ्यास दोन वस्त्रे दिल्ही. वकील मजकूर सामान पक्षातच आहेत. तीनचार घोडी व दाहा पांच मणुश्य त्यासमागमे आहेत. विशेषे नाहीत. कासीच्या राज्याचा वकील यावयास कारण की कासीचे ठाणे वगैर इग्रंजानी घेतले आहे यां अर्थी आमची मदतगिरी करून फौज वगैर देऊन इंग्रजाचे पारपत्य केल्यास वीस लक्ष रुपये देऊ यैसे राज्याकडील बोलणे आहे. राज्याकडील वकीलाची भेट मात्र जाली. खिलवत वगैर अद्याप जाला नाही. खिलवत वगैर होऊन काये जे वर्तमान ध्याणास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल शृत होये. हैदर नायेकाकडील वकील दरबारास आले होते. नानाचा व वकीलाचा खिलवत जाला. खिलवताचा भाव यैकिल्यात आला की हैदर नायेकास ममतापुर्वक पत्रे लिहिली यैसे यैकिल्यात आले. विदित होये. छ ३ माहे मजकूर रोज शुक्रवार. राजश्री गणेशपंत बेहरे कोंडाईबारीवर आहेत. रा गोविंदराव गायेकवाड याची रवाणगी गुजरात प्राताकडे जाली आहे. येथून कोस दीड कोरा कूच करून मुकाम केला आहे. त्याची खर्चविचाची अद्याप बंदोबस्ती नाही हे पूर्वी विनंतीपत्री लेखण केले आहे त्याजवरून शृत जाले असेल. गायेकवाड

मजकूर याची खर्चाची बेगमी होऊन जाणे दीर्घसूत्रावर आहे. येथून दीड दो कोसावर मुकाम करून आहेत. शृत होयें. राजश्री कृष्टणरावजीकडील पत्रे आली. पत्राचा भावार्थ विशेष कलल्यात आला नाहीं. विदित होये. येथे वदंता आहे की येजमानसाहेब डेऱ्या- दाखल जाले. बेदराकडे जाणार यैसे वर्तमान आहे. शृत होयें. इंग्रजाकडील वकील बागात हरीपंताचे लस्कराजवल डेरे देऊन उतरले आहेत. आसपास श्रीमंताकडील गाडदी वगैर उतरले आहेत. विदित होये. वारानसीचे राज्याकडील वकील आले आहेत त्यास मेजमानी दीडसे रुपये दिल्हे व सिधा दिल्हा. शृत होये. पुढे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. छ २३ माहे मोहरमचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर केले ते छ २ माहे मारी सेवकास पावले. पावोन संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 176**

७ सफर ११९६ हिजरी
२२ जानेवारी १७८२

पैा छ १५ सफर बुधवारी सरकारच्या डांकेवर आली पत्रे सन ११९६ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सा नमस्कार विनती उपरी येथील वर्त- मान ता छ ७ माहे सफर माघ शुध्द नवमी भौमवासरपर्यंत स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष छ ४ माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें ते दारोग्यांचे विद्यमानें पावलें असेल. सांप्रत हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पृथक पत्रीं अखबार लिहिली

आहे ते दारोग्याचे विद्यमाने पत्रें पाऊन वर्तमान श्रुत होईल. कृपा-पत्र छ २९ मोहरमचे पाठविलें ते छ ६ सफरी पाऊन बहुत संतोष जाहला. चिरंजीवाचें पत्राचा लिफाफा पावला. सांप्रत चिरंजि-वास पत्र पाठविलें आहे ते पावेल. इंगरेजाचे वकीलाचें व येथील कारपरदाजाचें बोलण्याचा खुलासा कोण्ही स्नेहिताचे मुखें सेवकाने यैकिल्याप्रमाणें पृथक पत्री वर्तमान लिहिलें आहे. कृष्टणरावजीचे पुत्र गोविंदराव प्रथम दिवसी भेटीचे समई सर्वत्र समाजांत होते. त्याउपरी आजी छ ७ माहे मारपर्यंत गोविंदराव कृष्टण यास येथील कारपरदाजांनी शरीक मसलहत केले नांही व कृष्टणराव यांसहित वर्तमान लिहून पाठविलें नांही. राजश्री गोपाळराव ग॥ मुनसी यानी स्वामीस पत्र व तिलशर्करेची थैली पाठवण्याविषई सेवकाचे स्वाधीन केली ते पाठविली आहे. त्यांचे पत्राचे उत्तर पाठविल्यास पावतें होईल. बहुत कांय लिहिणें हे विनंती.

---

पौ। छ १५ सफर.

श्रीनिवास

विनंती जे मुंबईकर इंगरेजाकडील वकील उदेप्टेण पुण्यास आला आहे व पंतप्रधानाचे कारपरदाजासी व वकील मारासी दोन बैठकी जाहल्या. येकांती बोलण्याचा भाव प्रसिध न व्हावा ये-विषईची तकयुद बहुत केली आहे यार्करितां तहकीक वर्तमानाचा शोध सांकल्यतेकडून कळत नाहीं. परंतु जे शरीक मसलहत आहेत त्याचे जे मुकरब त्यांजसमीप कांहीयेक उदगार निघत आहे त्या मुकरबापैकी कोण्ही स्नेहिताचे द्वारें कांही वर्तमान यैकिलें ते सेवेसी लिहितों. इंगरेजांकडील सिलसिला बदरानअलीकडे आहे व बदरअलीखानाकडेंही आहे. पंतप्रधानांकडे काहींच सिलसिला नाही त्या अर्थी कारपरदाज मनसुबेबाज व तरदुदी नाहीत. कबळ गाफिल आहेत हा दोष लागतो. यार्करितां येथील कारपर-दाजानी आपले तरफेचा पैगाम टिपू न देता ज्वाबसालाकरितां

मुंबईकर व गाडराचे तरफेनें वकील यावा म्हणोन सिलसिले जुंबानीं केली. त्यावरून प्रथमतां मुंबईकरानीं पत्र पाठविलें व वकील पाठवण्याविषई कारपरदाजांचे समत घेऊन उदेष्टेणास रवाना केलें. तो पुण्यास आला. कारपरदाजांचे व वकीलांचे बोलण्यांत बदकौली व बदअहदीचा दोष इंगरेजांकडें लाविला. त्याचें उतर वकीलानें केलें की रघुनाथराव आश्रयास आले त्यांची दस्त-गिरी करणें सांप्रदाय सरदारीचा आहे. याकरितां इतका बखेडा जाहला. सांप्रत करनल इपटेनाचें विद्यमानें जो करार होऊन तहनामा जाहला आहे तोच प्रमाण. त्याचे अन्वयानें पंतप्रधानानीं व इंगरेजानीं अमल करावा. करारावितरिक्त मुळुक व किले नवीन इंगरेजानीं जे घेतले आहेत ते माघारा द्यावे व अहमदाबाद वगैरे गुजरात प्रांत व सुरत प्राती जो रुपया इंगरेजानी घेतला आहे तो पंतप्रधानास माघारा द्यावा व रघुनाथरायाचे कुमकेकरितां सिबंदी वगैरे जो खर्च इंगरेजास पडला आहे तो पंतप्रधानानी द्यावा व हैदरअलीखानासी व इंगरेजासी बिगाड आहे, इंगरेजांची कुमक पंतप्रधानानी करावी मददखर्च देऊ. कुमक न केली तरी इंगरेज व हैदरअलीखान परस्परें समजून घेतील पंतप्रधानांचे सरदारानी व पंतप्रधानानीं दोघाचीही कुमक न करावी याप्रमाणे उदेष्टेण बोलिला. याचें उतर कारपरदाजानी केले.

---

पा छ १५ सफर.

२

पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी.

रघुनाथराव यांचे निमित्त करून प्रथमतां साष्टीचा किला घेतला व अहदसिकनी केली. त्याउपरी इपटेनाचे विद्यमानें करार होऊन कलकतेवाल्याचे मोहरनसी तहनामा जाहला असता पुन्हां इगरेजानी बदमामली केली. त्यास पंतप्रधान जबदरदस्त आहेत

त्या अर्थी चिंता नांहीं. इंगरेजास हार येतील. सांप्रत दारमदार करणे आहे तरी बमगसाष्टी समग्र किले व मुलुक इंगरेजानी जो घेतला आहे तो सोडावा व हैदरअलीखान पंतप्रधानाचा शरीक मसलहत आहे त्यासी चिनापटणवाल्याकडून जो पैगाम असेल त्या-प्रमाणें किले व मुलुक द्यावा व सिबंदीचा खर्च खान मारास जो पडला आहे ते रुपये देऊन बाकी मुलुक सोडून घ्यावा याप्रमाणें आम्ही म्हणतों. परंतु हैदरअलीखानांकडील वकीलास तुमचे व आमचे बोलण्याचें वर्तमान सांगून खान मारास पत्रें लिहून पाठऊं. त्याजकडून उतर येईल त्याप्रमाणे तुम्हांसी बोलू. परंतु पंतप्रधा-नाचे मनोदयाप्रमाणें तुम्ही स्नेह केल्यास हैदरअलीखानासी व इंगरेजासीं स्नेह परस्पर नुकसानी न होता करून देऊ. याप्रमाणे येथील कारपरदाजाचें व उदेष्टेणाचें बोलणे जाहलें. त्यानंतर उदेष्टेणान गाडर व मुबईवाल्यास पत्र पाठविले व येथील कारपर-दाज आपले तर्फेने व लक्ष्मणराव रास्ते व नूरमाखान व नरसिंगराव यांची पत्रें हैदरअलीखानास लिहून पाठ-वणार. खान माराकडून प्रत्योतर येईल त्याप्रमाणे इंगरेजाचे वकीलासी बोलतील. सदरहूअन्वयें खिलवतेचे बोलण्याचा भाव यैकिला तो सेवेसी व हुजूर लिहिला आहे. श्रुत होय हे विनती.

---

पैा छ १५ सफर.

श्रीनिवास १,२

अखबार पुणें अज इा छ ४ सफर लगायत छ ७ माहे मार सन ११९६ हिजरी माघ शुध मंगळवार.

छ २० मोहरमी उदेष्टेण वकील हरिपंताचे डेऱ्यास आला होता. बालाजी जनार्दन व माधवराव सदासिव यांनी बइतिफाक हरिपंत वकील मारासी येकांत जाहला व इंगरेजाकडील वकीलाचे लस्करांत व डेऱ्यास परवानगीवतरिक्त कोण्ही न जावें याची तकयुद जाहली व हैदरअलीखानानें चिनूर व त्रिपामूरचा किला घेऊन चिनाप-

टणाचे रुखें गेला यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रत प्रत्यक्ष जाहलें व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे. छ ४ माहे मारीं बालाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास जाऊन उदेष्टेणास बोलाऊं पाठविलें. वकील मार बमोजिब तलब आला. हरीपंत व माधवराव सदासिव व दुभासी शरीक मसलहत होते. दोन घटका दिवस राहिला होता त्या समयापासून सात घटका रात्रपर्यंत खिलवत जाहली. त्यानंतर उदेष्टेण आपले डेऱ्यास गेला. इतर सर्वत्र आपले स्थळास गेले.

छ ३० मोहरमीं भवानी सिवरामानीं बंगाल्याचे मोहिमेस जावयाकरितां डेरे बाहेर उभे केले म्हणोन पूर्वील पत्रीं वर्तमान लिहिलें आहे. छ ५ माहे सफरी बालाजीपंत पंतप्रधानांचे दरबारास गेले. भवानी सिवराम बमोजिब तलब रुखसतीकरितां दरबारास गेले. पंतप्रधानानी पैठणी दोन वस्त्रें सेला व पागोटें व मोत्याची कंठी बमय पदक जमरुदी भवानी सिवरामास देऊन रुखसत केलें. छ मारी भवानी सिवराम डेरे दाखल जाहलें. दोनसें स्वार समागमे आहेत. तजवीज बंगाल्यास पाठवावयाची परतु सरंजामाची तयारी अद्यापि काही दिसत नांही.

छ ६ माहे मारीं उदेष्टेणांची पत्रें मुंबईस रवाना जाहली. घांटापर्यंत चौकी पार करावयाकरिता पंतप्रधानाची जासूदजोडी जात आहे.

उदेष्टेण वकील पुण्यास आल्यानंतर कोकणांत बलाळगड म्हणोन टकमकचे गडासमीप आहे व बलाळगड इंगरेजांचे स्वाधीन, त्या गडचे लोकासी व टकमकवाल्यांसी लढाई जाहली. इंगरेजाचे लोक थोडके होते व बलाळगडावर जंगी सरंजाम नव्हता याकरितां सिकस्त जाहली व गड सोडून गेले. पंतप्रधानाचे लोक टकमकचे त्यानी बळाळगडांत ठाणे कायम केले.

---

पैा छ १५ सफर.

२

श्रीनिवास

पुरवणी अखबार पुणें छ ७ सफर सन ११९६ हिजरी.

छ ७ माहे मारी त्रितीय प्रहरीं बाळाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास गेले व लक्ष्मणराव रास्ते बमोजिब तलब गेले. दोन घटका दिवस बाकी राहहजोंपर्यंत त्रिवर्गाचें खिलवत जाहलें. त्यानंतर उदेष्टे-णाचा हमराही दुभासी हरीपंत यास बोलाविलें व अस्तमानपर्यंत चौघांचा येकांत जाहला. त्यानंतर नूरमादखान व नरसिगराव यांस बोलाऊन आणिलें. सर्वत्राचे बइतिफाक आठ घटका रात्र-पर्यंत खिलवतेचें बोलणें जाहलें. त्याउपरी सर्वत्र आपले मकानास गेले. छ मारीं माधवराव सदासिव शरीक मसलहत नव्हते. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

---

A. R. No. 177

८ सफर ११९६ हिजरी

२३ जानेवारी १७८२

पैा छ १५ सफर बुधवार सरकारच्या डांकेबराबर आली. सन ११९६ हिजरी.

श्री

विनंती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल ता छ ८ माहे सफर मुा पुणें स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ ८ माहे मजकूर रोज शनवारी प्रातःकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेबराबरमे सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल तदनंतर येथील वर्तमान तिसरे प्रहरी इग्रजाकडील वकील उदेष्टीन नामे हरीपंताचे डेऱ्यास आले होते. नानाही डेरियास गेले होते. नाना व हरीपंत व माधवराव सदासिव व इंग्रजाकडील वकील याचा

खलवत जाला. खिलवताचे वेलेस शागिर्दपेशा वगैर लोक तमाम डेऱ्याबाहेर काढिले. उपरांतिक खलवत येक प्रहरपावेतो जाहला. इंग्रजाच्या बोलण्यात राजश्री माधवराव सदासिव आहेत. दुसरे कोणी नांही. खिलवताचा भाव यैकिल्यात आलां कीं इंग्रजाकडील वकील बोलतो कीं श्रीमंत दादासाहेबास त्रिंबकचा किला द्यावा. आनंदवली गंगातीरास ते राहतील. त्यांजवल दोन पलटणे असावी. पूर्वी त्यास माधराव कैलासवासी याणी जागीर दिल्ही होती त्यापेक्षा दाहापधरा लक्षाची आधिक द्यावी व दादासाहेबाचे पुत्राणी श्रीमंताजवल असावे. आमचा खर्चवेच दादासाहेबाचे समंधे जाला आहे याचा निकाल करून द्यावा व हैदर नाइकासी बिघाड करावा. या प्रौा जाल्यास तुमचा आमचा दारमदार होईल. तुमची वसई वगैर स्थले घेतली आहेत हे तुमची तुम्हास माघारे देऊ. सिवाय साष्टी व अरूणचा किला हे दोन स्थले देणार नाही या प्रौा इंग्रजाचे वकीलानी भाषण केले. त्याजवरून कारभारी याणी उत्तर केले कीं दादासाहेबास तुम्हीं आमचे स्वाधीन करून द्यावे पलटणे वगैर राहावयाचे आनकूल पडणार नाही. त्यानी आनंदवलीस राहावे. चौकीस फौज आमची राहील पूर्वी त्यास जागीर नेमून दिल्ही आहे त्या प्रौा त्यानी घ्यावी आणि स्वस्त असावे. दुसरे, वसई वगैर स्थले तुम्ही घेतली आहेत ते आमची आम्हांस द्यावी. हैदर नाइकासी प्रस्तुत बिघाड करावा हेही होत नाही. पांचार वरषे जाली. तुम्हांमुळे आमचे स्वारीचा उद्योग राहिला यामुले आम्ही तहखर्चात आलो. तुम्हीहीं दादासाहेबामुले खर्चात आला. परस्परे यैसी गोष्ट जाली. काही दिकत न घेता दादासाहेबास आमचे स्वाधीन करून द्यावे व आमचे स्थले सोडून द्यावी म्हणजे सहजच तुमचा आमचा दारमदार होईल. तुम्हीं व आम्ही प्रसंगोचित येकत्र जाल्यास मग पुढे कोणासी बिघाड करणे अथवा सलूख करणे हे घडून येईल यैसे परस्परे उभयेपक्षी मुदे भारी आहेत. त्याजकडील मुदे यांस कबूल करणे कठीण आहेत. यांजकडील त्यास कबूल करणे कठीण आहेत यैसे परस्परे भाषणे आहेत. उभयेपक्षी

मुदे भारी तेंव्हा राजकारण होणे दीर्घसूत्रावर आहे. प्रस्तुत तो या प्रो उभयेपक्षी बोलणे आहे. मग पुढे काये निश्चयात येऊन वर्तमान यैकिल्यास लेखन केले जाईल. परस्परे भाषणे जाल्याचे पत्रे इंग्रजाकडील वकीलाची व कारभारियाची ममईस गाडराकडे गेली आहेत. मग तेथील उतर काये येईल हे ध्यानास आलिया लेखन केले जाईल. या प्रो खलवत वगैर होऊन इंग्रजाकडील वकील आपले डेऱ्यास गेले व नाना वगैर आपले घरास आले. विदित होये. छ ५ रोज रविवार. राजश्री भवानी सिवराम डेरे दाखल जाले. पां च्यारसे राऊत प्रस्तुत त्यां जवल आहेत वदंता घातली आहे की भवानी सिवराम यांची रवानगी बंगाल्याकडे केली आहे यैसी आवई घातली आहे. परंतु बंगाल्याकडे त्यांची रवानगी केल्यास पंचवीस हजार फौज पाहिजे व खर्चावियास वीसपचवीस लक्ष रुपये तूर्त पाहिजे त्यास प्रस्तुत फौजेचेही अनकूल नाही. व पैसा-चेही अनकूल नाही. यैसे असतां त्यांची रवानगी बंगाल्यात कैसी होते. त्यामध्ये मुलुकगिरीचे दिवसही थोडके राहिले असो. बंगालि-याची आवई घालून भवानी सिवराम यांस डेरे दाखल करविले आहे. कदाचित जाले तर त्यांस दोनतीन हजार फौजेनसी कोंडाई-बारीवर गणेशपताकडे रवाना करितील. बंगाल्याकडे तो रवाना करणे दीर्घसूत्रावर आहे. प्रस्तुत तो भवानी सिवराम डेरे दाखल जाले. मग त्याची रवानगी कोणीकडे करितील हे लेखन केले जाइल. श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. श्रुत होये. छ ६ सोमवार. श्रीमंत पर्वतीचे दर्शनास गेले होते. दर्शन वगैर करून सध्याकाली घरास आले. श्रुत होये. राजश्री बज्याबा पुरंधरे याचा अडीच लक्ष रुपये खंड जाला. त्यास सोडणार हे पूर्वी तपसीलवार लेखन केले आहे त्याजवरून ध्यानास आले असेल. त्यांस यैवजाची निशा बोलून बज्याबास सोडणार यैसे आहे. सोडल्यावर लेखन केले जाईल. श्रुत होये. श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेस आहेत दादासाहेबाकडील बाजीराव बर्वे हजार दीड हजार फौजेनसी

महेश्वराकडे गेले होते. त्यास अहिल्याबाई होळकरीन याणी त्यास धरले. हे पूर्वी लेखन केले होते. प्रस्तुत वर्तमान आहे कीं बाजीराव बरवे यास अहिल्याबाईने धरले. श्रुत होये. सिंदे हिंदुस्थान प्रांतीच आहेत. अलिकडे त्यांजकडील कांही वर्तमान आले नाही. आल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. हैदर नाइकाचे वकील दरबारास आले होते. कारभारियासी व त्यांसी खलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला कीं हैदर नाइकाचे चितात की इंग्रजाचे राजकारण आपल्या मुद्या प्रो जाले तर करावे. नाहीतर पंचवीसतीस हजार फौज कृष्णातीराकडे पाठवावी. मग जे मसलत करणे ते करूर यैसे नाइकाकडील वकीलाचे बोलण्याचा भाव यैकिल्यांत आला. श्रुत होये. छ ७ रोज मंगळवार. नाना हरीपंताचे डेरियास गेले होते. उभयेताचा खिलवत जाला. खिलवत होऊन नाना आपले घरास आले. खलवतीचा भाव यैकिल्यांत आला की इंग्र

पै॥ छ १५ सफर सन ११९८ हिजरी.

२

पुरवणी

जाचे राजकारणाविसी जाला. त्यास इंग्रजाचे बोलण्यात मुदे भारीच आहेत व कारभारियाचेही बोलण्यात मुदे भारीच आहेत. त्यास उभयेपक्षी राजकारण होऊन दारमदार होणे कठीण आहे. प्रस्तुत तो याप्रकारे प्रसगाचे बोलणे आहे. पुढे जे वर्तमान यैकिल्यात येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. विदित होये. येजमानसाहेब छ २१ मोहरमीस डेरे दाखल होऊन छ २५ कूच दो कोसाचे जाले बेदराकडे येतात यैसे वर्तमान येथे आहे. विदित होये पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. श्रुत होये. सेवकाचे गांव खेड्यापासून सिवरामपंत भते, फडणीस खांदेशचे सुभ्याचे, यांणी दहकपटी व सुभेपटी मिळोन मनमाने तो यैवज जमाबंदी प्रो॥च घेतला.

येविसी सरकारची पत्रे त्यांस सादर जाली कीं मोगलाई जागिरी-पासून दहकपटी व सुभेपटी घ्यावयाचे प्रयोजन नांही, यैवज घेतला आसेल तो माघारा देणे. यैसी पत्रे असतां व कृष्णरावजीनी त्यास समक्ष ताकीद केली असतां ते यैवज माघारा देत नाहीत. धटाई-च्या गोष्टी सांगतात. दुसरे, याजकडील होलकर वगैर सरदार यांणी घासदाणा म्हणौन मनमाने तो यैवज घेतला तो उपद्रव कोठपर्यंत ल्याहावा. येविसी पूर्वीही दोनच्यार विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. प्रस्तुत कृष्ण-रावजी तेथे आहेत. त्यांस निक्षुण ताकीद करून सांगितले पाहिजे कीं सिवरामपंत वगैर यांणी यैवज घेतला आहे तो माघारा देवणे. या प्रो त्यांस निक्षुण ताकीद जाली पाा येविसी रावजीचे पत्र येथे त्यांचे चिरंजीवास आले पाहिजे. सर्वप्रकारे सेवकाचे आभिमानी स्वामी आहेत. पहिलेपासून सर्व साहिता स्वामीपासूनच होत आली आहे. विनंती मान्ये करून येविसी रावजीस सांगोन रावजीचे पत्र त्याचे चिरंजीवास आले पाहिजे कीं सिवरामपंत वगैर याणी यैवज घेतला आहे तो पत्रदर्शनी माघारा देणे यैसे पत्र अगत्य आले पाहिजे. शृत होये. छ २१ माहे मोहरमचे आज्ञापत्र सादर डाकेसमागमे जाले ते छ ६ माहे म्मारी पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 178

११ सफर ११९६ हिजरी
२६ जानेवारी १७८२

पैा छ १८ माहे सफर संन ११९६ हिजरी रोज शेनिवार संध्या-काळी डाकेवर मै दारोगा प्रहर रात्री.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ताा छ ११ सफर माघ शुध द्वादसी मंदवासरपर्यंत वास्तव्य

पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ८ माहे मारी हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचें सेवेसी पत्रें डांकेवर पाठविलें ते दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रत हुजूर अर्जी व अखबार व पृथक पत्री अखबार आपले सेवेसी लिहून डांकेवर पत्रें रवाना केलीं आहेत. भवानी सिवराम बंगाल्याचे मोहिमेस जावयाकरिता डेरे दाखल जाहले व गाडराकडील वकील उदेप्टेण ज्वाबसालाकरितां पुण्यास आला आहे उभयतांकडील वर्तमान हैदरअलीखानास लिहून पाठविलें आहे. करारप्रमाणें पेशकसी बाा रुपये बारा लाख व कर्ज हमना आठ लाख, येकोन वीस लाख रुपये व इंगरेजासीं दारमदार कोणे तऱ्हेने करावा येविषईची सलाह याचे उतर खान मारनुल्लेकडून आल्यानंतर भवानी सिवरामाची रवानगी व उदेष्टेण वकीलासी उतर प्रत्योतर करतील. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

-----

श्रीनिवास

अखबार पुणें अज छा छ ८ सफर लगायत छ ११ माहे मार सन ११९६ हिजरी शनिवार.

बंगाल्याचे मोहिमेस जावयाकरितां भवानी सिवराम यास छ ५ माहे मारीं पंतप्रधानानी वस्त्रे व मोत्याची कंठी देऊन रुखसत केले व छ ७ माहे मारीं हैदरअलीखानाचे वकीलासी व कारपरदाजासी खिलवत जाहली व वकीलानी खान मारकडे पत्रें रवाना केलीं या-व्यतिरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र लिहून डांकेवर रवाना केलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहले असेल. सांप्रतचें वर्तमान दफेवार लिहिल आहे.

तुकोजी होळकराचे पुत्राचा विवाह माघ मासीं होणार म्हणोन पूर्वी वर्तमान लिहून पाठविलं आहे. माघ वद्य सप्तमी छ २० सफरी लग्न-तिथीचा निश्चय जाहला. श्रीमंत पंतप्रधान व कारपरदाजांस लग्नास

येण्यांची सूचना व आज्ञेते द्यावयाकरितां छ १० माहे मारी रात्रौ तुकोजी होळकर दोनसे स्वारानसीं वाफगांवीहून पुण्यास आले व हरी-पंतासमीप उतरले. छ ११ माहे मारी हरीपंतानी होळकरांस भोजनास बोलाऊन भावी मंगल सूचनेचे शादीकरितां होळकरास च्यार वस्त्रे पैठणी, सेला व मुडासें व किमखाब व जामेवार महमुदी व हमराही वीस असामीस सेला व मुडासें हर्येकास दिधले. छ मारीं रात्रौ शनि-प्रदोषाकरिता बालाजीपतानीं होळकरास ज्याफत केली. भोजनोतर होळकर व च्यारपाच आसामी मातबरास च्यार सनगें सेला व पागोटे व महमुदी व किमखाब येणेंप्रमाणें व तीस आसामीस सेला व मुडासें देऊन रुखसत केले. उपरांत प्राथःकाली छ १२ रोजी होळकर मार पंतप्रधानास आज्ञा देतील व श्रीमंताची ज्याफत भोजन व वस्त्रें घेऊन तुकोजी होळकर वाफगांवास जाणार.

करनल गाडरची पलटणें कल्याणीसमीप आहेत. त्यां लोकावर इगरेजांची तकयुद बहुत याकरितां दोनसे मनुष्येंपर्यंत नगद्य बंदुक व हत्यारें पळोन घाटासमीप आली. पंतप्रधानाकडील चौकीचे लोकानी आटकाव करून कारपरदाजास सूचना लिहून पाठविली. येऊ देणे म्हणोन परवानगी गेल्यानंतर दोनसे माणस पुण्यांसमीप येऊन उतरले आहे व नौकर राहवयाचे उमेदवार येथील कारपरदाजानी त्यां लोका-वर तकयुद चौकीची केली आहे.

पेश छ १८ माहे सफर सन ११९६ हिजरी रोज शनिवार शके-वार संध्याकाळीं प्रहर रात्रौ

---

२

पुरवणी अखबार छ ११ सफर सन ११९६ हिजरी

गोविंदराव गाइकवाडास कारपरदाजानी उमेदवार करून ठेविले व गुजरात प्रांतात जावयाकरिता पंतप्रधा(ना)कडून रुखसत देविली.

परंतु खर्चास येक रुपया दिधला नांहीं व सावकारासमीप गाइकवाड मााराची पत येक पैश्याची नांहीं यास्तव हमराही लोकानीं फाकेकसी करून उठोन गेले. गोविंदरायासही फाक्यापर्यंत नौबत आली याकरितां छ ९ माहे मारी मौजे दावडीं निबगांव, मारनुलेचा वतनी गांव, तेथें गेला.

कृष्णराव जोसी वकील याची पत्रें मरकूम छ २२ मोहरमचीं छ ८ सफरीं हैदरअलीखानाचे लश्करीहून कारपरदाजास आली. त्रिपासूरचें मकान घेऊन इंगरेजांचे लोकास कतल करून चंद्रगरीचा किला घेतला व आरकाटचे रुखं गेला. जनराल कूटानें जंगी सरंजामाची तयारी करून चिनापटणीहून पुन्हां त्रिपुसुरास आला म्हणोन खारिज यैकिलें.

कोळेंबें बदरास फरासीसांची जाहाजें जंगी सरंजामासुधां आलीं म्हणोन पूर्वीं लिहिलं आहे. सांप्रत यैकिलें कीं चिनापटणवाल्यानीं पांच जाहाजे जंगी सरजामसुधां फरासीसांचे जाहाजाचे मुकाबिलयास पाठविलीं होतीं. परस्परें लढाईत इंगरेजाची सिकस्त जाहली. दोनतीन जाहाजें फरासीसानी दस्तगीर केलीं व दोन जाहजें पळोन चिनापटणास आलीं म्हणोन खारिज यैकिलें. सेवेसी श्रुत होय हे विनती.

पैा छ १८ माहे सफर संन ११९६ हिजरी रोज शेनिवार संध्याकाळी डांकेवर मै दारोगा प्रहर रात्री.

---

A. R. No. 179 — १६ सफर ११९६ हिजरी
३१ जानेवारी १७८२

पैा छ २३ रोज गुरुवार माहे सफर सन ११९६ हिजरी सरकारच्या डाकेबराबर आले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ताा छ १६ सफर माघ वद्य द्वितीया गुरुवासरपर्यंत वास्तव्य पुणें

स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १२ माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रत अखबार व अर्जी हुजूर व पृथक पत्रीं वर्तमान लिहून डांकेवर पत्रें रवाना केली आहेत. दारोग्याचे विद्यमानें हुजूर व सेवेसी पावतील. अपाजीराम म्हणोन सेणवई ग्रहस्त हैदरआलीखानाचे तरफेनें श्रीमत पंतप्रधानासमीप वकीलीस पूर्वी होता. सांप्रत बतरीक मुसाहब खान मारासमीप आहे. त्यास स्वाराचे निगाहदास्तीकरितां रवाना केलें व बादामीस येणार म्हणोन यैकिलें. याचे सिलसिल्याचा तपसील चिरंजीव राजश्री राय रघोत्तमराव यांनी सेवेसी विनती केला आहे. विशेष काय विनती ल्याहावी. राजकारणी लोकांची चाल सर्व स्वामीस विदित आहे. बहुत काय लिहिणें हे विनती.

------

पैा छ २३ सफर गुरुवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ १२ सफर लगायत छ १६ माहे मार सन ११९६ हिजरी माघ वद्य गुरुवासर.

तुकोजी होळकर श्रीमंत पंतप्रधानास लग्नसमंधी आक्षत द्यावया-करितां वाफगावीहून पुण्यास आले व हरीपंत व बालाजीपंतानी ज्या-फत केली व मुंबईकर इंगरेजांची जमीयत कल्याणीसमीप आहे त्या-पैकी दोनसे लोक बेरुखसत उठून पुण्यास आले आहेत व हैदरअलीखान आरकाटेसमीप व जनराल कूट चिनापटणाहून पुन्हां त्रिपासूरास आला म्हणोन व यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व अख-बार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान हुजूर व स्वामीचे सेवेसी दफेवार लिहिलें आहे.

छ १२ माहे मारीं तुकोजी होळकरानी पंतप्रधानास लग्नसंमधी निमंत्रण येण्याविषई केलें. श्रीमंतानी होळकर मारास ज्याफत करून वस्त्रें दिधली. त्याउपरी रास्ते वगैरे सरदारांचे घरास तुकोजी होळकर आक्षतेकरिता गेले होते. बापुजी होळकर व भिकाजी होळकर, तुकोजीचे पुतने, पुण्यांतील समग्र मातबराचे घरास आक्षेतेस गेले. तुकोजी होळकर छ १३ रोजी पुण्याहून वाफगांवास गेले व बापुजी व भिकाजी होळकर छ १४ रोजी गेले. बापुजी होळकर सेवकाचे बिऱ्हाडास आक्षेतेकरितां आले होते. तुकोजी होळकर वगैरेस पंतप्रधानानी वस्त्रें दिधली त्याचा तपसील.

मारनिले

| मुडासें पैठणी | सेला पैठणी | ज्यामेवार | किमखाब |
|---|---|---|---|
| १ | १ | बऱ्हानपूर | १ |
| | | रगखाद : | |
| | | १ | |

४

बापुजी व भिकाजी होळकर व आसामी पनास हमराहो त्यांकास पैठणी सेला व मुडासे प्रा.

माहादाजी सिंदें बडनफाव चेतसिंग जमीदार कालपीस गेले म्हणोन येथील कारपरदाजांचे सांगितल्याप्रमाणे पूर्वी वर्तमान लिहिले आहे. सांप्रत खारिज वर्तमान यैकिलें की सिंदे मार माघारा झांसीस येणार व छावणीकरितां उजनीस जावयाचा निश्चय आहे.

हैदरआलीखान आरकाटेसमीप लाला पंटेवर व जनराल कूट त्रिपासुरसमीप आहे म्हणोन पूर्वी लिहिले आहे. सांप्रत खारिज यैकिलें की खान माराचे तरफेनं आपाजीराम फौजेचे निगाहदास्तीकरितां रवाना जाहला आहे. बादामीस येऊन विजयापूर वगैरे जिल्यातील स्वाराची निगाहदास्त करणार.

इंगरेजांचे निसबती सवदागरी जाहाजें दोन लवंगा वगैरे किराण्याचीं कालीकोट बंदरीहून मुबईस येत होती तें पंतप्रधानांचे तालुकियांत विजयदुर्गवाल्यानी समुद्रातून पाडाऊ करून विजयदुर्गास आणलीं म्हणोन गोविंदराव कृष्ण यांचे जुबानी ऐकिलें

छ १५ व छ १६ रोजी बालाजीपंत लश्करांत हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. छ १५ माहे मारी उदेष्टेण वकीलासी खिलवत जाहली. छ १६ रोजीं लक्ष्मणराव रास्ते खिलवतेंत होते.

---

पैा छ २३ सफर.

२

पुरवणी आखबार पुणें छ १६ सफर सन ११९६ हिजरी.

लग्नोत्सहाकरितां पंतप्रधानानी वाफगांवास यावें म्हणोन तुकोजी होळकरानी बहुत आग्रहपूर्वक बालाजीपंतास सांगोन गेले त्यास पंतप्रधान लग्नाकरितां जाणार व छ १७ माहे मारीं डेरे दाखल होणार म्हणोन खारिज वदंता आहे कारपरदाजांचे जुबानी जाण्याचा निश्चय नाहीं. बाळाजी जनार्दन छ १७ रोजीं डेरे दाखल होऊन छ १८ माहे मारीं स्वार होऊन वाफगांवास जाणार व सत्वरच माघारा येणार. बाळाजीपंत माघारा आल्यानंतर हरीपंत जाणार म्हणोन यैकिलें

पंतप्रधानाची व उदेष्टण वकीलाची कासदजोडी पत्रासहित कार्सास मेस्तर हिस्तैनाकडें रवाना जाहली

उदेष्टेण वकील व येथील कारपरदाजांचे खिलवतेचा खुलासा पूर्वील पत्रीं खारिज यैकिल्याप्रा लिहिला आहे त्याहून विशेष कांही सांप्रत यैकिल्यांत आले नांही.

भवानी सिवराम स्वारांची निगाहदास्त करीत आहे. च्यारपांचसेपर्यंत लोक जमा जाहले आहेत. हाजरी घेऊन नालनिसी व राजमरा देण्याचा करार केला आहे.

इंगरेजाकडील दोनसें लोक पळोन आले. त्यास बालाजीपंतानी चौकीपाहऱ्याचे तकयुदीनें ठेविलें आहे व ते लोक नौकरीचे उमेदवार. परंतु इंगरेजांचे निसबती लोकांचा विश्वास नांहीं याकरितां बंदुखा घेऊन सोडणार म्हणोन यैकिलें. सेवेसी श्रुत होय हे विनती.

---

**A. R. No. 180** — १७ सफर ११९६ हिजरी
१ फेब्रुवारी १७८२

पैा छ २३ माहे सफर संन ११९६ हिजरी रोज गुरुवार डांकेवर मै दारोगा हरकारा.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ १७ माहे सफर मुाा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत आसिल पाहिजे. विशेषे येथील वर्तमान छ १२ माहे मजकूर रोज रविवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले आसेल. तदनतर येथील वर्तमान होलकराचे येथे लग्न आहे म्हणोन होलकर खासा येथे आक्षत श्रीमताम वगैर द्यावयास आले होते हे विनंतीपत्री लेखण केले होते त्याजवरून ध्यानास आले आसेल. होलकरानी श्रीमताम व कारभाऱ्यास वगैर लग्नाची आक्षत देऊन येक दिवस येथे राहून मागती वाफगावास गेले. होलकर आक्षतेस आले होते म्हणोन श्रीमंतानी व कारभाऱ्यानी वगैर होलकरास वस्त्रे दिल्हीं. होलकराचे पुत्राचे लग्न माहे मजकुरी वद्य ७ सप्तमीस आहे. लग्नास श्रीमंत वाफगावास जाणार यैसी वदता आहे परंतु निश्चयात नाही. मग जातात किवा राहतात हे पाहवे. परंतु नाना व हरीपंत वगैर सर्वत्र होलकराचे येथे लग्नास जाणार. लग्नाचा समारंभ करून मागती पुण्यास येनार. मग कारभारी वगैर लग्नास गेल्यावर लेखण केले जाईल. शृत होये. इंग्रजाकडील सौदागिरी ज्याहाज बंदराकडून येत होतें. त्यास सुवर्णदुर्गाचा किला श्रीमंता-

कडे आहे तेथील किलेदारानी ते सौदागीरी ज्याहाज वळून आणिले. सरकारदाखल केले. ज्याहाजात दोनतीन लक्ष रुपयाचा माल होतां व दाहापंधरा तोफा ज्याहाजात सापडल्यां यैसे वर्तमान आले. श्रुत होये. दरबार वगैर जाला होतां. माली मुलकी वगैर कामकाज जाले. विदित होये. छ १३ माहे मजकूर रोज सोमवार इंग्रजाचे वकीलाकडील हरबा णामे दुभासे हरीपंताचे डेऱ्यास आले होते. नानाही हरीपंताचे डेऱ्यास गेले होते नाना व हरीपंत व माधोराव सदासिव व इंग्रजाकडील वकीलाचा कारभारी याचा खिलवत जाला. खिलवत वगैर होऊन नाना आपले घरास आले व इंग्रजाकडील कारभारी आपल्या डेऱ्यास गेले. खिलवतीचा भाव यैकिल्यात आलां की इंग्रजाकडील वकीलानी ममईस गाडरास पत्रे लिहिली होती त्याची उतरे आली येसे वर्तमान यैकिल्यात आले दुसरी वंदता आहे की उतरे आद्याप आली नाहीत यां आन्वये खिलवत जाला. इंग्रजाकडील ममईहून काये जे उतरे येतील हे वर्तमान कलल्यास लेखण केले जाईल मुख्य प्रकार इंग्रजाचे बोलणे आहे की हैदर नायेकासी बिघाड केल्यास सर्व दारमदार होतील कारभाऱ्याचे मानस आहे की नाईक मजकुरासी बिघाड न होता दारमदार जाल्यास करावा व श्रीमंत दादासाहेबास हाती द्यावे येसे येथील कारभाऱ्याचे मानस आहे. परंतु इंग्रजाचे मानस आहे की हैदर नायेकासी बिघाड तुम्ही केल्यास मग तुमचे दारमदार जे करणे त करू यैसी त्याची भाषणे आहेत. उभयेपक्षी बोलण्याचे भाव यांप्रकारचे आहेत मग काये निश्चये होऊन ठरेल हे पाहावे. उभयेपक्षी बोलणे भवधडच आहे. निश्चयात येणे दीर्घसूत्रावर दिसते. मग पाहावे विदित होये. इंग्रजाचे पातशाहाकडील नव ज्याहाजे विलायेतीहून ममईस आली. ज्याहज्यात पांचपाचसे सातसातसे मणुश आहे व काही गोरेही आहेत यैसे वर्तमान येथे आले. त्या ज्याहाजातून काही ज्याहाजे चिणापटनास इंग्रजाचे साहित्यास जाणार यैसे वर्तमान आहे प्रस्तुत इंग्रजानी सर्व जमाव चिणापटणाकडे मातबर केला आहे. ममईस वगैर पाचसात पलटने मात्र आहेत. बाकीं सर्व पलटणाचा जमाव चिणापटणाकडेच त्याणी केला आहे हैदर नायेकासी व त्यासी तिकडे लढाईचाच प्रसग आहे

यैसे वर्तमान आहे. विदित होये राजश्री गोविंदराव गायेकवाड येथून दाहापंधरा कोस कूच करून गेले. घोडनदीवर मुकाम करून आहेत. पुढे कांडाईबरीकडे जाणार. प्रस्तुत त्यांजवल हजार दोन हजार स्वार आहेत. त्याची खर्चाची सोये नाही. देण्याचा गवगवा विशेषे. नेमल्या-प्राणे फौज जमा नाहीं यैसे आहे. प्रस्तुत रो॥ गायेकवाड मजकूर येथून कूच करून गेले. घोडनदीवर आहेत. काही खर्चाची वगैर सोये जाल्यास व फौज जमा जाल्यास पुढे कूच करून जातील यैसे त्याजकडील वर्त-मान आहे. मागती गायेकवाडाकडील काये जे वर्तमान येईल ते लेखण केले जाईल. शृत होये. छ १४ माहे मजकूर रोज मंगलवार इंग्रजाकडील वकीलाचे बोलण्याचे भाव वगैर सर्व लेहून सिंद्यास व हैदर नायेकास लिहून पाठविले आहेत. उभयेपक्षी उतरे आल्यावर इंग्रजाचे वकीलासी बोलणे ते बोलावे यैसेही यांचे मानस आहे. परंतु सिंद्याचे उतराची मार्ग-प्रतिक्ष्यां विशेषे आहे. त्याचे लिहिल्याप्राणे वकीलासी बोलावे यैसे आहे. शृत होये. ममईस इंग्रजाचे वकीलानी काही मेवा वगैरच्या बंग्या पाठविल्या. इंग्रजाचे वकीलाभोंवतो याची चौकी आहे. तिकडे कोन्ही जात नाही. याजकडील येक फिरगी तिकडे गेला होतां त्यास कैद करून गडास पाठविले. येकदोन बोहरी माल पाहण्यास गेला होता त्यास आनून सिक्ष्यां केली यैसे आहे. शृत होये. छ १५ माहे मजकूर रोज बुध-वार. नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. इंग्रजाकडील वकीलही हरी-पंतांचे डेऱ्यास आले होते. नाना व हरीपंत व माधोराव सदासिव व इंग्रजाकडील वकील याचा खिलवत प्रहर रात्रपूर्वपर्यंत जाला. उप-रांतिक नानां आपले घरास आले. इंग्रजाकडील वकीलही आपल्या डेऱ्यास गेले. खिलवतीचा भाव मुख्य प्रकार यैकिल्यात आला की इंग्र-जाचे मानस हैदर नायेकासी बिघाड करावां, आमचे मदतेस फौज द्यावी, हैदरचे पारपत्य करावे. हा प्रकार जाल्यास तुमचे आमचे दारमदार सर्व होतील. वसई वगैर स्थळे तुमची तुम्हास देऊ यैसी त्याची बोलणे आहे. कारभाऱ्यानी वकीलाचा खुलासां पाहण्यास उतर केले की तुम्ही हैदरसी बिघाड करा म्हणतां व फौज मागतां त्यास आम्हास तुमचे मसलतीमुळे खर्च फार जाला व कोठीलही मोहिम न जाली फौजेचे

खर्चास क्रोड रुपये तुम्ही दिल्ह्यास ह्राही प्रकार घडल. आणिक कितिक प्रकारे भाशणे जाली या आन्वये खिलवतीचे वर्तमान यैकिल्यात आले. पुढे येविशीचे वर्तमान जे ध्याणास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. शृत होये. प्रस्तुत हरीपंत वगैर मिळून येथे फौज नवदाहा हजारापर्येत येथे जमा आहे. शृत होये. पहिले हैदर नायेकानी यास पत्रे लिहिली होती की बंगाल्यास फौज तुम्ही रवाणा केल्यास पंचवीस लक्ष रुपये खंडणीचा यैवज दुसाला तुम्हास पाठऊन देऊ. त्याजवरून बंगाल्याचे मोहिबीस भवाणी सिवराम यास डेरे दाखल करविले आहे. नाईक मजकुराकडून खंडणीचा यैवज आल्यास पुढे भवाणी सिवराम याचे रवाणगीचा विचार येसे आहे. शृत होये. छ१६ रोज गुरुवार राजश्री बज्याबा पुरधरे याचा खड अडीच लक्ष रुपये जाला. त्यास सोडितात हे पूर्वी येक दोन पत्री लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. बज्याबास आनावयास दोनसे स्वार व येक कारकून गेला. बज्याबा पुन्यास येणार येथेच राहनार. शृत होये. राजश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा खिलवत जाला उपरातिक नाना आपले घरास आले. खिलवताचा भाव यैकिन्यात आला की उदईक श्रीमंत व नाना होलकराचे येथे लग्नास जाणार व हरीपंत येथे राहनार येसा निश्चये जाला. त्यास उदईक शुक्रवारी श्रीमंत व नाना होलकराचे येथे लग्नास वाफगावी जाणार. शृत होये. कासीचे राज्याकडील वकील येथे आला आहे. त्याची व कारभाऱ्याची भेट जाली होती. श्रीमताची भेट जाली नवती. त्यास आज श्रीमताची भेट कासीचे राज्याकडील वकीलानी घेतली. श्रीमतास वस्त्रे वगैर दिल्ही. शृत होये. उदईक शुक्रवारी दो प्रहरा श्रीमत व नाना वाफगावी होलकराचे येथे लग्नास जातात. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

A. R. No. 181

१८ सफर ११९६ हिजरी
२ फेब्रुवारी १७८२

पैा छ२५ माहे सफर सन ११९६ हिजरी, शनिवार च्यार घटिका दिवस शेष राहेममई मये दारोगे हरकारे.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ता। छ १८ सफर, माघ वद्य पंचमी, शनिवारपर्यंत वास्तव्य पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ१७ माहे मारी हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डाकेवर पाठविले तें पाऊन वर्तमान श्रुत जाहले असेल सांप्रत हुजूर अर्जी व अखबार व पृथक पुरवणी पत्रीं स्वामीचे सेवेसी वर्तमान लिहून डांकेवर रवानगी केली आहे. दारोग्याचे विद्यमानें पत्रे हुजूर व स्वामीचें सेवेसी पावतील. माहदाजी सिंद्यानीं तोतियाचें पारपत्य केले व सखारामपंत व मोरो बाबूराव वगैरेस कैद केले याचा गरूर बहुत जाहला व समग्र कारभार आपण करावयाची इछा करीत होते याकरितां हरीपंत वगैरे कारपरदाजांस असाध्य होऊन सिंद्यांस खारज केले व होळकराचे बानीकार हरीपंत जाहले याकरितां होळकराची खातरदारी हरीपंत व बाळाजीपंतास बहुत आहे. सांप्रत तुकोजी होळकराचे इछेप्रमाणे वाफगांवास लग्नास जावयाकरितां छ १८ माहे मारी पंतप्रधान डेरे दाखल जाहले. उदईक छ १९ रविवारी कारभाऱ्यांसहित स्वार होऊन वाफगांवास जाणार. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणे अज इा। छ १७ सफर लगायत छ १८ माहे मार सन ११९६ हिजरी, माघ मास शनिवार.

तुकोजी होळकरांनी पंतप्रधानास लग्नास यावयाची आक्षत देऊन छ १३ रोजीं वाफगांवास गेले. माहदाजी सिंदे झासीस येणार व छावणी उजनीस करणार म्हणोन खारिज वर्तमान हैदरआली-खानाचे तरफेनें आपाजीराम फौजेचे निगाहदास्तीकरितां बादामीस येणार म्हणोन खारिज यैकिले व पंतप्रधान व बाळाजी जनार्दन वाफगांवास लग्नांकरितां जाणार याविरिक्त अवातर वर्तमानासहित हुजूर अर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान हुजूर व स्वामीचे सेवेसी श्रुत जाहले आसेल. त्याउपरी प्रत्यक्ष व यैकिले वर्तमान दफेवार सेवेसी लिहिले आहे

वाफगांवास होळकराचेथे लग्नास जाण्याकरितां छ १७ माहे मार शुक्रवारी अस्तमानी बाळाजीपंत डेरे दाखल जाहले व पंतप्रधानानी सुमुहूर्तानें प्रातःकाली डेरे दाखल व्हावें म्हणोन निश्चय केला

छ १८ माहे मार शनिवारी अरुणोदई पंतप्रधान हवेलीहून स्वार होऊन डेरे दाखल जाहले. बाळाजीपंत व हरीपंत वगैरे लोकांनी नजरा केल्या. तोफांची शलक जाहली. छ मारीं मुकाम जाहला छ १९ माहे मार रविवारी नव कोसाचे कुच्याचा नेम जाहला भीमातीर पिंपळगावासमीप मुकाम होणार. छ २० सोमवारी वाफगावास जातील. हरीपंत वगैरे तमाम सरदारांनी हमराह जावें म्हणोन तजवीज जाहली आहे. भवानी सिवराम व खंडेराव त्र्यंबक वोढेकर पुण्यासमीप राहणार.

बज्याबा पुरंदरे चंदनगडातर कैदेत आहेत. त्यास गडाहून काढून पुण्यास आणावयाची तजवीज कारपरदाजानी केली आहे. कारकून व पागाचे स्वार शंभर छ १७ माहे मारीं रवाना जाहले आहेत. मुबईस इंगरेजांची जाहाजं सतरा जंगी सरंजामासुधां आली म्हणोन खारिज यैकिलें.

पंतप्रधानासमागमे पांचसात हजार फौज व दोनतीन हजार बार वगैरे जाणार. डेऱ्याचे गिर्दनवाह व स्वारींत नेमिले लोकानी चालावें व राहावे व चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त विशेष केला आहे.

नूरमा।खान व नरसिंगराव वकील नि।। हैदरआलीखान वगैरे समग्र श्रीमंतासमागमें जाणार. याउपरी जे विशेष वर्तमान होईल ते सेवेसी लिहीन हे विनती.

---

**A. R. No. 182**

१९ सफर ११९६ हिजरी
३ फेब्रुवारी १७८२

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता। छ १९ माहे सफर मु।। का। पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ १७ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्रातःकाली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान होळकराचे येथे लग्नाग श्रीमंत व नाना वगैरे कारभारी जाणार यैसा निश्चये ठरला होता हे विनंतीपत्री लेखन केले होते. मागती निश्चये कारभारी याणी ठराविला की श्रीमंतास न नेता आपणच जावे व हरीपंतानी येथेच राहावे. यैसा निश्चय करून दोन घटका दिवस शेष राहातां नाना लग्नास जावयाकरितां डेरे दाखल जाले. प्रथम प्रहररात्रीस वाफगांवाहून होलकराकडून रा। पाराजीपंत येथे आले. कारभारी याची भेट घेतली, सांगितले कीं होलकरानी लग्नास श्रीमतांस व आपणास अगत्यरूप बोलाविले आहे. त्याजवरून कारभारी याणी निश्चये ठराविला की श्रीमंतासही लग्नास घेऊन जावें. मागील दोन घटिका रात्र शेष राहाता मोहर्त करून श्रीमंत वाफगावी होलकराचे येथे लग्नास जावयाकरितां डेरे दाखल होणार. श्रुत होये. छ १८ रोज शनवार दोन घटिका रात्र शेष राहाता श्रीमंत पंतप्रधान वाफगावी होलकराचे येथे लग्नास जावयाकरितां डेरे दाखल जाले. डेरे दाखल होता तोफा वगैरेची सिलक जाली. तमाम मुत्सदी वगैरेही लग्नास जातात. श्रीमंताचा मुकाम आज डेऱ्यास जाला. उदईक रविवारी श्रीमंत पंतप्रधान व नाना व हरीपंत वगैरे कूच करून

वाफगांवी होलकराचे येथे लग्नास जातात. येथून वाफगाव तेराचवदा कोस आहे. मधे येक मुकाम करून सोमवारी लग्नाचे दिवसी वाफगावी पोहोंचणार. तीनच्यार दिवस वाफगावी राहून लग्न-समारंभ करून मागती श्रीमंत व कारभारी वगैर पुण्यास येणार. श्रीमंतासमागमे पांचसात हजार फौज जाणार. इंग्रजाकडील वकील येथे आहेत त्यांसही समागमे घेऊन जाणार, यैसी योजना केली आहे. श्रुत होये. गणेशपंत बेहरे पांच्यार हजार फौजेनसी कोडाई-बारीवर होते, त्यास होलकराकडील कांहीं हजार दोन हजार फौज व दोनतीन हजार पेंढारी मिळाले. याप्रो गणेशपंतापासी जमाव जाला. प्रस्तुत वर्तमान आहे कीं गणेशपंत पांचसात हजार फौजेनसी कोंडाईबारी उतरून खाले गेले. इंग्रजाकडील पलटणे दोनतीन व कांही„फतेसिग गायेकवाडाकडील फौज सोनगडास आहे. त्या पलटणासी व गणेशपंत बेहरे यांसी लडाई होणार यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. श्रुत होये. इंग्रजाचे पातशहाकडून विलायेतीहून नवदहा जहाजे जंगी ममईस आली हे विनंतीपत्री लेखन केलं होते त्याजवरून श्रुत जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आहे की विलायेतीहून इंग्रजाची जाहजे जंगी नवदापधरा ममईस आली. ते जहाजे चिनापटणास इंग्रजाचे मदतीस जाणार. चिनापटणाकडे इंग्रजासी व हैदर नाइकासी लडाईचा प्रसंग आहे यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. इंग्रजाकडील वकील येथे आहे. त्या पो येक इंग्रज ममईस गाडराकडे कांही जाबसालास जाणार यैसे वर्तमान आहे. गेल्यास सेवेसी लेखन केले जाईल. श्रुत होये. उदईक रविवारी श्रीमंत व कारभारी भोज्यनउतर स्वार होऊन वाफ-गावास जाणार. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल छ १० माहे सफरचे आज्ञापत्र डाकेसमागमे सादर केले ते छ १७ माहे सफरी पावले पावोन संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. N. 183

२५ सफर ११९६ हिजरी
९ फेब्रुवारी १७८२

पैा छ ३ रबिलावल सन ११९६ हिजरी शनिवार अडीच प्रहर दिवस आल्यावर मये दारोगे हरकारे.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल तां छ २५ माहे सफर मुा पुणे स्वामीचे कृपोवलोकणेकरून येथास्थित जाणून स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २१ माहे मजकूर रोज मंगलवारी प्रहर दिवस चढतां वाफगावचे मुकामीहून विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान श्रीमंत व कारभारी वगैर होलकरांचे येथे मांडवात गेले होते. नाच वगैर जाला. उप्रांतिक श्रीमंतास येक पोशाक दिल्हा चार घटका नाच वगैर पाहून उप्रांतिक श्रीमंत व कारभारी वगैर आपल्या डेऱ्यास आले. शृत होये. छ २२ माहे मजकूर रोज बुधवार चार घटका दिवस शेश राहतां श्रीमंत होलकराचे घरास गेले होते. होलकराचा वाडा वगैर पाहिला. दोन घटका वाड्यांत बसले होते. उप्रांतिक श्रीमंत व कारभारी वगैर वाड्यांतून माडवात आले. घटका नाच वगैर पाहिला. होलकरानी श्रीमंतास बादली पोशाक दिल्हा व मोत्याची कंठी दिल्हीं व सिरपेंच दिल्हा व हाती येक लाहाणं छावा त्याजवर जरी जिण व जरी झूल होती. या सरंजामानसी हाती दिल्हा व येक घोडां दिल्हां. याप्रमाणे श्रीमंतास देऊन माडव्यापासून येका बाणाचे अंतराने टेकडी होती त्या टेकडीवर श्रीमंतास व कारभारी वगैर यांस आतशबाजीचा तमाश्या पाहावयास होलकराने नेले. दोन घटका आतशबाजीचा तमाशां पाहिला. उप्रांतिक श्रीमंत व कारभारी आपल्या डेऱ्यास आले. उदईक श्रीमंत रुकसत होऊन पुण्यास कारभाऱ्यासहित जाणार. शृत होये. छ २३

माहे मजकूर रोज गुरुवारी श्रीमंत व कारभारी वगैर याचे कूच जाले. होळकराचे येथे निरोपास श्रीमंत व कारभारी व मानकरी सरदार वगैर मुतसदी गेले. श्रीमंतास येक बादली पोशाक दिल्हा व नानास पोशाक व सिरपेंच दिल्हा व हरीपंतास पोशाक व येक सिरपेंच दिल्हा व मानकरी व मऱ्हाटे सरदार व मुतसदी वगैर यांस साडेतीन वस्त्रे दिल्हीं. याप्रमाणे रुकसती होऊन प्रहर दिवस शेश राहातां श्रीमंत व कारभारी वगैर वाफगावीहून स्वार जाले ते पांच कोस मुकामास पिपगावास आले. उदईक शुक्रवारी दोन घटका दिवस पूर्व येतां वाड्यात दाखल व्हावें मुहूर्तानसी म्हणोन मध्येरात्री कूचाचा नगारा केला. दीड प्रहर रात्र शेश राहता श्रीमंत व कारभारी वगैर स्वार जाले ते शुक्रवारी प्रातःकाली पुण्यास दाखल जाले मुहूर्तानसी श्रीमंत व कारभारी वगैर आपल्या वाड्यात दाखल जाले शृत होये. छ २८ माहे मजकूर रोज शुक्रवार श्रीमंत येक घटका दिवस पूर्व येतां पुण्यास आपले वाड्यांत दाखल जाले. तोफाची वगैर सिलक जाली. नानाही आपले वाड्यात दाखल जाले व हरिपंत बाहेर आपले डेऱ्यास राहिले. पाचच्यार दिवस लग्नप्रसगाचाच समारंभ जाला. विशेष काही वर्तमान नाही. श्रीमंत व कारभारी वगैर तीनच्यार दिवस लग्नप्रसगास वाफगावी होते. नित्य येक पोशाख श्रीमंतास होळकर देत होते. रुकसतीच्यां वेळेस हाती व घोडा व जोहर वगैर श्रीमंतास होळकरानी दिल्हे व नानासही तीन पोशाक दिल्हे व हरीपंतासही दोनतीन पोशाक दिल्हे. बाकी लोकास वगैर वस्त्रे दिल्ही. याप्रमाणे पाचच्यार दिवस लग्न समारंभ होऊन श्रीमंत व कारभारी वगैर पुण्यास आले. श्रीमंता-समागमे पांचसात हजार फौज होती. शृत होये. राजेश्री बज्याबा पुरंधरे याची मुक्तता जाली. त्यास आणावयास स्वार व कारकुन गेले होते. हे पूर्वी येकदोन पत्री लेखण केले होते त्याजवरून शृत जाले असेल. आज बज्याबा पुरंधरे पुण्यास येऊन आपले वाड्यात दाखल जाले. श्रीमंताची व कारभाऱ्याची भेट उदईक होणार. भेटी वगैर जाल्यानंतर लेखण केले जाईल.

विदित होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते लेखण केले जाईल. शृत होये. छ १७ माहे मजकूरचे आज्ञापत्र डांकेसमागमे सादर जाले ते छ २४ माहे मजकुरी पावले. पाऊन बहुत संतोप जाला. पहिले दोनतीन विनंतीपत्री गावखेड्याविशी मजकूर लिहिला होता की सिवरामपंत वगैर यानी यैवज घेतला आहे ते देत नाहीत, येविशी कृष्टणरावजीस मांगावे. त्याजवरून आज्ञापत्री सादर केले की तुमचेविशी रावजीस सांगतो. त्यास सर्व प्रकारे आमचा अभिमान स्वामीस आहे. आम्हांविशी कृष्टणरावजीस खचित सांगावे की गावखेड्यास उपद्रव न होये. घेतला यैवज माघारा ये, याप्रमाणे रावजीस ताकीद व्हावी. सर्व प्रकारे माझा अभिमान स्वामीस आहे. बहुत कार्ये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 184** — २६ सफर ११९६ हिजरी
१० फेब्रुवारी १७८२

पैा छ ४ रबिलावल सन ११९६ हिजरी रोज रविवार मये दारोगे हरकार तीन प्रहर दिवस आल्यास पावले.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता २६ माहे सफर मुा पुण स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे विशेप येथील वर्तमान छ २५ माहे मजकूर रोज शणवारी प्रा थकाली विनंतीपत्र श्रीमंत व कारभारी वगैर वाफगावीहून लग्नप्रसंग होलकराचे येथील करून पुण्यास आल्याचे व राजश्री बज्याबा पुरधरे किल्याहून मुक्त करून पुण्यास आणिले हे सविस्तर वर्तमान लेखण करून डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्याणास येईल. तदनंतर येथील वर्तमान

राजश्री बज्याबा पुरंधरे पुण्यास आपले वाड्यात आहेत. सत्रा आठरां मानसे त्याचे निसबतीस पहिलेपासून ठेविले आहेत तितके मात्र त्याजपासी आहेत. बाकी आसपास चौकमीस आसपास पंचवीस तीस गारदी आहेत. येका दो दिवसानी श्रीमंताची व कारभारी वगैरे याची व बज्याबाची भेट होणार. भेटी जाल्यानंतर चौकी वगैरे उठवितील यैसे आहे. राजश्री धोंडोबा आपा पुरंधरे बज्याबास जामीन जाले आहेत. अडीच लक्ष रुपये त्याचा खंड जाला. प्रस्तुत बज्याबा आपले वाड्यात आहेत पुढे त्याजकडील जे वर्तमान ध्यानास येईल ते लेखण केले जाईल. इंग्रजाकडील वकील येथे आहेत. त्याजला कासीकडील इंग्रजाचे पत्रे आली. ते पत्रे कारभाऱ्याकडे धरली आली पत्रे फाडून त्याची चौकसी करणार. पत्राची चौकसी होऊन वर्तमान कळल्यावर लेखण केले जाईल. श्रुत होये श्रीमंत पर्वतीस देवदर्शणास गेले होते. दर्शण करून संध्याकाली वाड्यात आले. विदित होये श्रीमंतास होलकरानी लग्नप्रसंगात तीनच्यार पोशाक व हांती व घोडा व ज्यव्हायेर वगैरे दिल्हे व कारभारियास वस्त्रे वगैरे दिल्ही हे वर्तमान विनंतीपत्री लेखण केले होते त्याजवरून ध्यानास येईल. विदित होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती

---

**A. R. No. 185**

२ रबिलावल ११९६ हिजरी
१५ फेब्रुवारी १७८२

पै॥ छ ९ रावल फाल्गुण शुध दशमी रविवार प्रथम प्रहर डाकेबरोबर पत्रे आली सन ११९६ हिजरी.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता॥ छ २ माहे रबिलावल मु॥ पुणे स्वामीचे कृपावलोकनकरून येथास्थित जाणोन स्वानंद

लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २६ माह सफर रोज रविवारी प्रात:काली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान सिवरात्र म्हणोन श्रीमंत व नाना वगैर पाशाणास दोन कोस देवदर्शनास गेले होते. दर्शन करून संध्याकाली वाड्यात आले. श्रुत होये. दरबार वगैर जाला न होता. विदित होये. छ २७ रोज सोमवार इंग्रजाचे वकील येथे आहेत. पहिले त्यांचा येकदोन खलवत जाला त्याचा भाव पूर्वीच विनंतीपत्री लेखन केला होता त्याजवरून ध्यानास आले असेल. प्रस्तुत आठपंधरा दिवस जाले त्यांचे काही खिलवत जाले नाही. उभयेपक्षीही मुदे भारीच. तेव्हा राजकारण होणे कठीण आहे. वकीलानी ममईस पत्रे लिहिली आहेत त्याचे उतर प्रतिउतर काये येऊन जावसाल होईल हे पाहावे परतु इग्रजाचे राजकारण होणे दीर्घसूत्रावर आहे. श्रुत होये. हैदर नाइकाकडील वकील होलकराचे येथे लग्नास गेले होते. नाईक मजकुराकडील आहेर वकीलानी होलकरास येणे प्रो। केला. वस्त्रे व येक मोत्याची कंठी व येक सिरपेंच या प्रो। आहेर केला. आहेराचा मुबादला होलकर नाईक मारास वस्त्रे वगैर जवाहराचे डागिने येकदोन पाठविणार. श्रुत होये. दरबार वगैर जाला होता माली व मुलकी वगैर कामकाज जाले. श्रुत होये छ २८ रोज मगलवार राजश्री मानाजी फांकडे हे इकडे बालेघाटाकडे होते. तेथून से दोनसे राउतानसी निघोन अजठ्याचे घाटाखाले फरदापुराजवल खांदेश प्रांती डोंगरात वशागडावर भिल वगैर मेलऊन खूळ केले हे पूर्वी विनतीपत्री लेखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असेल. त्यास फाकडे मजकूर याणी से दोनसे राऊत व भिल वगैर पाचसातसे माणसे मेलऊन वशागडावर खूळ केले आहे त्याचे पारपत्यास येथून दोनतीन पागा मिळून पांचसातसे राऊत पाठवावे येसा निश्चये जाला आहे. येका दो दिवसानी पागा रवाना होणार. रवाना जालिया लेखन केले जाईल. दुसरे, फाकडे मजकूर याणी खूळ केले म्हणून त्याचे पारपत्यास

शहरीहून सुभ्याकडून कांही धौस गेली यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. राजश्री बज्याबा पुरधरे येथें आले हे येकदोन विनतीपत्री लेखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असल. बज्याबाची व श्रीमंताची व कारभारी वगैर यांची अद्याप भेट जाली नांही. अद्याप त्यांजवर चौकीपाहरा आहे. जामनी वगैरचा फडशा जाल्यावर त्यांजवरून चौकी उठवावी यैसा निश्चये जाला आहे. श्रुत होये. छ २९ माहे सफर रोज बुधवार श्रीमंत पंतप्रधान व नाना जेजुरीस व मोरेश्वरास व जोगाईचे आब्यास व सिध्धटेकास वगैर देवदर्शनास जाव. सर्वत्र देवाचे दर्शन करून पधरा दिवसात पुण्यास यावे यैसी यौजना जाली आहे छ २ माहे मजकुरी शुक्रवारी दो प्रहरानंतर निघणार यैसा निश्चये आहे. निघाल्यावर लेखन केले जाईल. श्रुत होये. हैदर नाइकाकडून वर्तमान आहे की नाईक मजकुरा-सी व इंग्रजासी चिनापटणाकडे मोकाबला आहे. परस्परे लढाईही होत असते. उभयेंपक्षीही जमाव भारी आहेत यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. राजश्री कृष्णरावजी माहे मजकुरी येजमानसाहेबाचा निरोप घेऊन येथे येणार यैसी वदता आहे. श्रुत होये दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. श्रुत होये. छ १ माहे मजकूर रोज गुरुवार श्रीमंत पंतप्रधान व नाना वगैर मुत्सदी मंडली श्रीजेजुरीस व मोरेश्वरास व सिध्धटेकास वगैर देवदर्शनास जांवे यैसा निश्चये जाला. सर्वत्र देवदर्शन करून दाहा-पधरा दिवसांत पुण्यात यावे यैसा निश्चये करून उदईक शुक्रवारी दो प्रहरानंतर श्रीमंत व नाना वगैर निघणार नानाचा निश्चये आहे की श्रीमंतासमागमे जेजुरीपावेतो जावे, तेथून आपण मेनवलीस कृष्णातीरास जाणार व श्रीमंत मोरेश्वर वगैरस देवदर्शनास जाणार यैसे ठरले आहे. उदईक शुक्रवारी मोहोर्त करून श्रीमंत व नाना निघणार. हरीपंत येथे राहणार. मजमदाराचे यथे लग्न आहे. तेही श्रीमंतासी व कारभारी यासी रदबदली करितात की लग्नप्रसंग करून दो चौ दिवसानी निघावे. त्यांचे येथे उदईक शुक्रवारचे लग्न आहे म्हणून ते रदबदली करितात परंतु श्रीमंताचा व नानाचा निश्चये

उदईक निघावयाचा जाला आहे. दो प्रहरानंतर निघणार. तयारी वगैर करितात. मोहर्त करून निघोन स्वार जाल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. राजश्री नाना हरिपंताचे डेरियास गेले होते. उभयेताचा खलवत जाला. खलवत होऊन नाना आपले घरास आले. खलवताचा भाव यैकिल्यात आला कीं उदईक शुक्रवारी छ मजकूर माहे मारी दो प्रहरानंतर श्रीमंत पतप्रधान व नाना वगैर बाहेर निघोन जेजुरी वगैर देवाचे दर्शनास जाणार व हरीपंत येथें राहणार. श्रीमंत वगैर स्वार जालिया लेखन केले जाईल. श्रुत होये. राजश्री धोडोबा आपा पुरंधरे, बज्याबाचे चुलते, ते बज्याबास जामीन होणार होते. त्यांचेच विद्येमाने बज्याबा आले. त्यांस दोनतीन दिवस समाधान वाटत नव्हते. आज धोडोबा आपा पुरंधरे शांत जाले. बज्याबास सुतक आहे. श्रुत होये. शक्रमनाचे तील शर्कायुक्त सादर केले ते पावले. तील पावले, अज्ञापत्रे नव्हती. तील बहुत प्रीतीकरून स्वीकारिले. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 186** — ३ रबिलावल ११९६ हिजरी

१६ फेब्रुवारी १७८२

पैा छ १० माहे रबिलावल संन ११९६ हिजरी रोज शेनिवार घटका रात्री डांकेवर मै दारोगा हरकारा.

श्रीनिवास ११४

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ता छ ३ माहे रबिलावल फाल्गुण शुध चतुर्थी शनिवारपर्यंत वास्तव्य पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ २ माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें

असेल सांप्रत अखबारेसहित अर्जी व पृथक पत्रीं येथील वर्तमान लिहून स्वामीचे सेवेसी पाठविलें आहे. दारोग्याचे विद्यमानें पत्रे सेवेसी पाऊन वर्तमान श्रुत होईल हैदरआलीखानांचे वकीलासी व उभयता कारभाऱ्यासी छ २ माहे मारचे रात्रीस व छ ३ शनिवारी येकांत बहुत जाहला. कोण्ही स्नेहिताचे मुखं खिलवतेचा खुलासा यैकिला कीं मुंबईकर इंगरेजाचा वकील उदेष्टेण ज्वाबसालाकरिता आला आहे. त्यास निश्चयरूप रुखसत करावें व कृष्णराव बल्लाळ यांस हुजूरीहून बोलाऊन आणावें, दारमदाराचा ज्वाबसाल सर्वथैव इंगरेजासीं न करावा येविषईचा निश्चय कारभाऱ्यांपासून वकीलानी करून घेतला आहे. बालाजीपंत फडनीस मेनवलीहून आल्यानंतर जें आमलांत येईल व पुन्हा तहकीक वर्तमान कळेल तें हुजूर व स्वामीस लिहून पाठवीन मौजे मधळवाडीचे दहकचे यैवजीं व जमीदाराचा हक रुसूम त्यास न देतां श्रीमंतास द्यावा या दोन्ही बाबतीचे यैवजावर पांचसे रुपये हवल माहावत पागे यास रुपये देणे म्हणोन कारभाऱ्यानी वरात सेवकावर केली याचा विस्तार पृथक पुरवणींत लिहिला आहे. जमीदार जबरदस्तीनें स्वार प्यादे पाठऊन हक रुसूम नेत आहेत व दहकचे रुपये रयतीस सिवाय जमाबंदी मागितल्यास पळून जातात या अर्थी येन मालात द्यावे व दोनच्यार वेळा पटी जाहली. परंतु सेवकास तगादा जाहला नांही. सांप्रत तगादा जाहला या अर्थी रुपये व इनामी सनदा राजश्री बालाजीपंत नाना व हरीपंतासमीप नेऊन देतों. सारांश, हुजूरचे लोकांचा उपयोगी कांही नाही याकरिता बेगरजीनें उपेक्षा करीत आहेत पुरवणीपत्रावरून वर्तमान सेवेसी श्रुत होईल व चिरंजीवही विनती करतील. बहुत काय लिहिणें हे विनंती.

— —

पौा छ १७ माहे रबिलावल सन ११९६ हिजरी रोज शनिवार.

श्रीनिवास

पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंती जे सेवक हुजूरचे तरफेनें सतराअठरा वर्षे श्रीमंत पंतप्रधानांचे सेवेंत

आहे. वैकुंठवासी माधवराव कृपा करीत होते व त्या समयापासून अजीपर्यंत कारभाऱ्यांची कृपा चितापासून होती. राजश्री कृष्टण-रावजीनी हुजूरचा इनायननामा मुतजमनतलब यावा याकरितां चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांचा गौरव कोणते प्रकारें करून चिरजीवास हुजूर मार्गस्त केलें हे रावजीसच विदित. हुजूर गेल्यानंतर रावजी पंतप्रधानांचे नौकर असून हुजूरचे येकनिष्ठ याकरितां रावजीनी चिरंजीवाचा परित्याग करून आपले मसलहतीतून खारिज केलें व रावजीस व येथील कारपरदाजांस स्पष्ट उमजलें कीं हैबतराव गोपाळ यांसी आम्हांस कांहीच गरज नांहीं व सेवकाची रीत येक-निष्ठतेची, दुरुई नाही. येक हुजूरचीव दौलतख्वाहीचें लक्ष व हुजूरचा नफा होऊन पतप्रधानांची सेवा घडावयाचें जे काम त्याजविषई पूर्वी बहुत वार सेवा केली व सांप्रत कृष्टणरावजीस इनायतनामा येण्याचा उपाय करून रावजीस हुजूर नेलें हें सर्वत्र प्रसिध. परंतु येथील कारपरदाजास स्पष्ट उमजलें की हैबतराव यांजवर रियायत करावयाचें प्रयोजन नांहीं छ ८ माहे मारी ‹पतप्रधानासमागमें जावयाकरिता सेवक सिधता करून जावयाचे उद्योगात. या संधीत मुधोळवाडीचे दहकाची वरात पांचसे रुपयाची सेवकाचे नावं जाहली हें वर्तमान कळले व फडनीसाचे कारकुनानीं सेवकाचे गुमास्त्यास बोलाऊन सांगितलें व अस्तमानी हवल माहावतानें वरात व माणसे पा-ठविलीं कीं रुपये बरातेप्रमाणे बारगीर लोकांचा तगादा सख्त याकरितां राजश्री हरिपंताकडें चिरजीव केशवराव यांस पाठविलें व निरोप पाठविला कीं मौजें मुधोळवाडी दरोबस्त गांव सरकारांत घेणें, सनदा माधारा आणून देतों. त्यावरून हरिपततात्यानी हवल माहावतास सांगोन पाठविले की बाळाजीपतनाना येजोपर्यंत तगादा न करणे. त्यावरून फडनीस येजोपर्यंत तगादा होणार नाही यैसें वाटतें. बाळाजी-पंतनाना व हरीपंत पुण्यास आले म्हणजे वरातेप्रमाणें पांचसे रुपये व इनामी सनदा रो हरीपंतास व नानास नेऊन देतों इतका किसा त्याह्मावयाचें कारण यैसे जे स्वामी प्रतिष्ठेनें आम्हास ठेवतील तरीच येथे प्रतिष्टा व हे लोक भीड वागवितील. यजमानसाहबांसमीप

आमची मातबरी व येतमाद नांही त्यापक्षी यानीं किमर्थ भीड धरावी हे विनंती.

---

पैा छ १० माहे रबिलावल रोज शनिवार घटका रात्री डांकेवर.

श्रीनिवास

अखबार लष्कर पंतप्रधान अज इा छ २ रबिलावल लगायत छ ३ माहे मार सन ११९६ हिजरी शनिवार.

श्री जेजोरी व मोरेश्वरचे यात्रेकरितां पंतप्रधान छ २ माहे मारी कूच करून थेऊरचे मुकामास जाणार बाळाजीपंत व हरिपंत पंतप्रधानाचे समागमें जात आहेत व मानाजी फाकड्याचे नबीकरिता दारकोजी निंबाळकर, पागे व खंडेराव त्र्यंबक वगैरे तीन हजार फौजेनसी जात आहेत याव्यतिरिक्त आवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविले ते पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचे वर्तमान दफेवार लिहिले आहे

छ २ माहे मार शुक्रवारीं अडीच प्रहर दिवस आल्यानंतर पंत-प्रधान आपले हवेलीहून पालखीत बसून स्वार जाहले व पुण्याहून दोन कोसाचे फासल्यानें मौजे वानवडीसमीप डेरे दाखल जाहले. बाळाजीपंत व हरीपंत पंतप्रधानांचे हमराह मुकाम मारी डेऱ्यास गेले. पंतप्रधान थेऊरचे मुकामास जाणार म्हणोन पूर्वील अखबारेंत लिहिलें होते. त्यास राजश्री बाळाजीपंतास मौजे निघोने म्हणोन पुण्यांहून आठ कोस पश्चमेस आहे तेथें माहापुरुष नवीन दोन वर्षा-पासून उत्पन्न जाहला आहे त्याचे दर्शनास जाणें जरूर व तेथोन सेनवलीसही जाण्याची जरूरी द्वितीय समध करीत आहेत म्हणोन सर्वत्र जनवदता याकरितां कितेक मातबर, निस्बत लक्ष्मणराव रास्ते यांनी बाळाजीपंतास विचारिलें जनचर्चा खरी म्हणोन उत्तर केलें सारांश, बाळाजीपंतास छ ४ माहे मार रविवारी निघोऱ्यास जाणें व हैदरअलीखानाचे वकीलासी बोलून खान मारीकडे पत्र लिहून पाठवणें याकरितां थेऊरास मुकाम करावयाची तजवीज मवकूफ करून वानवडीसमीप मुकाम केला.

छ २ माहे मार शुक्रवारचे रात्रीस लक्ष्मणराव रास्ते व नूरमाखान व नरसिंगराव वकील नि।। हैदरअलीखान लष्करांत बालाजीपंताचे डेऱ्यास गेले. हरीपंत व बालाजीपंत बइतिफाक उभयतां वकील व लक्ष्मणराव रास्ते यांसीं नव घटका रात्रपर्यंत खिलवत जाहली. त्या उपरी रास्ते पुण्यास आले छ ३ माहे मार शनिवारीं हैदरअली खानाचे वकीलासी पुन्हां खिलवत करून दोन प्रहर दिवसानंतर बाला-जीपंतानी कूच करून निधोन्यास जावें व पंतप्रधानाचा मुकाम होऊन दोन प्रहर रात्रीं कूच करून जावयाची तजवीज सिध जाहली. छ ३ माहे मारीं पंतप्रधानांचा वानवडीसमीप मुकाम जाहला. हैदर अलीखानांचे वकील नूरमाखान व नरसिंगराव बालाजीपंताचे डेऱ्यास आले.

२

पुरवणी अखबार लश्कर पंतप्रधान छ ३ रबिलावल सन ११९६ हिजरी. तीनच्यार घटका खिलवत जाहली. त्याउपरी वकील मार पुण्यांस आले व बालाजीपंतानी कूच करून मौजे निधोन्यास सित्ध-पुरुषाचे दर्शनास गेले. छ मारचे रात्रीस पंतप्रधानांचे कूच होऊन वडकीचे घाटानें जेजोरीस जाणार. समागमें हरिपंत व पांचसात हजार फौज व दोन रहकले आहेत.

मौजे निधोनें, पुण्याहून आठ कोस तेथें श्री भैरवनाथ देव आहे. त्या देवाचा पुजारी गुरव, त्यानें बारा वर्षेपर्यंत अन्न न खातां दूध पिऊन देवाची सेवा व अनुष्टान केले. देव प्रसन्न होऊन जे बोलसील त्याप्रमाणे कार्य होईल म्हणोन स्वप्नांत देवानें सांगितलें. त्याउपरी वर्षपर्यंत निधोनचे राहणार लोकास चमत्कार आले या गोष्टीची चर्चा प्रसिध जाहली व पालखीनिसीन व हतीनिसीन लोक यात्रेस येऊन माहा-पुरुषाचें दर्शन घेऊन दोन महिने च्यार महिने राहत आहेत ज्यास संतान नांही त्यास पुत्र जाहले व रोग्यांचे रोग जात आहेत म्हणोन सर्वत्र लोक बोलत आहेत राजश्री बालाजीपंत फडनवीस यांस पुत्रसंतान नांहीं व स्त्रिया तीनच्यार शांत जाहल्या व सांप्रत जे स्त्री आहे ते

रोगग्रस्त याकरितां बालाजीपंत फडनवीस साल गु।। चिंचवडचे मुकामीहून तीनच्यारदां निधोन्यास गेले होते व त्याउपरी नेहमी कारकून व ब्राम्हण निधोन्यांत आहेत. सांप्रत बालाजीपत सिधपुरुषाचे दर्शनास गेले. शनिवार व रविवारीं ज्याची जे कामना असेल त्यास दाहाबारा महिने प्रति आदित्यवारी निधोन्यास येत जावे किंवा नेहमी राहांवे म्हणोन सागत आहे. शंभर मनुष्यात दाहापांचास चमत्कार येत आहे म्हणोन लोक बोलतात. प्रति आदित्यवारीं पांच हजार सात हजार लोक जमा होत आहेत.

मानाजी फांकडया तलुक वेताळासमीप वोस्वागडाचे आश्रयानें राहून पंतप्रधानाचे तालुकियांत ताखतताराज करीत आहे याकरितां छ ३ माहे मारीं दारकोजी निबाळकर वगैरे दोनअडीच हजार स्वार फाकडे माराचे तंबीकरितां रवाना जाहले.

बालाजीपंत फडनीस द्वितीय विवाह करावा याकरितां मेनवलीस जात आहेत. छ ७ माहे मारी लग्नतिथीचा निश्चय आहे म्हणोन तहकीक खारिज यैकिले.

कृष्टणराव बलाळांचे पुत्र गोविंदराव, भाचीचे लग्नाकरिता बारामतीस गेले आहेत.

पैा छ १० माह रबिलावल सन ११९६ हिजरी रोज शनिवार पटका रात्री डाकेवर.

---

A. R. No. 187 — ४ रबिलावल ११९६ हिजरी
२७ फेब्रुवारी १७८२

पैा छ १० माहे रबिलावल रोज शनिवार सन ११९६ हिजरी पटका रात्रीं मै डाक व दारोगा.

श्री

विनंती विज्ञापणा येसी जे येथील कुशल ता छ ४ माहे रबिवल मुा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्रा:थकाळी विनंती

पत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित होईल. विनंतीपत्र प्राथःकाळी रवाणां केले. विनंतीपत्री लेखण केले होते की दो प्रहरा श्रीमंत पंतप्रधान व नाना व हरीपंत वगैर मुहूर्त करून जेजुरी वगैर देवदर्शणास निघनार. त्यास दो प्रहरांनंतर श्रीमंत पंतप्रधान व नाना व हरीपंत वगैर स्वार घेऊन येथून कोस दीड कोस वानडीस मुकामास गेले. उदईक शणवारी मध्ये मुकाम करून रविवारी जेजुरीस जाणार या अर्थी येथून कूच करून वानोडीस गेले निश्चय ठेरला होता की श्रीमंत व नाना वगैर याणी जेजुरास वगैर देवदर्शणास जावे. जेजुरीहून नानानी मेणोवलीस जावे व हरीपंतानी येथे राहावे यैसे ठैरले होते. उप्रांतिक निश्चये जाला की नाना मणोलीस जानार. श्रीमंतासमागमे कोन्ही नाही या अर्थी हरिपंतानी श्रीमतासमागमे असावे. त्याजवरून हरिपंतही श्रीमतासमागमे कूच करून गेले. शृत होये. छ ३ माहे मजकूर रोज शणवार आज श्रीमताचा व हरिपताचा मुकाम वांनोडीवरच जाला. कुच्य जाले नाही. राजश्री नाना फडनीस कूच करून निघोन्यास गेले. तेथे देवदर्शणं करून परस्परे मेणोलीस कृष्णातीरास जाणार तेथे आपले स्वामगत लग्न करून दाहाबारां दिवसानी पुण्यास येनार. उदईक रविवारी श्रीमत व हरीपंत वगैर वानोडीहून कुच्य बारातेरा कोसाचे करून श्री जेजुरीस जाणार. जेजुरीहून साहा कोस मोरेश्वर आहे. जेजुरीस येकदोन दिवस राहून उप्रांतिक मोरेश्वरी गणपतीचे दर्शणास जाणार मोरेश्वरीं येकदोन दिवस राहून माघारा फिरून पुण्यास येनार. पाचसहा दिवसातच माघारा परतून येणार यैसे ठैरले आहे. येथून श्रीमत वगैर कुच्य करून गेले त्या वेळेस निश्चये होता की जेजुरी व मोरेश्वर व कुरकुंब व सिधटेक वगैर देवदर्शणे करून माघारा यावे. प्रस्तुत निश्चयात आणिले आहे की सिधटेकापावेतो न जातां जेजुरीस व मोरेश्वरास देवदर्शण करून पांचसहा दिवसात पुण्यास यावे. मग जेजुरी व मोरेश्वर करून पुढे सिधटेका पावेतो जातात किवा माघारा येतात हे पाहावे. विदित होये उदईक रविवारी कूच्य करणार. दो प्रहरांचे संधीस जेजुरीस दाखल होनार.

जेजुरीस येकदोन दिवस राहून मोरेश्वरी जाणार. मोरेश्वरी येक दिवस राहून श्रीमंत व हरीपंत वगैरे पुण्यास येनार यैसा निश्चये आहे. शृत होये. छ १ माहे मजकुरी पुण्याचे मुकामी नाना व हरीपंत याचे खिलवत होऊन दुसरे दिवसी कृत्य जाले. खिलवतात इग्रजाकडील वकीलास बोलाऊन आणिले होते इंग्रजाचे वकीलासी खिलवत जाला खिलवत होऊन इग्रजाचे वकील आपले डेऱ्यास गेले खिलवतास माधोराव सदासिव नवते. कारण की त्याची सूण शात जाली म्हणोन त्यास सुतक आहे. खिलवताचा भाव यैकिल्यांत आला की कारभाऱ्यानी इंग्रजाचे वकीलास पुसले की तुमची पत्रे ममईस गाडराकड गेली आहेत त्यास तीन वार होत आले अद्याप उतरे येत नाहीत याचा अर्थ काय? त्याजवरून वकीलानी उतर केले की आमची पत्र ममईस गाडराकडे गेली. गाडरानी आमचे पत्राचा भाव कलकत्यास लिहिला आहे. कलकत्याहून पत्रे गाडराकडे येतील त्या अन्वये गाडर मजकूर ममईहून आम्हांस लिहील यैसी सध आहे. ममईहून आमची उतरे आल्यानंतर आपणांस शृत करूं यैसे वकीलानी उतर केले परंतू उभयेपक्षी मुदे भारी आहेत. राजकारण होणे दीर्घसूत्रावर आहे ममई-हून त्याची पत्रे वगैरे आल्यारा काये वर्तमान ध्यानास येईल ते लेखण केले जाईल शृत होये. श्रीमंत उदईक रविवारी वानोडीहून कृत्य करून जेजोरीस जाणार. समागमे पांचसहा हजार फौज आहे. विदित होये. माहादाजी सिंदे आनंदीबाई निबाळकरीन इचे बधु त्यास आनंदीबाईनी आपले बंदोबस्ताकरिता सिंद्यास लिहिले होते की आमचे जाबसालाकरितां पुण्यास कोणास पाठवावे त्याजवरून सिंद्यानी राजश्री रायाजी पाा याजला कितिक कामे योजून व आनंदीबाईचे जाबसालास पाठविले. रायाजी पाा येथे येऊन दाखल जाले. सिंद्याकडील कागदपत्र दिल्हे व खिलवत वगैरे कितिक कामाविशी जाला. दुसरे, आनदीबाई निबाळकर याचे जाबसाला-विशी सिंद्याचे पत्रे कारभाऱ्यास दिल्हे व आनंदीबाईची पत्रे कार-भाऱ्यास होती ते रायाजी पाा याणी कारभाऱ्यास दिल्ही पुढे ये-विशीचे वर्तमान जे ध्यानास येईल ते लेखण केले जाईल. शृत होये

राजश्री मानाजी फाकडे यानी पाचसातसे स्वार व पाचसातस मनुश भिल वगैर मेलऊन अजठचाचे घाटाजवल वोशागडास खूल केले आहे. त्याचे पारपत्यास राजश्री दारकोजी निबालकर दि॥ पागा व रंगराव वोढेकर वगैर हजार दोन हजार स्वार रवाना केले. शृत होये. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 188

९ रबिलावल ११९६ हिजरी
२२ फेब्रुवारी १७८२

श्री

विनंती विज्ञापना येंगी जे यथील कुशल ता छ ९ माहे रैावल मुा पुण स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ ६ माहे मजकूर रोज मगलवारी प्रात.काली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागम सेवेसी रवाना केले की श्रीमंतानी श्री जेजुरीस देवदर्शन केले, देवास वस्त्रे वगैर दिल्ही, जेजुरीहून कूच करून मोरेश्वरी गणपतीचे दर्शनास जाणार, दर्शन करून येकादा दिवसा पुण्यास दाखल होणार हे सविस्तर लेखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान प्रहर दिवसपूर्व येतां जेजुरीहून साहा कोसाचे कूच केले. मोरेश्वरी देवदर्शन करून मोरेश्वराअलिकडे दोन कोसावर पांडेश्वरी मुकाम केला. मोरेश्वरी देवदर्शन करून माघारा मुकामास आले उदईक बुधवारी लोणीस राहणार. गुरुवारी पुण्यास दाखल होणार. श्रुत होये छ ७ माहे मजकूर रोज बुधवारी श्रीमंतानी कूच केले. भापकराचे लोणीस येऊन मुकाम केला. मध्यें आंबीकर रामचंद्रपंत बाबा यांचे बागात घटिकाभर बसले होते त्यानी वस्त्रे वगैर श्रीमतास दिल्ही. तेथून स्वार जाले ते आमल्यास खंडेराव दरेकराचे घरी गेले होते तेथे घटकाभर बसले होते. दरेकरानी श्रीमंतास वस्त्रे व सिरपेंच दिल्हा व हरीपंतास वस्त्रे दिल्ही. तेथू(न) निघाले तो

मध्याकाली डेऱ्यास श्रीमंत वगैरे लोणीस मुकामास आले. श्रुत होये. छ ८ माहे मजकूर रोज गुरुवारी प्रहर रात्र मागील शेष राहतां श्रीमंतानी लोणीहून कूच साहा कोसाचे केले. पांच घटिका दिवसपूर्व येता महूर्तेनिसी पुण्यास आपले वाड्यात दाखल जाले व हरीपंत वगैरे बाहेर आपल्या डेरियास गेले. श्रीमंत आपले वाड्यात दाखल जाल्यावर तोफा वगैरेची सिलक केली श्रुत होये. वैशाखमासी श्रीमंताचे लग्नाचा निश्चये जाला सरंजाम वगैरे करितात. लग्नाचे पूर्वी सातारियास जाऊन राज्याची वस्त्रे घ्यावी यैसी योजना जाली आहे. दुसरा निश्चयें आहे की हुताशनी जालियावर पंचमीस स्वार होऊन नाशकाजवल गंगापुर आहे तेथे गोपिकाबाई श्रीमंताची आजी आहे तिचे दर्शन करून पुण्यास यावे. वैशाख मासी लग्न करून उपरांतिक सातारियास वस्त्रे घ्यावयास जावे यैसाही निश्चये आहे मग हुताशनी जालियावर पंचमीचे महूर्तेआधी श्रीमंत सातारियास जातात किंवा गंगापुरास बाईचे दर्शनास जातात हे पाहावे. मग जो निश्चये होईल तो सेवेसी लखन केले जाईल. परंतु हुताशनी जालियावर पंचमीस श्रीमंत सातारियास जातील आथवा गंगापुरास जातील यैसे आहे. मग काये निश्चये करितील ते लेखन केले जाईल. विदित होये. इंग्रजाकडील वकील येथे आहेत त्या पैा येक गोरा ममईस जाबसालाकरिता गेला आहे तो आद्याप माघारा आला नाही इंग्रजाचे वकीलानी ममईस व कलकत्यास पत्रे लिहिली आहेत तेथून उतर आल्यावर पुढे जाबसाल होणार यैसे आहे. श्रुत होये सिंदे हिंदुस्थान पाती आहेत शिंद्यास कासीचा राजा येऊन भेटला आहे सिंद्यास कासीचा राजा म्हणतो की पंचवीस लक्ष रुपये घ्यावे व कासीचे ठाणे इंग्रजापासून आमचे घेऊन द्यावे. सिंदे म्हणतात की गाऊण क्रोड रुपये द्यावे तुमचे कासीचे ठाणे आम्ही घेऊन देऊं यैसे सिंद्याकडील वर्तमान आले आहे. विदित होये. राजश्री नाना फडणीस मंणोलीस गेले आहेत ते छ १२ माहे मारी पुण्यास येणार. श्रुत होये होलकर वाफगावास आहेत. श्रुत होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. श्रुत होये. छ २७ माहे सफरचे आज्ञापत्र

डाकेसमागमे सादर केले ते छ ७ माहे मारी पावले. पावोन संतोश जाला सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 189

११ रबिलावल ११९६ हिजरी
२४ फेब्रुवारी १७८२

श्री

पैा छ १९ रो सोमवार माहे रबिलावल संन ११९६ हिजरी डाकेवर मै दारोगा हरकारा.

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता छ ११ माहे रबिलावल मा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ ९ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्रात काली विनंतीपत्र सरकारचें डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान राजश्री केशोपंत दातार, नारो शकराकडील बागी होऊन गुलज्यारखानास मिलोन धूमधाम करीत होते. त्यांचे पारपत्यास पहिले फौजा गेल्या होत्या. केशोपंत सुरत प्रांताकडे होते. राजश्री चिंगोजी कदम, नारो शंकराकडील, यांसी व त्रिंबकराव नारायेण यासी नाखसी आहे म्हणोन कदम मजकूर येथे कारभारी यापासी आहेत. त्यास केशोपत दातार याणी चिंगोजी कदम यांचे विद्यमाने सूत्र लाविले की सरकारचा कौल व अभये आल्यास आम्ही येऊन भेटू. त्याजवरून केशोपत दातार यांस यावयाविसी कौल सरकारचा पाठविला. सरकारचे कौलावरून केशोपंत दातार येथे आले श्रीमतास विसाजीपत आठवले याचे विद्यमाने भेटले व हरिपंत वगैर यानी भेट घेतली येथे आहेत नारो शंकराचे जागीरी पौ केशोपंत दातार यास पाच हजार रुाची जागीर द्यावी यैसा करार जाला आहे. पांच हजार रुा ची जागीर त्यानी घेऊन स्वस्त असावे यैसे ठरले आहे श्रुत होये राजश्री बाजीराव बरवे इकून पूर्वी श्रीमंत राजश्री दादा-

साहेबाकडे गेले होते. तेथे त्यांची सोये न होता महेश्वरास ते अहिल्याबाई होलकरीन इजकडे गेले. बाईपासी बाजीराव बरवे आहेत. त्यास बाजीराव बरवे यांसहि येथे येण्याविसी सरकारातून कौल पाठविला आहे. तेही येथे येणार यैसे वर्तमान आहे. सटोजी भोसले व बाजीराव बरवे यैसे उभयेता मिळोन सुरतेकडे गेले होते. त्यास बाजीराव बरवे तो महेश्वरास आहेत. त्याजला तो कौल पाठविला आहे. सटोजी भोसले दाहापांच राउतानसी पळोन इकडे आले. कोन्ही म्हणतात कीं मानाजी फाकडे यांस भेटले. कोन्ही म्हणतात कीं येसाजी सिंदे याजकडे कोल्हापुराकडे गेले यैसे वर्तमान आहे. मागती त्यांजकडील वर्तमान तथ्य कळल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. छ १० रोज शनवार राजेश्री नाना मणोलीहून येका दो दिवसानी येथे येणार. श्रुत होये. वैशाख मासी श्रीमंताचे लग्न करावे यैसा निश्चये आहे. त्यास लग्नापूर्वी सातारियास जाऊन राज्याचे दर्शन घेऊन वस्त्रे घ्यावी, उपरांतिक लग्न करावे यैसी योजना आहे. नाना येथे आल्यानंतर हा सिध्धांत ठेरून हुताशनी होऊन पंचमी जाल्यावर श्रीमंतानी सातारियास कारभारी यासहवर्तमान राजवस्त्रे घ्यावयास जावे यैसी यौजना आहे. वस्त्रे घेऊन आल्यानंतर गंगापुरास नाशकाजवल गोपिकाबाईचें दर्शनास जावे, उपरांतिक लग्न वैशाख मासी करावे यैसी घटवटणा आहे. मग काये सिध्धांत होऊन प्रथम सातारियास जातात किंवा गंगापुरास बाईचे दर्शनास जातात हा निश्चये होऊन ठरल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. राजेश्री मानाजी सिंदे याणी पांचच्यारसे राऊत व पांचमातसे भिल वगैरे मेळवून अजंट्याजवल पांचसात कोसी वोशागडास खूळ केले आहे. त्याचे पारपत्यास येथून दोन हजार फौज गेली हे सविस्तर वर्तमान येकदोन विनंतीपत्री सेवेसी लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. त्यास मानाजी सिंदे याणी वोशागडास खूळ केले आहे. त्याचे पारपत्यास दोन हजार फौज पाठविली आहे. आणिकही पांचसातसे फौज पाठविणार. श्रुत होये. राजश्री बज्याबा पुरधरे यांस आणोन आपल्या वाड्यात ठेविले आहे. त्याजवर चौकी पहारा अद्याप त्यांजवर आहेच. बज्याबास येथे आणिले

त्याअर्थी मोरोबा फडणीस यांसही येथे आणून आपल्या वाड्यात ठेवावे यैसीही योजना करितात. परंतु मोरोबाचा संशये कारभारी याग विशेप आहे. त्याअर्थी मोरोबास आणावयाचा प्रकार दीर्घसूत्री परंतु त्यास आणावे यैसो अतस्ते वदंता आहे. मागती त्याजकडील वर्तमान कलल्यास लेखन केले जाईल. श्रुत होये. होलकर वाफगावास आहेत. शृत होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती छ २ माहे मजकूरचे आज्ञापत्र डाकेसमागमे सादर केले ते छ १० माहे मारी पावले. पावोन संतोश जाला. सदै (व) याचप्रकारे आज्ञा पत्रे सादर होत असावी हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 190 — १३ रबिलावल ११९६ हिजरी
२६ फेब्रुवारी १७८२

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ताा छ १३ रबिलावल, फालगुण शुध चर्तुदसी, भौमवासर-पर्यत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेप पुर्वी छ ११ माहे मारीं हुजूर आर्जी व अखवार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहले असेल. सांप्रत हुजूर आर्जी व अखबार व पृथक पत्रीं अखबार स्वामीचे सेवेसी लिहून डांकेवर पत्रें रवाना केली आहेंत. दारोग्याचे विद्यमानें पत्रें पावतील व गुजरतील. गाडराकडील वकील उदेष्टेण यास रुखसत करितों म्हणोन येथील कारपरदाजानीं हैदरअली-खानास लिहून पाठविलें व नरसिंगराव नूरमाखानांसी करार केला आहे. परंतु हुताशनोचे उत्सहाकरितां पांचसाहा दिवस जरूरी कामाविनरिक्त दरबार होणार नांहीं. त्याउपरी जें कर्तव्य अमलांत येईल ते सेवेसी व हुजूर लिहून पाठवीन. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ ११ रबिलावल लगायत छ १३ माहे मार सन ११९६ हिजरी मंगळवार.

गोपिकाबाईचे भेटीकरितां पंतप्रधान नासिकास जाणार म्हणोन चर्चा होती परंतु जात नांहींत व बालाजीपंत मेनवलीस गेले आहेत ते लग्न करीत नांहीत व छ १२ माहे मारी पुण्यास येणार व हैदरआलीखानानें कारपरदाजास व नूरमाखान व नर्सिगराव वकीलास पत्र पाठविलें आहे कीं इंगरेजाकडील वकील उदप्टेण आला आहे त्यासी दारमदार हरगिज न करणे याप्रमाणें हरीपताचे जबांनी व अवांतर वर्तमानासहित पत्र स्वामीचे सेवेसी व हुजूर अखबार पाठविली ते पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. मांडनचे वर्तमान दफेवार लिहिलं आसे.

बालाजी जनार्दनानीं मेनवलीस अनुष्ठान करविलें होतें. अनुष्ठान समाप्तीनंतर होम व ब्रांह्मणभोजन व दक्षणा देऊन पत मार छ १२ माहे मार मंगळवारीं पुण्यास आले.

पंतप्रधानानीं पेशवाईची वस्त्रें सातारेकर राज्यापासून कारपरदाजास पाठऊन पूर्वीच आणविलीं आहेत परतू राज्याची भेट जाहली नांहीं याकरितां छ २१ माहे मारीं पंतप्रधान कारपरदाजासहित सातान्यास जात आहेत म्हणोन खारिज चर्चा सर्वतोमुखं येकिली आहे. कारपरदाजासमीप वर्तमानाचा शोध घेऊन माधाऊन तहकीक लिहून पाठवीन

हैदरआलीखानाकडील ताजे वर्तमान आले नाही. कालापेठ-नजीक आरकाटेसमीप खान मार आहे व फरासीसाकडील जमीयत येणार त्याची इंतजारी आसे म्हणोन वकीलांचे जबानी येकिले.

माहदाजी सिंदे दतियासमीप आहेत. इगरेजाकडील वकील इंद्रसेन मारनुलेसमीप आला आहे तो गोहदकर जाटाचे विद्यमाने सिंदे मारासी दारमदारकरितां कांहीं ज्वाबसाल करीत आहे म्हणोन खारिज येकिलें.

गणेशपंत बहिरे कोंडाईबारीचे घाटाखाले हळदवणासमीप व इंग्रजांची पलटणें दोन व फतेसिंग गाइकवाडाची फौज सोनगडाचे जिल्ह्यांत आहे. गणेशपंताचे हजारबारासे स्वार सुरत प्रांतात दौडे-

२

पुरवणी आखबार पुणें छ १३ रबिलावल सन ११९६.

स गेले होते. सुरतेहून इगरेजांकडील लोक मुकाबल्यास आले तेसमई गणेशपंताचे लोकांनी दाहाबारा घोडीं इंगरेजाकडील पाडाऊ करून आणिलीं म्हणोन गोविंदराव कृष्टण यांचे जुबानी यैकिलें. याचे बरखिलाफ खारिज यैकिलें की इंगरेजाकडील लोकानीं दाहाबारा घोडीं गणेशपंताकडील पाडाऊ करून नेलीं.

मानाजी फांकड्या तलुक वेताळवाडीसमीप वोसागडचे आसाऱ्यानें आहे. त्याचे तंबीस पंतप्रधानाकडील सरदार दारकोजी निंबाळकर वगैरे दोन हजार स्वार गेले आहेत म्हणोन पूर्वीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं सुभानराव जाधवाचे तीनच्यारसे स्वार फांकडे मागाचे तंबीस गेले होते. परस्पर लढाई जाहली. जाधवाकडील लोक पसपा जाहले व पांचसात घोडीं व माणसें ठार जाहलीं व कांही लोक जखमी जाहले. फांकड्या मार भिल वगैरे जमीयत मेळऊन पंतप्रधानाचा तालुका ताख्ततराज करीत आहे व हरयेक गांवास चिठी घासदाण्याची रघुनाथराव यांचे निसबतीची करितो म्हणोन यैकिलें. दारकोजी निंबाळकर वगैरे कांसारबारीचा घाट उतरोन गेल्याचे वर्तमान आलें.

---

**A. R. No. 191**

१४ रबिलावल ११९६ हिजरी
२७ फेब्रुवारी १७८२

श्री

विनती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता छ २४ माहे रौवल मु ॥ पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वामंद

लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे विशेषे येथील वर्तमान छ ११ माहे मजकुरी रोज रविवारी प्राथकाळीं विनंतीपत्रें सरकारचे डांकें-समागमे सेवेसी रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान श्रीमंतानी वाड्यात वाघ व हांती वगैरे आणविले होते. दोन घटका वाघाचा व हांतीचां तमाश्यां केला. पाण्यातील सुसर धरून आणिली होती ती वाड्यात श्रीमंताकडे आणिली होती. श्रीमंतानी त्या सुसरीवर वाघ घालविला. वाघाणी सुसर मारिली. यां प्राणे दोन घटका तमाशा जाला. उप्रांतिक घोडी वगैरे श्रीमंतानी वाड्यात फिरविली शृत होये. (उ)दईक नाना पुण्यात येऊन दाखल होनार विदित होये. छ १२ रोज सोमवार नाना मेणोलीस गेले होते. दो प्रहरां पुण्यास येऊन आपले वाड्यात दाखल जाले. मेणोलीस नाना आपले लग्न करणार यैसे वर्तमान होते. त्यास लग्न रहित होऊन नानानी लग्न केले नाही पांच दिवस मेणोलीस होते. कृष्टणाश्नाणं वगैरे करून मेणोलीहून दो दिवसा नाना येथे येऊन दाखल जाले मेणोलीहून पांच कोस राये किला आहे. किला पाहाण्यास गेले होते. किला पाहून मागती मेणोलीस आले. पांचच्यार दिवस राहून पुण्यास आले. शृत होये. श्रीमंताची व कारभारी वगैर याची वदंता आहे कीं साताऱ्यास राज्याचें दर्शणास जानार. दर्शण करून वस्त्रे घेणार यैसे वर्तमान आहे परंतु अद्याप निश्चये नाही. नाना आले. नानाचे व हरीपंताचे विच्यारे साताऱ्यास जावयाचां योग टैरल्यांस लेखण केले जाईल. विदित होये. हैदर नायेकाकडील पत्रे आली. पत्राचा भावगर्भ कळल्यात आला नाही. कळल्यास लेखण केले जाईल. नाईक मजकुरासी व इंग्रजासी राह रूबकार आहे यैसे वर्तमान आहे. शृत होये. छ १३ रोज मंगलवार. श्रीमंताचें लग्न वैशाख मासी आहे. लग्नाचे सरंजामाकरिता तमाम माहाल्लोमाहाल चिटिया करितातं व पुण्यातही सरंजाम करितात. ममधाची यौजणां राजश्री परशरामपंत मिरजकर याची कन्या आहे. दुसरे, नासककर कोन्ही दीक्षित आहेत त्याची कन्या आहे. मग कोणते मुलीचा निश्चये होईल हे पाहावें. शृत होये. सिद्याकडील रायाजी

पा व रामजी पा नानाकडे आले होते. नानाचा व त्याचा खिलवत जाला. खिलवताचा भाव यैकिल्यात आला कीं मिद्यास श्रीमंताचे लग्न वगैरचा मजकुराची पत्रे लिहिनार. विदित होये. अजंट्याजवल वोशागडावर मानाजी सिंदे याणी खूळ केले आहे. त्याजवर येथून फौज गेली आहे. वाघुलीकर जाधव याची पागा अधीच मानाजी सिंदे याचे पारपत्यास गेली आहे. त्या पागेसी व मानाजी सिंद्यासी लढाई होऊन जाधवाकडील दोनतीन घोडी त्याणी नेली यैसे वर्तमान आहे. मागती त्याजकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. राजश्री गनेशपंत बेहेरे कोडाईबारी उतरून खाले गेले आहेत. तें सोनगडाजवल इंग्रजाची पलटने दोनतीन व फतेसिग गायेकवाड याची दोन हजार फौज आहे. त्यासी व गनेशपंत बेहेरे यासी लढाई होनार यैसे वर्तमान आहे. शृत होये. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 192** २८ जमादिलाखर ११९६ हिजरी

१० जून १७८२

३

श्रीनिवास

अखबार पुणें छ २८ माहे जा॥लाखर सन ११९६ हिजरी.

येशवंतराव नाईक निबाळकर दहींगावकर यानें फौज जमा करून करमाळे वगैरे तालुकियात कितेक मातबर मकानें लुटली व मुलूक नाराज केला. त्याचे तंबीकरितां हुजूरीहून खौलत जंग बहाद्दर नंई जाहलें तेंम-मई नाईक मार पळोन दहींगावचे आसऱ्यास येऊन राहिला. खौलत जंग बहाद्दरनी पंतप्रधानांचे कारपरदाजास पत्र पाठविलें की नाईक पुन्हां शरारत याप्रमाणें न करी व त्याजसमीप कोण्ही लोक मुनाफिक न व्हांवे याप्रमाणें ताकीद प्रखर करावीत. त्यास कारपरदाजांनी जाहिरा येशवंतराव नाईकास पत्र पाठविलें व त्यानेंही प्रत्योत्तर लिहिलें कीं या उपरी आपण सरकारआलीचे तालुकियास उपसर्ग लावणार नांही. परन्तु नाइकास प्रखर चितापासून ताकीद केली नांही व परशरामपंत मिरजकर दहीगावचें जवळपासून गेले परंतु त्यांनी उपेक्षा केली सांप्रत

वर्तमान कोण्ही मातबराचे मुखें यैकिलें कीं यशवंतराव नाईक व मानाजी फांकडे व बाजीराव बरवे यानीं पंतप्रधानाचे कारपरदाजासी अंतस्थ यैक्यता केली व यांचे इतल्यानें फौज जमा करून सरकारआलीचे तालुकियांत जेथवर मकदूर होईल तेथवर धामधूम करून मुलूक मारावा व खंडणी घ्यावी व इकडील कारपरदाजांचें अंग किमपि दाखऊं नये. किंबहुना कारपरदाजाकडून हजारपांचसे फौज त्याजवर तई होईल. परंतु अतरंगी यांचेच आश्रयानें येशवतराव वगैरे सरकारचे तालुकियांत हगामा करणार. यैकिल्याप्रमाणे लिहिलें असे. याप्रकारचे वर्तमान पुण्याकडील अखबारनविसानी लिहिलें म्हणून हुजरीहून जिवाजीपंतास न कळावें म्हणोन विनंती आहे हे विनंती

पैा छ १० माहे रजेब सन ११९६ हिजरी मगळवार साई-काळ मै डांक सरकार.

---

**A. R. No. 193**

१५ शाबान ११९९ हिजरी
२३ जून १७८५

पैा छ २१ माहे शाबान सन ११९९ हिजरी

श्रीनिधास

वडिलांचे सेवेसी अपत्यें रघोत्तमरायानें चरणारविंदी मस्तक ठिऊन सा। नमस्कार विज्ञापना जे येथील वर्तमान ता। छ १५ माहे शाबान ज्यष्ठ वद्य प्रतिपदा गुरुवासरपर्यंत मुकाम पुणे वडिलांचे आसीर्वादेंकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ९ माहे मारीं सरकारचे डांकेवर हुजूर अर्जी व आखबार व वडिलांचे सेवेसी विनतीपत्र नवाब मुषीरुलमुलक बहादुराचे पत्रासहित पाठविले तें व त्यानंतर छ १८ रोजी प्रातःकाळी तैनाती जोडीसमागमे विनतीपत्र पाठविलें तें येसी दोन्ही पत्रें पाऊन वर्तमान श्रुत जालें असेल. सांप्रत छ १५ माहे मारपयत यैकिलें व जालें वर्तमान लिहून

सांप्रदायाप्रमाणें पत्रें सरकारचे डांकेवर रखमाजी नाइकाचे विद्यमाने रवाना केली आहेत. दारोगे हरकारें सेवेसी प्रविष्ट करतील. आसिर्वादपत्र तैनाती जोडीसमागमें छ २६ रजबचें व सरकारचें डांकेंवर छ १ माहे शाबानचें पाठविलें तें छ ९ माहे मारीं पावलियाचें उतर छ १४ रोजी जोडी रवाना जाली त्याजसमागमें लिहिलें आसे. त्यानंतर छ २ माहे मारचे पत्र तैनाती जोडीसमागमें पाठविलें तें आजच छ १५ रोजी पाऊन बहुत संतोष जाला. माहाराव निंबाळकराकडील वाजबुलअर्ज दस्तखत होऊन आली त्याची नकल पाठविली ते पावली. सविस्तारें छ १४ रोजी लिहिलें आहे त्याजवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञाप्ती.

---

पै॥ छ २१ माहे शाबान सन ११९९ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ ९ माहे शाबान लगायत छ १५ माहे मार सन ११९९ हिजरी.

पूर्वी छ ८ माहे मारपर्यंत अखबार लिहून छ ९ रोजी सरकारचे डांकेसमागमें पत्रें पाठविली तें पाऊन वर्तमान श्रुत जालें असेल. सांप्रत छ १५ माहे मारपर्यंत यैकिलें व जालें वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेंवार लिहिलें आसे.

फतेआलीखानाचे जमीयतीपैकीं पैदल व तोफा नरगुंद्याचे माहासऱ्यावर आहेत. सवार वगैरे जमीयत धारवाड प्रांतीं राहून पंतप्रधानाकडील तालुका कृष्टणेपार आहे तेथें हंगामा करीत आहेत. जमखंडी व यादवाड व मुरगुड वगैरें मकाने घेतली व शाहापूर बेळगांवचा किला घेणार म्हणून कारभारी यांस बातमी आली. त्याजवरून छ २ माहे शाबानी शाहापूर बेळगांवचे किल्याचे बंदोबस्तीस च्यार तोफा कारभारी यांणी पाठविल्या आहेत. कृष्टणेस पूर नसल्यास तोफा शाहापुरास जातील.

कासीपंत नामें हजार दोन हजार गाडदी व तोफा च्यार घेऊन गणेशपंताकडे गेले होते. त्यास कासीपंताकडील गाड्यापैकीं च्यार पांचसे गाडदी फितूर करून फतेआलीखानाचे जमीयतीत गेले म्हणून यैकिलें.

---

पैा छ २१ माहे शाबान सन ११९९.

२

मुधोजी भोंसल्याचे रुखसतीचा निश्चय नांही. बाळाजीपताचे जुबानी कळले कीं येका दो दिवसात छावणीस राहण्याचा किंवा जाण्याचा निश्चय होईल यैसे छ १३ माहे मारी बाळाजीपंत सेवकासी बोलले.

हरिपंतास दर्दगिरफ्त आहे. या दिवसात शूळ क्षणक्षणा विशेष होत असतो औषधी व दैवी उपाय बहुत करितेत परंतु आराम होत नाहीं. बाळाजीपंत बहुत चिंता करीत आसतेत.

हरिपंताचे घरास छ ११ रोजी मुधोजी भोंसले व छ १२ रोजी तुकोजी होळकर व छ १३ रोजी बाळाजीपंत गेले होते. छ १३ रोजी बाळाजीपंतासी व हरिपंतासी खिलवत येक प्रहरपर्यंत जाली.

कार्तिकस्वामीचे मूर्तीची स्थापना करावयाकरिता छ ९ रोजी राव पंतप्रधान पर्वतीस गेले होते स्थापनेचे ससई मूर्ती भंगली यास्तव स्थापना न करितां माघारा आपले हवेलीस आले

पुण्यांत हवेल्या आहेत त्याची खानेसुमारी कारभारी यानी करविली आहे खानेसुमारी जाल्यानंतर हवेलीचे किंमतीप्रमाणे पटी करून घेणार म्हणून यैकिलें.

कृष्णराव बल्लाळ यांस पुण्याची हवा मवाफिक न करीत नांही व सध्या मसलहतही दरपेश नाही म्हणून राव मारर बारामतीस जाणार आहेत छ १५ रोजी मुधोजी भोसले हरिपंताचे हवेलीस आले होते. च्यारपांच घटका बसले होते. बहुधा राव पंतप्रधानाची रुखसत देविती यैसे हरिपंत बोलले म्हणून यैकिलें.

किनूरकर जमीदारापासून गतवर्षी परशरामपंतानीं पेशकश घेतली होती व जमीदार मार राव पंतप्रधानाचे स्नेहात होता. सांप्रत वर्तमान यैकिलें की फतेअलीखानाने जमीदार मारासी पैगाम केला. दरमाल तीन लक्ष रुपये पेशकश देणे. अथवा पांचसे सवार व तीन हजार जमीयत पयदल घेऊन नौकरीस येणें जमीदार मारानें नौकरी करणे कबूल केले व खान माराचें समतत मिळाला म्हणून यैकिले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

**A. R. No. 194** १६ शाबान ११९९ हिजरी
२८ जून १७८५

पैा छ २१ माहे शाबान सन ११९९ हिजरी.

श्रीशंकर

विनती विज्ञापणा यैसी जे येथील कुशल तागाइत छ १६ माहे शाबान मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणोन स्वानंद कुशल लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे विशेष येथील वर्तमान छ ९ माहे मजकूर रोज शुकरवारी प्राथकाली विनतीपत्र सरकारचे डाकेबोार सेवेसी पाठविले ते सेवेसी पाऊन सविस्तर मजकूर ध्यानास आला असेल. तदनंतर येथील वर्तमान त्रितीये प्रहरी श्रीमंत व नाना वगैरे बागात गेले होते. च्यार घटका बागाची सैर करून उप रांतिक साइकाली आपले हवेलीत दाखल जाले व नाना आपले घरास आले श्रुत होये. चिमणलाल मुनसी गरडूर फिरंगी कलकतेवाले याजकडे वस्त्र वगैरे दऊन पाठविलें म्हणोन सेवेसी सविस्तर सेवेसी लेखण केले होते त्यास चिमणलाल पाच्यार दिवस कांही गुतियामळे राहिला होता. प्रस्तुत चिमणलाल स्वार होऊन कलकत्यास गेले विदित होये हुजूरहून खिलयेत व जवाहेर आले आहे ते नानाकडे रो गोविदराव कृष्ण व गोविदराव मामा घेऊन गेले होते. नानाही जवाहर अवलोकण केले अद्याप जवाहेर व खिलयेत वांटावयास नानाची आज्ञा जाली

नाही. खिलयेत व जवाहेर वगैरे वाटिल्यास सविस्तर सेवेसी लेखण केले जाईल. सिद्याकडील वर्तमान आहे की सिद्यानी पानशाही फर्मान कायेमुदौले यांचे नावे पाठऊन सुरतेस जप्ती पाठविली व कायेमुदौले यांजला पदच्युत केलें या प्रा वर्तमान आले. मागती येविसीचे वर्तमान ध्याणाम आलियां सेवेसी लेखण केले जाईल. रा हरीपंततात्या यानी नवी हवेली बांधली. त्यास त्या हवेलीची वास्तुशांत जाली परंतु तात्या अद्याप पहिलेच हवेलीत आहेत. शरीराची भावना दोन दिवस बरी व दोन दिवस शूळाचा उपद्रव असतो बाहेर दरबार वगैरेस कोठें जात नाहीत विदित होये छ १३ माहे मजकूर रोज मंगलवारी भोसले घाडगे म्हणोन सरदार मऱ्हाटे भोसल्याचे स्वकीय आहेत त्यांचे घरी मेजमाणीस भोसले आले होते. मेजमाणी होऊन उपरांतिक आपले डेऱ्यास भोसलें गेले विदित होये. छ १४ माहे मजकूर रोज बुधवारी कृष्णरावजी व गोविंदराव भगवंत रा। हरीपंततात्याचे वाड्यात आले होते च्यार घटका रावजी तात्यापासी बसले होते उपरांतिक रावजी आपले घरास आले. विदित होये रा। मुधोजी भोसले अद्याप येथेच आहेत. रुखसती जाली नाही व होळकरही येथे आहेत. सेवेसी श्रुत होये. छ १५ माहे मजकूर रोज गुरवारी भोसले हरीपंततात्याचे घरी आले होते. च्यार सा घटका भोसले तात्याचे वाड्यांत बसले होते. उपरांतिक साइकाळी स्वार होऊन आपले डेऱ्यास गेले विदित होये. पुढे जे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. विदित होये बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 195 (पो. ना.) २१ शाबान ११९९ हिजरी
२९ जून १७८५

पैा छ २१ माहे शाबान सन ११९९ हिजरी.

श्रीनिवास

पुा पत्र तीर्थस्वरूप राजश्री नाना स्वामी वडिलाचे सेवेसी

विज्ञापना जे आसिर्वादपत्रीं आज्ञा कीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीची सनद मौजे रायपूरची श्रीमंत राजश्री राजे रायरायां दियाननवंतजी तात्याचे नांवें पाठविली ते पावली. परंतु त्याजमध्ये इा तारीख अमकी ऐसे नांही. याचें कसे करावें? दुसरें, राजश्री रायसाहेब आपारायजीचें नांव दाखल नांहीं. त्यास तेथील पधत विदित नांही वाकफकारीने अपत्यानें केलें असेंल. उगऊन उतर लिहिणें म्हणून आज्ञा त्यास इा तारीख लिहिण्याचा सांप्रदाय नांही. जर जप्ती जाली असती तर तारीख लिहिणें जरूर होतें. त्यास यांचे दफ्तरी जप्तीचा अमल नाही. सबब कैलासवासी तीर्थस्वरूप स्वामीच यैवजी इतके लिहून सनद मवफी कायदा दफ्तरचे मुतसद्यानी दिल्ही याची चौकसी अपत्याने करून मग सनद घेतली धाकटे रायसाहेबाचें नांव दाखल नाही त्यास उभयतांचे नांवें सनद मागितली. राजश्री बाळाजीपंत नाना म्हणाले जागीरीचा अमल कैलासवासीप्रमाणें म्हटलें म्हणजे सहजच उभयताचा विभाग, प्रत्यक नांव न लगे यैसे म्हणाले. यास्तव संक्षप केला. राजवरही रायसाहेबाचे नांव दाखल असले पाहिजे ऐसी आज्ञा व्हावी, त्याचा उद्योग करीन हे विज्ञापना.

राजश्री बाळाजीपंत हिदवी(न)वीस सुनगो यर्ड्लांचे सरकारचें बहुशा घराम गेले आहेत. अपत्याचे तरफेनें राजश्री आनंदराव सभापती सेवेसी हजर आहेत. मजकडील विनतीपत्राचें प्रत्योतराची आज्ञा राजश्रीकडे होत आहे. वरकडही पत्रें लिहिण्याची आज्ञा राजश्रीस जाहल्यास रोजरोज हजर राहून पत्रें लिहिणे ते लिहीत जातील. माझे तरफेने सेवेसी आहेत त वडिलाचे संग्रहोचे जाणून अमर्यादायुक्त विनंती लिहिली असे हे विज्ञापना.

---

**A. R. No. 196**

२४ रजब १२०४ हिजरी
९ अेप्रिल १७९०

श्री

विनंती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल तागाइत छ २४ माहे

रजब, मु।। पुणे, स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे, विशेष येथील वर्तमान छ १७ माहे मारर रोज शनवारी दो प्रहरा दिवसा अखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान त्रितीय प्रहरी राजश्री नाना फडनवीस श्रीमताचे वाड्यात गेले. दरबार जाला. दोन घटिका अर्शेमाहालात बसोन माल्की मुलकी कामकाज जाले. नतर श्रीमत व मदारूलमहाम सातखणी वर गेले. दफ्तरचे दरकदार यास बोलाऊन मामलतप्रकरणी ताळेबंद वगैर कागदपत्र अवलोकण करून मागील दोन घटिका दिवस (राहता) दाखल जाहले तेथोन निघोन (अस्पष्ट मजकूर) विदित होये. छ १८ रोज रविवारी प्रथम दोन घटका दिवस येता. राजश्री हरिपत फडके याणी रा। गमाजी पाटील वकील नि।। गाइकवाड यासी बोलाऊन आणविल्यावर उभयेताचे खिलवत प्रहर सहा घटिका जालेनतर दहा घटिका दिवस येता, मारनिले आपले घरास गेले. त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार वगैर आले होते. दोन घटिका कामकाज जाले. राजश्री जोतयाजी जाधवराव वाडीकर आपले खासगत कामाकरिता आले होते एक घटिका मदारुलमहाम यासी बोलणे बोलोण नंतर पानदान विडे देऊन जाधव मजकूर आपले हवेलीस गेले. या उपरात मागील पाच घटिका दिवस राहता राजश्री नाना फडनवीस आपले वाड्यातून निघोन राजश्री हरिपत फडके याचे वाड्यात गेले तेथे रा। गमाजी पाटोल आल्यावर त्रिवर्गाचे खिलवत दोन घटिका जाले. नतर राजश्री बहिरोपंत मेहेंदळे आले. त्यासी एक घटिका भाषण करून, मागील दोन घटिका दिवस राहता मदारुलमहाम आपले घरास आले. खिलवताचा भाव राजश्री मानाजी गाइकवाड याजकडील बोलणे रा। गमाजी पाटील बोलावयासी येथे आले आहेत. जाबसाल शुरू जाला आहे. नमूदात आल्यावर सेवेसी लेखण केले जाईल श्रुत होये. छ १९ रोज सोमवारी मागील प्रहर दिवस राहता मदारुलमाहाम याचे वाड्यात मामलेदार व दरकदार आदिकरून आले होते.

नंतर राजश्री बहिरो रघुनाथ मेहेंदले येऊन दोन घटिका बोलोण गेले. या उपरात राजश्री बाबा फडके मदारुलमाहाम याचे वाड्यात आले, तो मागाहून रा। गमाजी पा। आले. त्यासी दोन घटिका बोलणे जाल्यानंतर मशारनिल्हे माघारा आपले घरास गेले. दफ्तरचे कारकून आले होते, तेव्हा नाशिक वगैरे माहालचे हिसेबाची चोकसी होऊन नंतर अस्तमित होता राजश्री नाना बेलबागात जाऊन आले. श्रीमंताची स्वारी घोडी फिरवावयासी मागील सहा घटिका दिवस शेष राहाता रमन्यात गेली होती. च्यार घटका तेथे घोडी फिरवून बो (का.फा.) ली त्यास आपले समक्ष दाणा चारऊन नंतर तेथोन माघारा निघाले ते साइकाली आपले वाड्यात दाखल जाले. हाजरत शाहासाहेब शहर आरंगाबादकर याजकडील अंगुराच्या डाल्या श्रीमंत व राजश्री नाना व हरिपंत फडके यास आल्या त्या पत्रासहित प्रविष्ट जाल्या. वरकड मुत्सदी परचुरे व पारसनीस व चिटणीस वगैरे याजला मालाबाद पाठवीत असतात त्या प्रो। आताही सर्वत्रास पावत्या जाल्या. शुत होये. छ २० रोज मंगलवारी मदारुलमाहाम याचे वाड्यात सर्वत्र आले होते. अस्तमितपर्यंत मामलतसमंधी कामे जाली व पागा वगैरे सरंजामी लोक याच्या रोजमऱ्याचे याद्दीवरी तारखा करून दिधल्या. जेजुरी येथे चत्री पौर्णिमेचे दिवसी श्रीदेवाचे दर्शणास यात्रेचे लोक गडावर गेले होते. त्यास ईस्वरी इछा कैसी काये जाली तो तीनच्यारसे माणसे तेथे मृत्य पावली. अनर्थाचा प्रकार बहुतच जाला. अैसे अघटित जाल्याचे वर्तमान साग्रंतपे शजीचे अखबारी-

२

त सर्वेसी लेखण केलेच आहे. अैसीयासी येविसीचा शास्त्रार्थ राजश्री नाना फडनवीस याणी राजश्री ओयोशास्त्री आदिकरून शास्त्री याग विच्यारावयासी सागून ग्रंथातरीचे संमत ध्यानास आणिले. त्याजवरून राजश्री विठलपंत वाकेनवीस सरकारचे याजला जेजुरीस आज दो प्रहरा दिवसा रवाना केले. समागमे राहोटच्या व कनाता वगैरे सरंजाम दिल्हा आहे. तेथे आधी शांतिकविधी करून हावन करावे, व देवास अभिषेक व ब्रांम्हणसंतर्पन व दानधर्म विधियुक्त करून याप्रो धर्मकृत्य कार्ये करावी म्हणोन सागितले

आहे. त्याजप्रो मारनिले जेजुरीस करून माघारा येतील. शृत होये. छ २१ रोज बुधवारी मागील दाहा घटिका दिवस राहाता श्रीमंताचे वाड्यात दरबार जाला राजश्री नाना फडनवीस आदिकरून मंडळी व मामलेदार व दरकदार असे आले होते. दोन घटिका भाली मुलकी कामकाज जाल्यावर सातखणीवर जाऊन पो नासिक वगैरे माहालचे तचकरियाची चौकसी जाली. नंतर राजश्री नाना (वा फा) च्यार घटिका दिवस राहाता श्रीमंताची आज्ञा घेऊन तेथोन निघाले तो राजश्री परशरामपंत पटवर्धन मिरकर श्रीमंताचे दर्शणास आले मदारुल्माहम आपले वाड्यात येऊन औषध नित्याचे घेतले. रा कृष्णाजीपंत सेलूकर मामलेदार पो उमरखेड, भेटीस आले होते. त्यास विडे देऊन मार्गस्त केले. नतर बेलबागात जाऊन साइकाली आपले वाड्यात आले राजश्री भगवतराव नारायेण पारसनीस नाशकास गंगास्नाकरिता सिव्हस्त यात्रेस जातात सबब मारनिले याणी श्रीमंताची आज्ञा घेऊन नतर साइकाली मदारुल्माहम याचे निरोपास आले होते. रा बाबुराव केशव कुटुंबासहवर्तमान नाशकास गेले. राजश्री तुकोजी होळकर याचे पुत्र राजश्री मल्हारराव होलकर हे आपल्या तीर्थरुपासी रुसवा करून महेश्वरी आले होते. तेथोन आंहिल्याबाईस न पुसता दोनतीनसे स्वारानसी निघोन जेजुरीस जातो म्हणोन इकडे आले. खानदेश प्रांती माहालोमाहाल घासदाणा पट्टीचे रो घेतले. चालीसगाव येथे तीन मुकाम होते तेथील घासदाणा घेऊन नंतर मेहूणबोकर याजवरून पुले परगण्यात गेले. पुढे थालनेराकडे किंवा चादवडीस पाहावे कोणीकडे जातात. त्याचे समजाविसीस रा रामाजी भले म्हणोन सरदार महेश्वरीहून रवाना जाले आहेत त्याची याची गाठ पडल्यावर माघारा जातील की जेजुरीस येतील हे न कले याप्रो वर्तमान आले होते. शृत होये छ २२ रोज गुरुवारी प्रथम दोन घटिका दिवस येता श्रीमंत घोडी फिरवावयासी रमन्यात गेले होते. च्यार घटिका तेथे घोडे फिरवावयाची शयेर करून प्रहर दिवस येता माघारा आपले वाड्यात आले. त्रितीय प्रहरी

मदारुलमाहम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार व सुभे व मामलेदार आले होते. दोन घटिका जरुरियात कामे करून नंतर आपले वाड्यातून मागील साहा घटिका दिवसा निघाले ते राजश्री परशरामपंतभाऊ मिरजकराचे येथे गेले तेथे जाऊन उभयेताचेच खिलवत च्यार घटिका जाले. नंतर अतर पानदान वगैरे जाल्यावर मदारुलमाहम तेथोन निघोन आपले वाड्यात आले. साइंकालचे संध्यावंदन जाले राजश्री खंडोजी जाधव मोकासी गाडापुरकर सातारियास पागेमुधा कार्तिक मासी रवाना केले होते ते सांप्रत माघारा आले. सबब जाधव मार राजश्री नानाच्या भेटीस आले होते. त्याची भेटी जाल्यावर त्यास विडे पानदान देऊन मार्गस्त केले आणि आपण घटिका रात्रीस बेलबागात जाऊन दोन घटिका तेथे राहून तिसरे घटिकेस माघारा आपले वाड्यात आले. शृत होये.
छ २३ रोज शुक्रवारी पहिले दीढा प्रहरा दिवसा राजश्री रामाजी पाटील, वकील गाइकवाड याजकडील, मदारुलमाहाम याचे वाड्यात आला राजश्री नानानी भोजन केल्यानंतर उभयेताचे बोलणे दोन घटिका होऊन मारनिले दो प्रहराचे संधीत माघारा आपले घरास गेले. मागील नव घटिका दिवस राहाता मदारुलमाहाम निद्रा करून उठिल्यावर भागानगरचे डाकेची पत्रे छ १८ माहे

३

मजकूरची राजश्री गोविंदराव कृष्ण याची आली ते राजश्री आपाजी कोंडाजी याणी मदारुलमाहम यास प्रविष्ट केली. राजश्री दाजीबा व लक्ष्मणराव फडके व राजश्री नाना असे त्रिवर्ग त्रमान पत्राचे अवलोकण केले. राजश्री हरिपंत फडके याची प्रकृत नीट जाहाली म्हणोन त्याजला बोलाऊन पत्रे पाहावयासी दिल्ही आणि मागील च्यार घटिका दिवस राहाता मदारुलमाहम आपले वाड्यातून निघाले ते अलीमरदाखा जादार गारदी याचा सरकारात चाकर आहे त्याचे येथे शादी म्हणोन पठाण मजकुराने बहुत वाजीदी केली होती. सबब त्याचे येथे गेले सेला व पागोटे त्यास आहेर केला. येक घटिका तेथे होते. तोपर्यंत अतर पानदान व नाच जाल्यावर तेथोन निघोन बेलबागात येऊन नंतर आपले वाड्यात एक घटिका दिवस

शेष राहता आले. तोपर्यंत राजश्री हरिपंततात्या व दाजीबा व लक्ष्मणराव फडके बसलेच होते. तेथे मदारुलमाहम जाऊन तीन घटिकापावेतो खिलवत जाले. मध्येवरती राजश्री बहिरोपंत मेहेंदळे याजला बोलाविले होते. या प्रो॰ बोलणे जाल्यावर फडके आदिकरून सर्वत्र आपलाले घरास गेले. टिपूकडील वकील वाईस आला आहे त्यास राजश्री लक्ष्मणराव रास्ते येथे येण्हार त्याजसमागमे वकील मजकूर येईल तेव्हा बोलण्याचा भावगर्भ समजण्यात येईल. कनकगिरी येथील राज्याचा हाती तेथे विकावयासी आला होता. तो श्रीमंताचे सरकारात खरीदी केला. राजश्री नाना फडनवीस सिव्हस्थ यात्रेस गगास्ना(ना)स टोक्यास वैशाख मासी जावयाचा संकेत आहे त्यास स्वारी जाण्याकरिता शुध्धपक्षी अष्टमीचे महूर्तही विच्यारून ठेविले आहे व खास पागा वगैरे सरंजाम यास ताकिदही जाली आहे परंतु अद्यापि निश्चये जाला नाही. संध्धियत आहे ठरेल त्याप्रमाणे सेवेसी लेखण केले जाईल. मदारुलमाहम व राजश्री परशरामपत मिरजकर हे उभयेता शुध ८ स नाशकास जातात म्हणोन हेही वर्तमान आहे. शृत होये. याउपरी पुढे प्रसगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा साभाळ करणार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञापना

--- ---

A. R. No. 197

९ शाबान १२०४ हिजरी
२४ एप्रिल १७९०

श्री

विनती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल तागाईत छ ९ माहे साबान मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणोन स्वानद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २ माहे मजकूर रोज शनवारी त्रितीय प्रहरी अखबारपत्र सरकारचे

डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान रोज मजकुरी मागील प्रहर दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात राजश्री हरीपंत फडके व बहिरोपंत मेहेंदळे आले. उपरांत राजश्री रघुनाथराव पटवर्धन कुरदवाडेकर मदारुलमाहाम याचे भेटीस आले होते. दोन घटिका परस्परे भाषण होऊन मारनिल्हे आपले हावेलीस गेले नंतर राजश्री नाना व हरिपंततात्या व मेहेंदळे मजकूर याच खिलवत इग्रेजप्रकर्णी दोन घटिका रात्रपावेतो जाले याउपर सर्वत्र आपलाले घरास गेले श्रीमंताची स्वारी घोडी फिरवावयासी रमन्यात मागील साहा घटिका दिवस राहाता गेली होती. तेथोन माघारे येताना येक घटिका गारा पडल्या उपरांत पाऊस पडो लागला तैस्यात श्रीमंत आपले वाड्यात मागील दो घटिका दिवसा आले. मदारुलमाहाम साता घटिका रात्रीस आपले वाड्यातून निघोन काळ्या वावरात राजश्री सदासिवभट दाते याचे येथे कीर्तन श्रवण करावयाकरिता जाऊन अकरा घटिका रात्रीस माघारा आपले घरास आले. श्रुत होये. छ ३ रोज रविवारी त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार व मामलेदार वगैरे आले होते राजश्री हरीपंत फडके व मेहेंदळेही आले. मामलतसमंधी च्यार घटिका बोलणे दरकदार दप्तरचे याणी येऊन केले आली बाहादर याजकडील पत्रे व मेवेजात मथुरेचे मुकामीहून आली ते त्याजकडील कारभारी याणी श्रीमतास व मदारुलमाहाम यास पावती केली. राजश्री नाना व हरीपंत फडके, बहादराकडील पत्रे आली ते आस्तमितपर्यंत वाचीत बसले होते पत्राचा भावगर्भ त्याणी आपले खासगत फौजेचे वगैरे खर्चाचा मजकूर लिहिला होता गोसावी याची व सिंदे याची सफाई पूर्वीच जाली आता कामकाज एके विच्यारे करून होत असते म्हणोन लिहिले होते शहाजी भोसले आकलकोटकर पेशजी कार्तिक मासी मृत्य पावले त्याजवरून भोसले मजकूर याचे दोघे पुत्र राजश्री फतेसिंग व तुळजाजी भोसले चैत्र वा। दशमीस आकलकोटीहून निघोन मजल दर मजल श्रीमंताचे भेटीस येथे यावयाचे केले रोज मारी

भोसले याचा मुकाम लोणी, येथून आट कोस आहे तेथे जाल्याचें वर्तमान शुतरसवार घेऊन आला. ते पत्रे रा जिवाजीपंत वकील दिा मजकूर याणी मदारुलमाहाम व फडके यास दिल्ही. उदईक वानोडीवर येऊन भेटीचा योग व्हावा असा निश्चये जाला. शृत हाये.
छ ४ रोज सोमवारी मागील दीड प्रहर दिवस राहता राजश्री हरीपंत फडके मदारुलमाहाम याचे वाड्यात गेले. दोन घटिका बोलने करून नंतर श्रीमंताचे वाड्यात जाऊन (भो)सले याचे भेटीस जावया-विसी फडके मार याणी श्रीमंतास विनंती केली. त्याजवरून स्वारीची सिध्धता होऊन मागील प्रहर दिवस राहाता श्रीमंत आपले वाड्यातून निघाले तो स्वारीसमागमे रा हरीपंत फडके व माधोराव फडके व परशरामपंत व रघुनाथराव मिरजकर व माधोराव पानसे व रास्ते व बिनीवाले व पेठे व घोरपडे व पाटणकर आदिकरून सरदार मानकरी व सरजामी गेले होते. रा फतेसिंग भोसले लोणीहून कूच प्राथःकालींच करून वानोडीस मुकामास येऊन आपण उभयेता बंधु सरंजामसुधा श्रीमंताचे भेटीस रा घासीराम कोतवाल याचे तल्या-पलीकडे आले तो इकडोन श्रीमंताची स्वारी त्या स्थली गेलियावरी आधी मानकरी सरदार याच्या भेटी जाल्या नंतरी श्रीमंताची व उभयेता भोसले याची भेटी जाली तो परजन्ये आजिपयेनी वोळला याकरिता काहींयेक बैठक होऊन बोलणे विशेष जाले नाही. भोसले मजकूर माघारा निघाले ते मुकाम मजकुरी आपल लस्करात गेले आणि श्रीमंत तैसाच पडत्या पाव

२

सात म.शाग निघाले ते हातीचे अंबारीत स्वार होऊन मागील दोन घटिका दिवस शेष राहाता आपले वाड्यात दाखल जाले. या उपर रा हरीपंतनाल्या याणी श्रीमंताची आज्ञा घेऊन निघाले ते मदारुल-महाम याचे वाड्यात आले. स्वारीसमागमे राजश्री नाना गेले नाहीत. रा बहिरोपंत मेहेंदले व सदासिवपंत गुणे वकील व लक्ष्मणपंत कोपर-कर पागे वगैरे मुत्सदी यासी बोलत होते ता तेथे फडके मार याणी येऊन भेटी जाल्याचे वर्तमान सांगितले आणि तैसेच निघोन राजश्री

परशरामपंत मिरजकर याचे घरास गेले. मदारुलमहाम अस्तमिती बेलबागात जाऊन आल्यावर दो घटिका रात्रीस फडके मजकूर मिरजकराचे येथोन राजेश्री नानाच्या वाड्यात मागती येऊन दोन घटिका बोलोन पाचा घटिका रात्रीस आपले घरास गेले. बोलण्याचा भावगर्भ ध्यानास आला की मिरजकर सिंव्हस्ताकरिता गंगास्नानास नाशकास जावयाचा निरोप मागतात. त्यास मदारुलमहाम याचे म्हणे की आम्हीं टोक्यास जात असता मसलतीचे प्रसंगामुळे तूर्त राहावयाचे केले याअर्थी तुम्हींही जाऊ नये. कारण की इग्रेज याजकडील राजकारण लागले आहे याकरिता फौजेची नेमनूक करून देऊन तुमची रवानगी लवकरच मिरजेस करावयाची आहे. त्यास असे प्रसंगास जावयाचे ठीक नाही. मिरजकर पाच लक्ष रुपये फौजेचे सरजामीस मागतात त्याचे उतर की सांप्रत काही द्यावयाचे नाही. बाद बरसात पाहून घेऊ म्हणोन बोलणे लागले आहे. पहावे काये ठैरते. शूत होये. छ ५ रोज मगलवारी मागील सवा प्रहर दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात राजश्री हरीपंततात्या व बाबा फडके व मिरजकर व मेहदले असे आले. दोन घटिका रात्रपावेतो बैठक होऊन खिलवत जाले. श्रीमत मागील सहा घटिका दिवस राहाता रमन्यात घोडी फिरवायासी जाऊन साइकाळी माघारा आपले वाड्यात आले. रा महादाजीपत गुरुजी निरोप घेऊन नाशकास गेले वो रा गोविंदभट निरचेऊर त्रिबकोहून माघारा काल येथे आले. शूत होये. छ ६ रोज बुधवारी तृतीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात रा हरीपततात्या व बाबा व लक्ष्मणराव फडके आले. आकलकोटकर भोसले याजकडील बोलणे च्यार घटिका जाल्यावर मेहेदले मजकूर येऊन दोन घटिका रात्रपावेतो खिलवत जाले भोसले मजकूर याणी वानोडीहून कूच करून रा घासीराम कोतवाल याचे तल्याजवल भवानी पेठेच्या सरहादीस उतरले आहेत. समागमे पाच हाती व पाचच्यारसे स्वार वगैरे सरंजाम आहे. शूत होये. छ ७ रोज गुरुवारी मागील दाहा घटिका दिवस राहाता रा बहिरोपंत मेहेदले राजश्री नानाच्या वाड्यात येऊन उभयेताचे बोलणे होत

होते. तो रा धोंडो महादेव किलेदार त्र्यंबक व येशवंतराव माहादेव किलेदार आमदानगर हे उभयेता येऊन संस्थान मजकूरचे बोलणे केले तो राजश्री हरीपंत फडके येऊन दोन घटिका खिलवत जाले. स्वारीबरावर दरबारचा डेरा नवा तयार बहुत थोरला करविला आहे त्याच्या खाबास लोखंडाचे किलावे तोफखान्यात करविले होते ते सिध्ध जाले म्हणौन रा सकारामपंत पानसे येऊन त्यान्ही किलावे राजश्री नानास व फडके यास दाखविल्यावर फरासखान्यात ठेवावे म्हणौन सांगितले. मिरजकरा बोर डाहा तोफा व पानगे याजकडील कारभारी द्यावयाची परवानगी जाली तेविसीचे बोलणे पानसे मजकूर बोलोन गेले. रा फतेसिंग भोसले याची व मदारुलमहाम याची भेटी रोज मारी व्हावयाची म्हणौन सिध्धता जाली होती मागील च्यार घटिका दिवस राहाता भोसले मजकूर उभयेता बंधू स पंतासी वाड्या-नसी आले. राजश्री नाना व हरीपततात्या चौकाचे दक्षणेकडील वोसरीवर येऊन बसले होते. शाहाजी भोसले याचे वेलेस मदारुल-माहाम याणी आपले वाड्याबाहेर निघोन त्यास घेऊन यावे तो सिरस्ता चालावा म्हणौन भोसले मजकूर याचे लक्ष वकीलानी विनंती ये-विसी केली. भोसले राजश्री नानाच्या वाड्याचे आत येऊन आधी मानकरी लोकाच्या भेटी करविल्या मदारुलमाहाम याचे गानस पूर्व सांप्रदायाचे रीतीचे नाही असे ध्यानास आल्यावर भोसलेही पुढे येऊन बैठकीचे स्थलीच भेटी जाल्या आर्ध घटिका बसले होते. परस्परे भाषणे होऊन नंतर आतर पानदान भोसले यास दिल्हे. वरकड मऱ्हाटे लोकास विडे दिल्ह्यावर भोसले मजकूर माघारा निघोन आपले डेर्यास गेले. राजश्री नाना व हरीपत फडके आर्ध घटिका तेथेच बसोन नतर राजश्री नाना बेलबागात जाऊन साइंकाली माघारा आपले वाड्यात आले. शुत होये. छ ८ रोज शुक्रवारी प्रातःकालीच श्रीमंत रमन्यात घोडा फिरवावयासी गेले होते. प्रहरा दिवसा माघारा आपले वाड्यात आले पागे व मऱ्हाटे सरदार व मानकरी शंभर सवासे आसामीस श्रीमंतणी भोजनास बोलविले होते. दीढा प्रहरा सर्वत्र सरकारवाड्यात येऊन भोजने

जाली. यावर श्रीमंत दिवानखान्यात येऊन बसले आणि सर्वत्रास विडे व सुगंधी साहित्य व फुलाचे हार व गजरे या प्रो बहुमान करून मार्गस्त केले. त्रितीय प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार वगैरे आले होते. रा त्रहिरोपत मेंदले येऊन राजश्री नानासी बोलत आसता राजश्री हरीपततात्याही आले. नतर उभयेताचेच खिलवत दोन घटिका जाले. यानंतर मदारुलमाहाम भागील च्यार घटिका दिवस शेष राहाता निघाले ते राजश्री आपा बलवंत याचे डेऱ्यास गेले. फडकेही होते तेव्हा त्रिवर्गाचे खिलवत साइकालपर्यंत जाले यानंतर राजश्री नाना व तात्या माघारा निघोन आपले घरास फडके मजकूर आले आणि राजश्री नाना परभरा तोफखान्यात जाऊन श्रीव्यंकटेशाचे दर्शण करून दो घटिका रात्रीस आपले वाड्यात आले करनाटकचे स्वारीस मिरजकर याजला रवाना करीतच आहेत. परतु राजश्री आपा बलवंत याजलाही पाठविनार म्हणौन वर्तमान आहे. येविसीचा ठराव ठैरल्यावर सेवेसी लेखण केले जाईल. बोलणे लागले आहे. राजश्री नाना फडनवीस पौर्णिमेचे चद्रग्रहणास तुला-पुरास जाणार अैसी वार्ता आहे. रा रामाजी पाटील वकील दिगा गाइकवाड याजला समाधान नाही. मार निलेची पत्रे राजश्री मानाजी गाइकवाड याजकडे बडोद्यास गेली आहेत. त्याचे उतर आद्यापि आले नाही. आल्यावर तहात गोष्ट येईल अैसे आहे. टिपूकडील वकील वाईसच आहेत. त्याजकडील बोलणे, रास्ते मध्यस्त आहेत ते बोलतात. मदारुलमाहाम याचे मानस की वकील मार अैवज घेऊन आले आहेत, तो हास्तगत करावा, वकील येथे न येता सामदाम करून पैका घ्यावा आणि तेथोनच माघारे जावे अैसे आहे. याउपर काये निश्चये होतो पाहावे. शृत होये याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. कृपा करून सदैव आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे कृपा लोभ कीजे हे विज्ञापना नवाब कायेमुदौला सुरतकर याचा काल छ २४ माहे जाम्वरीस जाल्याचे वर्तमान आले व नवाब नजीमु-दौला खबायेतकरही मृत्य पावले, शृत होये. हे विज्ञापना.

---

**A. R. No. 198** १५ शाबान १२०४ हिजरी

३० अेप्रिल १७९०

(प्रारंभीच्या ओळी फाटल्या आहेत)

हिजरी रोज शुक्रवार

पूर्वी छ ८ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ ९ रोजीं सरकारचे डाकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जालें असेल. सांप्रत छ १५ रोजपर्यंत येकिले व जाले वर्तमान सांप्रदायाप्रमाणे दफेवार लिहिले असें

परशराम रामचंद्र मिरजवाले याची रवानगी शत्रुनचे मसलतीस करणार म्हणोन पूर्वी लिहिले आहे त्यास परशरामपंत मिरजवाल्यासमागमे पचवीस हजार फौजेची नेमणूक केली आहे त्यास कृष्णराव बलवंत यासमागमे जरीपटका व पागा व हुजरातचे लोक व सरजामी वगैरे दाहा हजार फौज देऊन परशरामपंत मिरजवाल्यासमागमे कृष्णराव बलवंतास रवाने करणार म्हणोन येकिलें

परशरामपंताचे हमराह दाहा तोफा व दोन गरनाळा देणार. त्यास बाळाजीपंतानी तोफखान्याचे दारोग्यास सूचना केली की दाहा तोफा व दोन गरनाळा सरंजामसाहित सारसीरानजीक जाऊन उतरवण त्याजवरून छ ९ रोजी सारसीरानजीक तोफा व गरनाळा मिळून बारा व गाड्दी सेभर जाऊन उतरले आहेत. हरिपंत फडक्याची तबियत दर्दसिनमाने छ १२ रोजपासून बाहिली आहे दरबारास जात नाहीत.

छ ९ रोज शेनवारी राव पंतप्रधान प्रात:काळी बेदार होऊन रवालाचे गायेन येकून स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून कागजावर दस्तखते केली नंतर आराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यात बसून गंजिफा आस्तमानपर्यंत खेळून रात्रौ संध्या व भोजन करून आरामास माहलात गेले

बाळाजीपंतानी छं मारी तिसरे प्रहरी हरीपंत व बहिरोपंत मेंदळयास आपले हवेलीस बोलाऊन आणऊन दोन घटका रात्रपर्यंत त्रिवर्गाची खिलवत जाली. नंतर बाळाजीपंत बेलबागात जाऊन देव-दर्शन घेऊन हवेलीस गेले. हरिपंत व मेंदळें मजकूर आपले हवेलीस गेले.

छ १० रोज रविवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन येकादसी म्हणून स्वारी तयार करऊन आणऊन हाथीवर स्वार होऊन पर्वतीस देवदर्शनाकरितां गेले. राव मवसुफासमागमें रघुनाथराव नीलकंठ मिरजवाले व गंगाधरराव रास्तें व रघुनाथराव नारायेण व माधवराव रामचंद्र व सखारामपंत पानसें व विनिवालें व घोरपडे व पाटणकर व दरेकर व निंबालकर व घांटगे व पंवार वगैरे सरदार व मुतसदी मंडली व स्वार च्यारपांच हाजार व गाडदी व शागिर्द-पेशा वगैरें जमीयेत होती. राव पंतप्रधानानी पर्वतीसच स्नानसंध्या-दिक करून देवदर्शन घेऊन सरदार मुतसद्यासहित उपहार करून पुन्हा हाथीवर स्वार होऊन दाहा घटका दिवसास बेलबागात जाऊन विष्णुचे दर्शन घेऊन हवेलीस जाऊन आराम केला. आडीच प्रहर दिवसास पुन्हा उपहार करून सात मजली बंगल्यावर जाऊन बसले होते रात्रौ संध्या व उपहार करून कवाल्याचे गायेन यैकून आराम करायास माहलात गेले.

बाळाजीपंताने छ मारी तिसरे प्रहरी आपले हवेलीस हरिपंत व परशराम रामचंद्र मिरजवालें व बहिरोपंत मेंदळे यासी बोलाऊन आणऊन अस्तमानपर्येत खिलवत केली. उपरांतिक बाळाजीपंत बेल-बागात न जाता आपले खास बागात जाऊन बागाची सयर करून तेथे संध्या करून दोन घटका रात्रीस आपले हवेलीस गेले. हरिपंत व मेंदळे मजकूर आपले हवेलीस गेले परशराम रामचंद्र राव पंतप्रधानाचे हवेलीस जाऊन राव मवसुफासी यक घटका बोलून आपले मकानास गेले.

छ ११ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन तालिमखान्यात जाऊन तालमीचा हुनेर सिकून स्नानसंध्या देवपूजन करून भोजन केले. नंतर कागजावर दसखते करून अराम केला. अडीच प्रहर दिवसास उपहार करून स्वारी तयार करऊन लक्ष्मणराव व माधवराव फडके व रघुनाथराव नीलकंठ मिरजवाले व रास्ते व जाधव व पाटणकर व घोरपडे व पंवार व भापकर व निबालकर वगैरें सरदार व स्वार तीनच्यार हजार व गाडदी हजार दीड हजार व शागिर्दपेशा वगैरें जमियेत घेऊन राव मवसूफ तिसरे प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून हरणाचे रमण्यात जाऊन स्वार व गाडदी हरणाचे आसपास उभे करून हरणें धरावी इतकियात हरणे आवग्र पळून गेली. सांपडली नाहीत म्हणून आस्तमानी हवेलीस गेले. रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायेन तीनच्यार घटका यैकून आरामास गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी हरिपंतास आपले हवेलीस बोलाऊन आणऊन दोनतीन धटका खिलवत केली. इतकियात रामजी पाटील जाधव नि॥ सिंदे व नारायेणभट दीक्षित सातारकर आले म्हणून त्यासी पंत मारनिलेनी बोलून मार्गस्त करून पुन्हा बालाजीपंताची व हरिपंताची दोनतीन घटका खिलवत जाली. नंतर बालाजीपंत प्रदोष म्हणून आपले बागात आस्तमानी भोजनाकरिता जाऊन बागातच भोजन करून प्रहर रात्रपर्यंत तवाफाचा नाच पाहून हवेलीस गेले. हरिपंत आस्तमानीच आपले हवेलीस गेले.

छ १२ रोज मंगलवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्यादिक करून भोजन केले. नंतर कागजावर दसखते करून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून फील-खान्यातील हथी आणऊन नजरंदाजी करून सात मजली बंगल्यावर-ने जाऊन आस्तमानपर्यंत चवसर खेळून रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायेन यैकून आराम करायास माहलात गेले.

बाळाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी परशराम रामचंद्र मिरजवाले यास आपले हवेलीस बोलाऊन आणऊन अस्तमानपर्येत मिरजवाले मजकुरासी बोलून मार्गस्त केले.

हरिपंत फडके छ मजकुरी दर्दशिकमाने बहुतच काहिली. बाळाजीपंतानी यकदोन बोलाऊ पाठविली. परंतु पंत मजकूर बाळाजीपंताचे हवेलीस गेले नांहीत.

गमाजी पाटील दिा मानाजी गाइकवाड छ मजकुरी बारा घटका दिवसास बाळाजीपंताचे हवेलीस जाऊन दोनतीन घटका पत मााग्निळेमी गाइकवाडप्रकर्णी बोलून आपले मकानास गेले.

बाळाजीपंत छ मजकुरी प्रहर रात्रीस बालकृष्णपंत सपरें याचे घरास जाऊन दोनतीन घटका बसून हरिकथा यैकून आपले हवेलीस गेले.

छ १३ रोज बुधवारी गव पतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन तीन घटका तीरंदाजी करून स्नानसंध्या देवपूजन करून भोजन केले. उपरातिक गजिफा तीनच्यार घटका खेळून आराम केला. अडीच प्रहर दिवहसास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यात बसून कवालाचे गायेन येकून बगल्यावरील छेज्यावर जाऊन पुण्याचे आबादी वगैरेची सयर करून रात्रौ चद्रगहण म्हणून घटका दिवस राहता भोजन करून प्रहर रात्रपर्यंत चवसर खेळून आराम करायास माहलात गेले.

बाळाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीतच बसून माहलाती वगैरे हिशब मनास आणोन दोन घटका दिवस राहता बेलबागात जाऊन देवदर्शन घेऊन हवेलीस गेले.

छ १४ रोज गुरुवारी गव पंतप्रधान चंद्रगहण म्हणोन प्रहररात्र पिछेली राहता बेदार होऊन ग्रहणसधीत स्नान हवेलीतच करून प्रथम यक गोदान दिल्हे. नंतर अश्वदान द्यावे म्हणून पागेतील निळा

घोडा आणऊन मये सरंजाम व रुप्याची सांकली व ब्राम्हणास पोशाक तयारी व ढाल तलवार व तरकश व दक्षणा नक्त रुपये ५०० येणे-प्रमाणें ब्राम्हणास देऊन वरकड ब्राहणास हजारबारासे रुपये खैरात करून होम हवन इत्यादिक करून तीन घटका दिवसा पुन्हा स्नान करून अल्प उपहार करून हरणें व बाज वगैरें आणऊन तमाशा पाहून आराम केला. तिसरें प्रहरी सात मजली बंगल्यात बसून गजिफा व चवसर खेळून रात्रौ चंद्रोदंई भोजन करून लवकरच माहलात आरामास गेले.

बालाजीपंतानी चंद्रगहणसमई आपले हवेलीनच स्नान करून ब्राम्हणास खैरात व गोदाने दिल्हीं व छ मजकुरी हवेलीतच होते दोन घटका दिवस राहता बेलबागात जाऊन विष्णुच दर्शन घेऊन हवेलीस जाऊन रात्रौ चंद्रोदंई भोजन केले.

छ १५ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून गजिफा तीनच्यार घटका खेळून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी तयार करऊन लक्ष्मणराव व माधवराव फडके व नीलकंठराव खास-गीवाले व माधवराव रामचंद्र व जाधव व भापकर व निंबालकर व पाटणकर व घोरपडे वगैरें सरदार व स्वार तीनच्यार हजार व गाडदी वगैरें जमीयेत राव मवसूफानी समागमे घेऊन तिसरे प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन तीनच्यार घटका घोडी फेरून घटका दिवस राहता राव मवसूफ हवेलीस जाऊन रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायन यैकून आराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी आस्तमानी आपले बागात मिरज-वाल्यास भोजनास बोलाविले होते. भोजन जाल्यावर परशराम रामचद्र व मारनिलचे कनिष्ठ पुत्र व रघुनाथराव नीलकंठ व सिवराव नीलकंठ राम साडेतीन पारचेप्रमाणें वस्त्रें व हमराही इस्म पधरा यास पागोटी, सेले, पैठणी देऊन बालाजीपतानी मिरजवाले मजकुराची

मुदारात केली. नंतर परशरामपंत वगैरें आपले हवेलीस गेले बाला-जीपंत दाहा घटका रात्रीस बागातून आपले हवेलीस गेले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

A. R. No. 199 ६ रमजान १२०४ हिजरी
२० मे १७९०

(आरंभीचा मजकूर फाटलेला आहे.)

पूर्वी छ २९ माहे शाबान (मजकूर फाटला) मान लिहून छ ३० रोजी सरकारचे डांकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जालें असेल. सांप्रत छ ६ माहे रमजानपर्यंत यैकिलें व जाल्‍लें वर्तमान सांप्रदाया प्रो दफेवार लिहिलें असे.

परशराम रामचंद्र मिरजवालें छ ४ माहे रमजानी मौजे वानवडी-हून कूच करून मौजे हडपसरानजीक जाऊन मुकामात करून राहिले आहेत परशरामपंताचे समागमेचा तोफखाना वगैरें सरंजाम छ ७ माहे रमजानी मिरजेस पुढे रवाना करणार. परशराम रामचंद्र छ ९ रोजी हडफसराहून कूच करून जाणार म्हणोन यैकिलें.

फतेंअलीखानाकडील वकील वांईस आले आहेत. लक्ष्मणराव रास्ते समागमे घेऊन पुण्यास येणार म्हणोन लिहिले आहें. त्यास लक्ष्मणराव रास्तें छ ४ माहे रमजानी पुण्यास आलें. राव पतप्र-धानाची व बालाजीपंताची भेटी घेंतली. छ ५ रोजी अबदुलनबीखान व गुलामहुशनखान वकील नि।। फतेअलीखान पुण्यांस आले. राव पंतप्रधानानी विश्वासराव चिंतामण पागेवाले वकील मजकुरांस इस्तकबाल पाठविले होते. वकील मजकुरास लक्ष्मणराव रास्ते याचे पेठत राहवयास मकान दिल्हें आहे व वकीलाचे समागमें बेवीस बेल होनाचे आहेंत. एकंदर दोनतीन लक्ष आहेत व पाचसहा लक्ष रुपयाच्या हुंड्या आहेंत म्हणोन यैकिलें.

पुण्यात शहरात रात्रौ पांचसाहा दिवसापासून चौकीपाहाऱ्याचा बंदोबस्त होत आहे. आबादीत जागाजागा नाके आहेत तेथे हजार पांचसे स्वार तयार होऊन उभे राहत आहेत व गस्त रात्रौ दोनतीनसे स्वाराची कुल आबादीत फिरत आहे. राव पंतप्रधानाचे हवेलीतही चौकीपाहऱ्याची बंदोबस्ती बाळाजीपंतानी करविली आहे. याची खुलस कलत नांही. शोध करून मागाहून लिहिले जाईल.

मुंबईहून मिस्तर उकीट इंगरेज मिस्तर मालट वकील इंगरजाचे भेटीस पुण्यास येणार. सबब बालाजीपंताची परवानगी मिस्तर मालट वकीलानें घेतली. से पन्नास मनुशानिसी यावे म्हणून राव पंत-प्रधानाचे दस्तके राहदारीचे देविलें.

अंबोजी इंगले व बापोजी होळकर जयेपूरवाल्याचे मुकाबिल्यास होते. त्यास सांप्रत आबोजी इंगल्याचे फौजेसी व जयपूरवाल्याचे कहीवाल्याचे समागमीचे फौजेसी लढाई जाली. से दोनसे लोक ठार व जखमी उभयताकडील जाली. आंबोजी इगल्याकडील सिकस्त जाली व इस्मालबेग जयेपूरवाल्यासी मामिल जाला आहे म्हणून वर्तमान यैकिलें.

राव पंतप्रधानाचे हवेलीत बालाजीपंतानी पांचसाहा दिवसां-पासून बहुत चोकीपाहरियाची बंदोबस्ती करविली आहे. हररोज रघोपंत गडबोले राव मवसुफाचे हवेलीतच निद्रा रात्रीस करीत आहेत.

छ ३० रोज शनिवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून च्यारपाच घटका गंजिफा खेळून आराम केला. अडीच पहर दिवसास द्वितीये भोजन करून कवालाचे गायेन यैकत बसले होते. तिसरे प्रहरी यैनेमाहलात दरबार करून बसले. बालाजीपंत वगैरे मुतसदी हुजर जाले होते. दोनतीन घटका राव मवसूफ दरबारात बसून हरयक जवाबसाल मनास आणोन बालाजीपंतासहित खिलवतीस जाऊन तीनच्यार घटका खिलवत

करून राव मवसूफ बरखास्त होऊन गेले. बालाजीपंत आपले हवेलीस गेले. राव मवसुफानी रात्रौ संध्या व भोजन करून चवसर खेळून आराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी रात्रौ कवालाचे गायेन प्रहर रात्र-पर्यंत यैकून निद्रा केली.

हरीपंत छ मजकुरी तिसरे प्रहरी गुलटेंकडीनजीक बागात चिंतामणराव वगैरे पुत्रासहित गेले होते. तिकडून परशराम रामचंद्र मिरजवालेही बागात गेले. च्यार घट(का)पर्यंत हरिपंताचे व मिरजवाले मजकुराचे बोलणे जालें. नंतर बागातच रात्रौ भोजनें जाली. नव घटका रात्री हरीपंत आपले हवेलीस गेले. मिरजेवाले मजकूर आपले मुकामास गेले.

बालाजी केशव नाईक थथे, राव पंतप्रधानाचे मेंव्हणे, याचे स्त्री काहिली होती. छ मजकुरी प्रहर रात्रीस थथे मजकुराचे स्त्रीचा काल जाला.

छ १ माहे रमजान रोज रविवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन तालीमखान्यात जाऊन तालमीचा हुनरे सिकून स्नान संध्या देवपूजन करून भोजन केले. नंतर आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून चिंतामणराव फडक्यास बोलाऊन आणऊन आस्तमानपर्यंत सात मजली बंगल्यात चवसर व गंजिफा खेळून रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायेन यैकून आरामास माहलात गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस हरि-पंतास व बहिरोपंत मेंदळ्यास बोलाऊन आणऊन दोनतीन घटका खिलवत केली. इतकियात मिस्तर मालट वकील इंगरेजाकडील बोलावणे मेंदळें मजकुरास आले. सबब मेंदळे मजकूर मिस्तर मालट वकिलाचे मकानास गेल्यावर पुन्हा अस्तमानपर्यंत बालाजीपंताची व हरीपंताची खिलवत जाली उपरांतिक बालाजीपंत संध्येस उठले. हरीपंत आपले हवेलीस गेले.

मिस्तर मालट वकील इंगरेजाने परशराम रामचंद्र मिरजवालें यांस छ मारी तिसरे प्रहरी ज्याफतीस येण्याविसी प्रातःकालीच सूचना केली. त्याजवरून मिरजवाले मजकूर इंगरेजाचे मकानास गेले होते. मिस्तर मजकूर बंगल्याबाहिर येऊन परशरामपंत व रघुनाथराव नीलकंठ वगैरेस घेऊन गेला. च्यारपांच घटकां तवाफाचा नाच जाला. उपरांतिक मिस्तर मालट वकीलाने मिरजवाले मजकुरास जंवाहिर व वस्त्रें वगैरें दिल्ही. त्यांचा तपशील.

१ परशराम रामचंद्र आसामी येक

२ जवाहिर रकमें

१ सिरपेंच मुरसा
१ जिगा

——
२

८ वस्त्रें सनगें

१ पागोटे पैठणी
१ सेला पैठणी
३ ज्यामेवार थानें सुमार
१ पटका
१ किमखाबी थान
१ दुशाला गुलाबी

——
८

५ हत्यारें

१ पस्तोल
१ पेशकबज
१ तलवार
१ दस्ताना
१ पेटी लोखंडी

——
५

१ घोडा रास

रघुनाथराव नीलकंठ आ॥ १

२ जवाहिर रकमें

१ सिरपेंच मुरसा
१ जिगा

—
२

७ वस्त्रें सनगें

१ पागोटें
१ सेला
२ ज्यामेवार थानें
१ पटका
१ दुशाला पिवली
१ किमखाबी थान

—
७

२ हत्यारें

१ पस्तोल
१ दस्ताना

—
२

हमराही इस्म मुमार ८ यास च्यारच्यार पारचे वस्त्राप्रमाणे वस्त्रें दिल्हीं.

येणेंप्रमाणें जवाहिर व वस्त्रें वगैरें मिरजवाल्यास देऊन तवाजा केली. पांदान घेऊन मिरजवाले आपले खेम्यास गेले.

छ २ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून आराम केला. आडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी सिध करऊन लक्ष्मणराव व माधवराव फडके व नीलकंठराव खासगीवालें व माधवराव रामचंद्र व

घोरपडे व जाधव व भापकर व निंबालकर व नाईक वगैरें सरदार व दोन आडीच हजार स्वार व गाडदी वगैरें जमीयेत समागमे घेऊन राव मवमूफ तिसरें प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक मैदानात जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून हरणाचे रमण्यात जाऊन हरणाचा वगैरें तमाशा आस्तमानपर्यंत पाहून दोन घटका रात्रीस हवेलीस जाऊन रात्रौ संध्या व भोजन करून आराम केला.

बालाजीपंत आपले हवेलीतच होते. रामजी पाटील जाधव नि।। सिदे छ मजकुरी तिसरे प्रहरी पंत मारनिल्हेंचे हवेलीस गेले होते. च्यारपाच घटका खिलवत जाली. नंतर बालाजीपंत संध्येस उठले. रात्रौ बालाजीपंतानी तवाफाचा नाच प्रहर रात्रीपर्यंत पाहिला.

परशराम रामचंद्र गिरजवाल्याचे मकानास मिस्तर मालट वकील इंगरेज छ मजकुरी तिसरे प्रहरी मिरजवाले मजकुराचें सूचनेप्रमाणे ज्याफतीकरिता गेले होते. दोनतीन घटका मिस्तर मालट वकील मिरजवाल्याचे खेम्यात बसला. तवाफाचा नाचही जाला. उपरांतिक जवाहिर व वस्त्रें दिल्हीं.

१ मिस्तर मालट वकीलास

- १ सिरपेंच मुरसा
- १ कलगी
- १ घोडी गग

१ वस्त्रें

- १ पागोटे
- १ सेला
- ३ ज्यामवार थान
- १ पटका
- १ किमखाबी थान
- १ शालजोडी

---

८

१ तलवार

१ मिस्तर हरण यास च्यार पारचे वस्त्रें
१ मिस्तर इठाव यास च्यार पारचें वस्त्रें
१ हमराही इस्म आ।। ५ यास सेले पागोटीं
१ बहिरोपंत मेंदळचास साडेतीन वस्त्रें
१ दुभाषी यास च्यार पारचे वस्त्रें

येणेंप्रमाणें जवाहिर व वस्त्रें देऊन मुदारात केली. नतर मिस्तर मालट वकील इंगरेज आपले मकानास गेला.

बालाजीपंत छ मजकुरी प्रातःकालीच भास्करपंत भानूस आराम नांही म्हणून पत मागनिले परामृशास गेले होते.

छ ३ रोज मंगलवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन कवालाचे गायेन यैकून स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून तीन च्यार घटका गजिफा खेळून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीय भोजन करून सातमजली बंगल्यात बसून अस्तमानपर्यंत चव-सर व शेतरंज खेळून रात्रौ संध्या व भोजन केले. उपरातिक आरा-मास गेले.

बालाजीपत मजकुरी तिसरे प्रहरी पर्शराम रामचद्र मिरजवाले वानवडीनजीक आहेत तेथे जाऊन तीनच्यार घटका मिरजवाले मज-कुरासी खिलवत करून हवेलीस गेले नंतर बाळाजी केशव नाईक थथे व रंगराव त्रिबक याचे घरास मातमीस जाऊन आपले हवेलीस गेले.

छ ४ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्राथःकाली बेदार होऊन स्नानसध्या देवपुजन व भोजन करून तीरंदाजी तीनच्यार घटका खेळून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून जेगदेवराव नाईक निबाळकर अकुलुजकरास इस्तकबाल जावयाकरिता स्वारी सिध करऊन लक्ष्मणराव व माधवराव फडके व रघुनाथराव

नीलकंठ मिरजवाले व घोरपडे व जाधव पाटणकर व भापकर वगैरे सरदार व स्वार दोनतीन हजार व गाडदीं मभर दोन हजार व शागिर्द वगैरे जेमियेत समागमे घेऊन राव मवसूफ तिसरे प्रहरी हाथीवर स्वार होऊन कोंतवाल तलावानजीक गेले. तिकडून जेगदेवराव नाईक निबालकर आले. नाईक निबालकर याची स्वारी घोड्यावर म्हणून राव पंतप्रधानही हाथीवरून घोड्यावर स्वार जाले, नतर भेटी जाली. राव मवसूफ तेथेच घोडी फेराथास गेले निबालकर मजकूर बाला-जीपत व हरीपंताचे भेटीकरिता गेले राव मवसूफानी तीनच्यार घटका घोडी फेरून आस्तमानी हवेलीस जाऊन रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायेन येकून आराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आपले हवेलीतच होते. तिसरे प्रहरी बहिरोपंत मेंदळे व चितामणराव फडके आले त्यासी खिलवत करीत बसले. इतकियात लक्ष्मणराव रास्ते भेटीकरिता आले. भेटी जाली नतर गेले उपरांतिक जगदेवराव नाईक निबालकर पत मारनिलेचे भेटीस आले. त्याचीही भेटी जाली. इतकियात भास्करपत भानू काहिली होते ते मृत पावले. भानू मजकूर बालाजीपताचे चिचेरे बधु राबब अवरोध बालाजीपतास आला. त्याजवरून मर्वत्र बरखास्त जालें.

लक्ष्मणराव रास्तें छ मजकुरी वांईहून फतेअलीखानाकडील वकील समागमे घेऊन पुण्यास आले. अवल बालाजीपताची भेटी घेऊन साहा घटका रात्रीस राव पंतप्रधानाची मुलाजमत जाली. फते-अलीखानाकडील वकील पुण्याहून दोन कोसावर राहिले छ ५ रोजी पुण्यास येतील

परशराम रामचद्र मिरजवाले वानवडीनजीक मुकामात करून होते. छ मजकुरी कूच करून मौजे हडपसरानजीक जाऊन राहिले आहेत.

छ ५ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन कवालचे गायेन येकून स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून आराम

केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून सातमजली बंगल्यावर जाऊन चवसर व गंजिफा अस्तमानपर्यंत खेळून रात्रौ संध्या व भोजन करून आराम करावयास गेले.

बालाजीपंत आवरोधामुळें आपले हवेलीतच छ मजकुरी होते चिंतामणराव फडक्यासी अस्तमानपर्येंत खिलवत जाली.

अबदुलनबीखान व गुलामहुशनखान वकील निा फतेअलीखान छ मजकुरी तिसरे प्रहरी पुण्यानजीक बालाजी नाईक भिड्याचे बागा-समीप आले. राव पंतप्रधानाकडील विश्वासराव चिंतामण पाग-वाले इस्तकबाल गेले. भेटी जाल्यानंतर वकील मजकुराने विश्वासराव यास च्यार पारचे वस्त्रे दिल्ही. उपरांतिक विश्वासराव चिंतामण बालाजीपंताकडे जाऊन वर्तमान सांगितले. वकील मजकूर लक्ष्मणराव रास्ते याचे पेठत मकान नेमून दिल्हे तेथे राहिलें. त्यासमागमे दोन तीनसे गाडदी वगैरें जमीयेत आहे. राव पंतप्रधानाकरिता दोन हाथी व जेवाहिर व वस्त्रे आणल्ी आहेत व खडणीचे यैवजाचे बेवीस बैल होन भरून आणले आहेत.

छ ६ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन कवाल्लाचे गायेन यैकून स्नानसंध्यादिक करून भोजन केले. नंतर तीरअंदाजी दोन घटका करून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यात बसून अस्तमानपर्येंत गंजिफा व शेतरंज खेळून रात्रौ संध्या व भोजन करून आरामास गेले.

बालाजीपंत छ मजकुरी आपले हवेलीतच होते. तिसरे प्रहरी दप्तरचे कारकुनास आणऊन कांही हिशब पाहिले नंतर बहिरोपंत मेंदले व सदाशिव दिनकर निा नारो सिवदेवासी अस्तमानपर्यंत खिलवत

(पुढील मजकूर फाटलेला आहे)

---

**A. R. No. 200**

१४ रमजान १२०४ हिजरी
२८ मे १७९०

श्री

विनंती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल तागाईत छ १४ माहे रमजान मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित असोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे विशेष येथील वर्तमान छ ७ माहे मजकूर रोज शनवार त्रितीये प्रहर दिवसा अखबारात सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले, ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल तदनंतरी येथील वर्तमान त्रितीय प्रहरी न्याहालकमाहाम याचे वाड्यात राजश्री बाबा व लक्ष्मणराव फडके व मुत्सदी वगैरे आले होते राजश्री रघुनाथराव पटवर्धन कुरुंदवाडकर राजश्री नाना फडनवीस याचे भेटीस येऊन येक घटिका मोहीमसंबंधाचे बोलणे बोलोन माघारा गेले. नंतर अस्तमितपर्यंत किरकोळ कामकाजे होऊन फडके व मुत्सदी वगैरे आपलाले घरास गेले आपनाजी स्वारी मागील साहा घटिका दिवस राहाता रमन्यात गेले होती तेथे थोडा फिरून माघारा निघाले ते साइंकाली आपल्या वाड्यात आले राजश्री हरिपंत फडके गुलटेकडीचे बागात गेले होते. ता चितोप प्रहरी राजश्री परसराम रामचंद्र पटवर्धन हाडपसरीहून निघोन फडके मजकूर याचे भेटीस बागात आले उभयताचे खिलवत होत असता राजश्री आपा बलवंत भिड्याचे बागातून निघाले ते तेथेच गेले व राव ब्राह्मण रघुनाथ मेहेंदले त्या स्थली येऊन चौघाचे खिलवत च्यार घटिका रात्रपावेतो जाले. उपरांत सर्वत्राणी तेथेच फराल केले पानदान विडे व सुगंधी साहित्य व फुलाचे हार व गजरे या प्रो। जाल्यानंतर प्रहर रात्री मिरजकर मजकूर व आपा बलवंत तेथोन निघाले ते आपलाले डेऱ्यास गेले व फडके व मेहेंदले अकरा घटिका रात्रीस शहरात येऊन आपलाले घरास आले खिलवताचा भाव ध्यानास आला की मिरजकर मजकूर

मोहिमीस निघावयाकरिता श्रीमताची आज्ञा घेऊन महूर्तेकरून डेरे दाखल जाले. त्यावर कूच करून वानोडीस येऊन राहिले असता मारग-निले याचे मुदबखाचे डेन्यातून चोराणे भाडी वगैरे वस्तभाव नेली. तेव्हा त्या महूर्ताचे जाणे ठीक नाही. संशये प्राप्त जाला म्हणौन मदा-रुलमाहाम व फडके याचा विच्यार जाला की त्याजला माघारा याव-याचे करवावे आणि मागती श्रीमंताचे दर्शण घेऊन जावे त्याजवरून राजश्री हरीपंततात्या रोज मजकुरी बागात जाऊन येविशीची मसलत करून निश्चंये ठैराविला त्यांस उदईक मिरजकर मजकूर महूर्त ठाळा-वयाकरिता आपले हावेलीस येणार. दुसरे, पेशजी निघेजन शोदे कोण्ही येक फिरस्ते होते. त्याणी रात्रौ कसबी लोकाचे घरास येऊन राहिले आणि दग्याचे कर्म करून तिघी कळवानतीस जिवे मारून त्याची वस्त-भाव घेऊन पळाले. हे वर्तमान कोतवालास कळल्यावर त्याची चौकसी करून शोध करताना ते सापडले. सरकारात वर्तमान मागितले आणि त्याजला कैद करून ठेविले. त्यास कितिक दिवस गुजरले तेव्हा तिघे-जना पैा येक निराप(रा)ध दिसोन आला. त्याजला सोडोन दिल्हे आणि दोघे आन्याई खरे असे सिद्ध जाल्यावर सरकारातून आज्ञा जाली की त्याजला हातीचे पाई बाधून शहरात फिरवावे. त्याजवरून दोघा-चोरास दो हातीचे पाई बाधोन फिरविताच बुधवार पेठेचे चावडी-जवल त्याचे प्राण गेले. श्रुत होये छ ८ रोज रविवारी मागील सवा प्रहर दिवस राहाता मदारुलमाहाम याचे वाड्यात राजश्री सदासिव दिनकर वकील येऊन त्याचे खिलवत दोन घटिका जाहाले तो राजश्री हरीपंत फडके आले. तेव्हां वकील मजकूर बरखास्त होऊन फडके व मदारुलमाहाम या उभयेताचे खिलवत होताना मेहेदले यास बोलाऊ पाठविले. त्यास तेही आल्यावर त्रिवर्ग बसोन चार घटिका इंग्रेज-प्रकर्णी मसलतीचे बोलणे होत आहे तो राजश्री परशराम रामचंद्र मिरजकर हाडपसरचे मुकामीहून सडे स्वारीनसी निघोन येक घटिका दिवस शेष राहाता गावात येऊन राजश्री नाना फडनवीस याचे वा-ड्यात आले. तेव्हा मदारुलमाहाम व हरीपततात्या व मिरजकर व मेहेदले मार असे दोन घटिका रात्रपावेतो बसोन खिलवत जाले.

मागील तीन घटिका रात्रीस हस्त नक्षत्रावर मिरजकर याणी श्रीमंताचा निरोप घेऊन स्वार होऊन जावे असे निश्चयात आले. त्याजवरून

२

राजश्री परसरामपंत मिरजकर याणी मदारुलमाहाम यासी बोलणे करून निरोप घेऊन निघाले ते ती घटिका रात्री आपले हावेलीस गेले. नंतर अर्ध घटिकानी फडके व मेहेदळे मदारुलमाहाम याचे येथून निघोन आपआपले घरास गेले राजश्री गणपत आनंदराव मेहेंदळे याजला दोन हजार फौज ठेवावयाविसी मदारुलमाहाम याणी सांगितले आणि मिरजकराबराबर जावयाची नेमणूक केली आहे, त्याजवरून मारनिले पाचच्यारसे स्वार तूर्त ठेविले आहेत. रोज मजकुरी त्याचे मर्हूर्त बाहेर निघावयाचे. सबब मेहेदळे मजकूर प्रहर रात्री श्रीमंताचे वाड्यात गेले होते. त्यास त्याजला वस्त्रे एकसतीची देऊन विडे दिल्हे. मारनिले आज्ञा घेऊन निघाले ते राजश्री नानाचे वाड्यात आले. दोन घटिकापर्येत बोलणे होऊन निरोप घेतला आणि मर्हूर्त करून आपले घरीहून स्वार जाले ते मोतीबागात जाऊन डेरे दाखल जाले श्रुत होये. छ २, रोज सोमवारी मागील च्यार घटिका रात्र शेष राहाता राजश्री हरीपंत फडके आपले घरीहून निघोन श्रीमंताचे वाड्यात गेले तो मागाहून येका घटिकानी राजश्री परसराम रामचंद्रही सरकारवाड्यात आले श्रीमंत गणपतीचे दिवाणखान्यांत येऊन बैठक जाहली फडके मजकूर याणी श्रीमंतास विनंती करून मार्यांन वृत पेशजी विदित केलेच आहे. त्याजवरून श्रीमंताणी मिरजकर यास एकसतीचे समर्द पोशाक वगैरे दिल्हे.

| | | |
|---|---|---|
| १ पोशाक | १ ढाल | |
| १ सिरपेच | १ तरवार | |
| १ मोत्याची कंठी | १ नौबतीचा हाती | साहेबनौबत |
| ३ | सरकारातून दिल्ही. | |
| | ३ | |

मदरहू या प्रो देऊन पानदान विडे दिल्हे. मागील दीड घटिका रात्र

शेष राहाता हस्त नक्षत्रावर मिरजकर याणी महूर्तेकरून श्रीमंताची आज्ञा घेतली आणि तैसेच निघाले ते हाडपसरास आपले लस्करात जाऊन नंतर तेथोन रोज मारी चौ कोसाचा कूच करून लोणीस मुकामास गेले. रा जगदेवराव निबालकर अकलोद येथील याची नेमणूक मिरजकराबराबर जावयाची जाली. सबब निबालकर मजकूर श्रीमंताचे वाड्यात येऊन आज्ञा घेतली. त्याजलाही वस्त्रे व विडे श्रीमंताणी दिल्हे. मारनिले आपले सरंजामानसी मिरजकरा बोर स्वार होऊन गेले या प्रो मिरजकर वगैरे याजला श्रीमताणी रुकसत केले आणि प्रात स्नान करून सूर्योदयापूर्वी येकादसी करिता निघाले ते दोन घटिका दिवस येता पर्वतीस गेले. च्यार घटिका श्रीदेवीचे पूजन जाल्यावर नंतर मडलीसही तेथेच फराल करून प्रहरा दिवसा स्वारी माघारा निघाली ते येताना बेलबागात येऊन देवदर्शण घेतले आणि सवा प्रहर दिवसाचे संधीत आपले वाड्यात दाखल जाले. मदारुलमाहाम याचे वाड्यात च्यार सा घटिका प्रथम दिवस येता राजश्री लक्ष्मणराव रास्ते आले होते. दोन घटिका खिलवत जाले तो रा बहिरोपत मेहेदले तेथे आले. यावर रास्ते मजकूर माघारा निघोन आपले हवेलीस गेले. मेहेदले मजकूर दो घटिकानी तेथून पर-भाराच इंग्रेजाकडे गेले. त्रितिये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात रा सदासिव दिनकर व मुत्छदी व मामलेदार व दरकदार आले होते. त्यास दरकदार यास बोलाहून दप्तरचे कामकाज दोन घटिका जाले. तो मेहेदले मजकूर आल्यावर राजश्री नाना व मेहेदले याचे खिलवत च्यार घटिकापावेतो जाहाले फिरंगी याची दोन पलटने आंबेगावचे बारीने पुळच्याचे गणपतीवरून सावताचे वाडीपलीकडून जावयास मार्ग दिल्हा आहे. सबब तिकडूनच येतात. हे बातमीचे वर्तमान मदारुल-माहाम यासी कळल्यावर राजश्री सिद्धेश्वरराव बिनीवाले याचे कारभारियास बोलाऊन सांगितले की तुमची पागा शाहापूर बेलगावचे बारीस जाऊन तिकडौन दोन पलटने फिरंगियाची येत आहेत त्याजला घेऊन येऊन तासगावचे सुमारे आणौन राजश्री परशराम रामचंद्र याज-पासी दाखल करणे अैसे सागितले. श्रुत होये छ १० रोज मंगलवारी

तिसरे प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात राजश्री हरीपंत फडके व दाजीबा व बाबा फडके व बहिरो रघुनाथ वगैरे आले होते. त्यास राजश्री नाना व फडके व मेहेदळे असे त्रिवर्ग बसोन च्यार घटिका खिलवत जाले. नंतर मेहेदळे मजकूर रुकसत घेऊन आपले घरास गेल्यावर उभयेता दोन घटिका रात्रपावेतो बसले होते. नंतर फडके वगैरे आपलाले घरास गेले मागील साहा घटिका दिवस राहाता श्रीमंताची स्वारी घोडी फेरावयासी रमन्यात जाऊन दोन घटिका दिवस शेष राहता आपले वाड्यात आले. श्रुत होये. छ ११ रोज बुधवारी त्रितीये प्रहरी राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात रा सदासिवपंत गुणे येऊन मारनिलेची रवानगी नागपुरास होत आहे तेविसीचे बोलणे

२

च्यार घटिका जाले. मेस्तर मालिट इंग्रेज याणी पेशजी श्रीमंताची मेजमानी केली होती तेव्हा हाती वगैरे नजर केले. त्यास तो हाती नापसंद जाला, सबब माघारा दिल्हा होता म्हणौन इंग्रेज याणी कनकगिरीचे राजियाचा हाती विकाऊ आला होता तोच खरेदी करून घेतला आणि श्रीमतास द्यावयाकरिता पाठविला. रो बहिरोपंत मेहेदळे याणी येऊन मदारुलमाहाम यास वर्तमान सागितले आणि हाती आणऊन दाखविला ना पाहून नंतर श्रीमताकडे घेऊन गेले. हाती मध्येम प्रतीचा होता. पसंद करून फीलखान्यात पाठविला. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याचे गुदस्ता येथे आले होते ते वेलेस सेनाधुरधरीची वस्त्रे राजश्री मनाबापु यास द्यावयाचा निश्चये जाला होता त्यास सांप्रत राजश्री सदासिवपंत गुणे वकील येथोन नागपुरास जातात. त्याजसमागमे येक हाती व वस्त्रे वगैरे त्याजला पाठवितात म्हणोन दुसरा हाती पहावयासी आणविला होता. तोही मदारुलमाहाम याणी पाहून ठेवविला गुणे मजकूर सत्वरच जानार कासीराव रास्ते याचा काळ रोज मजकुरी जाला. त्याची स्त्री सती निघाली याकरिता राजश्री लक्ष्मणराव व गंगाधरराव रास्ते

याजला अवरोध पडला आहे. तो निवृती जालियावर टिपुकडील वकीलाचा जाबसाल शुरू होईल, तोवर मंद आहे. श्रुत होये. छ १२ रोज गुरुवासरी मागील दाहा घटिका दिवस राहता राजश्री नाना फडनवीस याचे येथे दरकदार व मुत्सदी वगैरे आले होते. राजश्री सदासिव दिनकर वकील श्रीमंताकडील निा सिंदे हे आपले गांवास दो महिन्याची आज्ञा घेऊन जाणार यास्तव मारनिले येऊन दोन घटिका खिलवत करून गेले. नंतर दरकदार दफ्तरचा हिसेब घेऊन आले व वसई संस्थान येथील राजश्री माहदाजीपंत काले कारभारी येऊन अस्तमितपावेतो कामकाज जाले. नंतर सर्वत्र आपलाले घरास गेले. राजश्री परशरामपंत मिरजकर मोरगावास छ ११ पो मुकामास गल्याचे वर्तमान आले. श्रुत होये. छ १३ रो शुक्रवारी प्रथम प्रहरात रा गमाजी पाटील वकील दिा गाइकवाड राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात येऊन दोन घटिका खिलवत जाले. नंतर मानिले आपले घरासी गेले. गाइकवाड मार याजला वकीलाणी येथील बोलण्याचा भावगर्भ येक दोण वेला लिा असता त्याचे ध्यानास येऊन तहात गोष्ट येत नाही. याकरितां मदारुलमाहाम याणी मसलत लाबनीवर ठाकिली आहे. पाहावे निश्चंये जो ठैरल्यात येईल तो सेवेसी लेखण केले जाईल. त्रितीय प्रहरी रा गणपतराव जिवाजी, सरसुभे संस्थान वसई प्रांत कोकण, याणी तेथून शाहागोशचे बचे पिंजऱ्यात घालोन श्रीमंतास नजर पाठविले ते प्रथम राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात आनिले होते. नंतर श्रीमंताकडे घेऊन गेले. ते अवलोकण करून सिकारखान्यात पाठविले. त्रितीय प्रहरी मदारुलमाहाम याचे येथे मुत्सदी वगैरे येऊन किरकोळी कामकाजे करून अस्तमिती माघारे गेले. हिंदुस्थान प्रांतीचे वर्तमान माचडीवाल्याचे मुलकात इस्माईलबेग फौजनसी आहे. त्याजवर मथुरेहून राजश्री बापूजी होलकर व बालोजी इंगले व राणेखा वगैरे पंचवीसतीस हजार फौजेनसी गेले होते. त्यास कहीवरून याचो त्याची लढाईचा प्रसंग जाला. म्हणौन तोफखान्या पौ राजश्री माहदजी सिंदे याजकडील तोफ च्यार वाटेतून जाता इस्माईलबेगाचे फौजने मदरहू तोफ च्यान्ही वलौन नेल्या व येकदोन हाती वगैरे नेले

अैसे वर्तमान अैकिन्यात आले आहे. जैपूर व उदेपूर व जोतपूर वगैरे फितुरात आहेत. इस्मांईलबेगचे मिलनीत मिलोन विरुद्ध लागले आहे. हे वर्तमान मथुरेस कलतांच आणखी फौजा वगैरे सरंजाम मन्तेस पाठविला. कुरूक्षेत्रावर रा कासीराव होलकर वगैरे सरदार फौजनसी सिकाचे पारपत्यास आहेत. जैपूरवाल्याचे वकील होलकराकडे येऊन खडणीचे बोलणे करितात ते सिंदे याचे चितास येत नाही. जैपूरकराचे मुल्काची खराबी करून अजमेरचा किला घ्यावा. नंतर खंडणीचा तह मुदेमाफिक जाल्यास करण तर करावा अैसे आहे. नवाब महाबत जंगबहादुर याजकडील खरिदीस पेशजी रोशनराये म्हणौन आले होते. त्याणी पाचसे सिपाई चाकर ठेऊन तिकडे पो हाली च्यारसे बंदुखी गारदी याच्या घेऊन पाठविल्या. श्रुत होये याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव आज्ञापत्रे पाठऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कोजे हे विज्ञापना

---

A. R. No. 201

२८ रमजान १२०४ हिजरी
११ जून १७९०

श्री

विनंती विज्ञापना अैसी जे येथील कुशल तागाईत छ २८ माहे रमजान मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २१ माहे मजकूर रोज शनवार दोन प्रहर दिवसा आखबारपत्र सरकारचे डाकवरून सेवसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान तृतीये प्रहरी राजश्री नाना फडणवीस याचे वाड्यात राजश्री हरीपंत फडके व बाहिरोपंत मेहदले व मुत्सदी व दरकदार वगैरे आले होते. त्यास

महालसमंधी कामकाज च्यार घटिका जाल्यावर, मदारुलमाहाम व फडके व मेहेदले याचे खिलवत इंग्रेजप्रकर्णी अस्तमितपावेतो जाले. याचा भाव ध्यानास आला की ममईहून फिरंगी असामी २ येथे मुबादल्यास देऊन येथील इठाव व हारण फिरंगी असे दोन आ (का. फा.) त्या पलटनात जानार. यास्तव त्याजला श्रीमंताचा रू (का. फा.) पाहिजे. याअर्थी उदईक फिरगी मजकूर आज्ञा घ्यावयासी येऊन नंतर मंगलवारी स्वार होऊन जानार येविशीचा निश्चये ठैरला. उपरांत साइंकाली फडके व मेहेदले वगैरे आपलाले घरास गेले. रा माहदजी पा वारीकर येथे आले होते. त्यास ठोके याजकडील कामाकाजाचा बदोबस्त जाला. सरंजामी माहाल प्रो डांगरी वगैरे प्रांत खांदेश येथील मामलत पाटील मजकुराकडे करार होऊन दोन गाव प्रो मजकूरपैकी मीरखा ठोके याचे स्त्रीस सरकारांतून जागीर जातीचे खर्चास देविले. साहेबखा ठोके येथेच राहिले आणि पाटील मजकूर आज्ञा घेऊन आपले गावास गेले. राजश्री सदासिव दिनकरही स्वार होऊन उभयंता बराबरच गेले. श्रुत होये छ २२ रोज रविवारी मागील सवा प्रहर दिवस राहाता राजश्री हरीपंततात्या व मेहेदले मदारुलमाहाम याचे वाड्यात आले. यावर दो घटिकानी मेस्तर मालिट इंग्रेज राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात आले. तेव्हा इग्रेज मजकूर यासी वरचेवर बोलणे होऊन मदारुलमाहाम याणी त्या फिरंगियास वस्त्रे दिल्ही. याउपर श्रीमंताची रुकसत घ्यावयाची सबब मदारुलमाहाम व फडके व मेहेदले असे सरकारवाड्यात गेले. मागाहून इंग्रेजही तेथेच गेले. गणपतीचे दिवानखान्यांत बैठक जाली होती. श्रीमंत त्या स्थली आले. दरबार जाला. रुकसतीची वस्त्रे फिरंगी इठाव मजकूरास दिल्ही व सिरपेच १ व साडेतीन वस्त्रे असी दिल्ह्यांवर पानदान विडे रुकसतचे घेऊन मागील च्यार घटिका दिवस राहाता इंग्रेज मजकूर आपले स्थलास गेले. नंतर श्रीमंत उठोन आर्शेमाहालात गेले. आणि मदारुलमाहाम व फडके व मेहेदले त्याच दिवाणखान्यात बसोन अस्तमितपावेतो खिलवत इंग्रेजप्रकर्णीच जाले. रो

खंडेराव बलाल आंबडापूरकर पेशजी येथे आले होते. कारण की मारनिलेस सरकारातून पालखी वगैरेचा सरंजाम दिल्हा आहे. यैसियासी मारनिलेचा विृधापकाल जाला. यापुढे येथे यावयाचा भरवसा नाही. यास्तव चिरंजीव समागमे आणिला आहे. त्याचे नावे सरंजाम करून सनदपत्र करावे म्हणोन मदारुलमाहाम यास विनती केली च्यार सा महिणे आर्जव करून राहिले होते, त्यास श्रीमंत कृ(का. फा.) केलो ते जात-जाबता तूर्त त्याचे पुत्राचे नावे जाला. पुढे वादबरसात त्याणी येऊन कागदपत्राचा गुंता उरकावा असे ठरून मारनिले व त्याचे पुत्र या उभयेतास वस्त्रे जाली. गावास जाण्याकरिता श्रीमताणी आज्ञा जाली याप्रो जाल्यावर मदारुलमाहाम आदिकरून तेथोन निघाले ते आपलाले घरास गेले. राजश्री नाना बेलबागात जाऊन साइंकाली आपले वाड्यात आले. श्रुत होये. छ २३ रोज सोमवारी राजश्री नाना फडनवीस याचे तीर्थरूपाचे श्राध जाले म्हणौन त्रितीय प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात मुत्सदी वगैरे मंडळी कोण्ही बहुतसे आले नाहीत. मागील दोन घटिका दिवस शेष राहाता राजश्री बाबा फडके व मेहेदले मजकूर या दोघांस बोला-ऊन दोन घटिका बोलणे जाले. नतर ते आपलाले घरास गेले. मागील साहा घटिका दिवस राहाता श्रीमंताची स्वारी रमन्यात गेली होती. च्यार घटिका तेथे घोडी फिरऊन माघारा निघाले ते आस्तमिती आपले वाड्यात यऊन दाखल जाले. रोज मजकुरी राजश्री लक्ष्मणराव रास्ते त्रितोये प्रहरी राजश्री हरीपंत फडके याचे येथे येऊन आस्तमीतपर्यंत उभयेताचे बोलणे जाले. टिपूकडील वकील येथे आले आहेत, त्याची भेटी जाहाली पाहिजे येविशीचे बोलणे होऊन

२

उदईक मुलाजमत व्हावी असा निश्चगे ठरल्यात आला. श्रुत होये. छ २४ रोज मंगलवारी येकादसीस प्राथःकालीच श्रीमंत पर्बतीस गेले होते. देवदर्शण पूज्या इत्यादिक सहा घटिकापर्यंत

जाल्यावर फराल तेथेच करून प्रहरा दिवसा माघारा निघाले, येताना बेलबागात येऊन श्रीविष्णुंमूर्तीचे दर्शण घेतले आणि तैसेच निघोन सवा प्रहरा दिवसा आपले वाड्यात आले. राजश्री नाना फडनवीसही प्रति येकादशी प्रो बेलबागात जाऊन ११ घटिका दिवस येता आपले घरास आले. टिपूकडील गुलामहूसेन व अबदुलनबी वकील रोजमारी श्रीमंताचे भेटीस येण्हार म्हणौन मदारुलमाहाम याणी राजश्री नारोपंत चेक्रदेव बक्षी याजला बोलाऊन तमाम सरदार मानकरी व सरंजामी व पागे वगैरें यांस सागून, सरकारवाड्यात अड्चा प्रहरा दिवसा यावयाविशी सागितले व सरकारवाड्यात हाजारा कारंज्याकडील दिवाणखान्यात बैठक करावी व गारदी व स्वार वगैरे बदोबस्त करण्याविसीं रा राघोपंत गोडबोले व दिनकरपंत भडभडे यास ताकीद (का. फा.) दीड प्रहर दिवस राहाता राजश्री हरिपंत फडके मदारुलमाहाम याचे वाड्यात आले. रास्ते याजकडील रा बालाजीपंत व नरसिंगराव वकील पुढे येऊन राजश्री नाना फडनवीस यांस विनंती केली. त्याजवरून मागील दाहा घटिका दिवस राहता मदारुलमाहाम व फडके श्रीमंताचे वाड्यात आले, ते आर्शेमाहालात बसोन दोन घटिका माली मुलकी कामकाजे जाली. वकील मार रास्ते याचे पेठेतून निघोन इकडे यावयाचे बातमीचे समजलियावरी मदारुलमाहाम व फडके याणी दरबार बरखास्त करून तेथोन उठौन हाजाऱ्याचे हौजाकडे गेले. पेशजी ताकीद केल्या प्रौ तमाम सरदार व पागे व मानकरी से दोनसे येऊन हाजर जालेच होते. तेथे राजश्री नाना व हरीपंततात्या गेले. यावरी श्रीमंत त्या स्थली आले. राजश्री लक्ष्मणराव व गगाधरराव रास्ते टिपूचे वकीलास घेऊन मागील साहा घटिका दिवस राहाता सरकारवाड्यात दिली दरवाज्याने येऊन दिवानखान्यात आले. वकील मार याणी हातीचे छघावे नग २ दोन आणिले होते ते श्रीमंतास नजर केले. कारचोबी बादली पोशाक येणे प्रो तौ चीरा १ जामेवार थान २ पटका १ किनखाब थान १ येकूण पाच सनगें होती, ते खोनात घालोन नजर

केली. पानदान विडे व खुशबोई सरंजाम वकील मजकुरास दिल्ह्यावर मारनिले रुकसत घेऊन माघारा आपले स्थलास गेले. राजश्री विठलराव परशराम पटवर्धन, राजश्री परसरामपंत मिरजकर याचे मधील पुत्र, येथे राहिले होते ते सांप्रत मिरजेस जातात याकरिता श्रीमंताचे निरोपास आले होते. त्याजला पैठणी लाल रंगाचे सेला व पागोटे व पानदान विडे देऊन मार्गस्त केले. याउपरांत श्रीमंत तेथोन उठौन आर्शेमाहालात आले. मदारुलमाहाम व फडके याणी इमारतीचे कारखाण्याचे काम पाहून तैसेच तेही आर्षेमाहलात आले. मुत्सदी वगैरे सर्वत्रास बरखास्त करून श्रीमंत व राजश्री नाना व हरीपंत फडके असे त्रिवर्ग बसोन खिलवत च्यार घटिका जाले. नंतर मागील दोन घटिका दिवस शेष राहाता मदारुल-महाम तेथोन निघोन आपले वाड्यात येऊन नित्य कृत्याचे औषध घेऊन तैसेच निघाले, ते बंगल्याचे बागात गेले. साइंकालचे संध्यावंदन तथेच करून दोन घटिका रात्र होता माघारा आपले घरास आले रोज मारी मागील च्यार घटिका रात्र राहाता इठाव फिरंगी स्वार होऊन गेला. समागमे गार ( का. फा. ) येत पाचपणास गेले. मारनिले दोही पल्टणात जावयाकरिता येथून गेला. राजश्री आपा बळवंत शिंद्याचे बागाजवल राहिले होते. त्यास त्याणी रोज मारी तेथून तळ काढून दो बानाचे आतरे करून गारपीराजवल किराड नवे तळे बाधीत आहे तेथे येऊन उतरले श्रुत होये. छ २५ रोज बुधवारी मागील सात घटिका दिवस राहाता श्रीमंत आपले वाड्यातून निघोन रा बालाजी नाईक भिडे याचे बागात राजश्री आमरसिंग जाधव येऊन राहिले आहेत त्याचे भेटीस गेले. कारण कीं जाधव मजकूर श्रीकासीप्रांतेस गेले होते तें यात्रा करून आले आणि मानकरी सरकारचे, सातारियाचे राज्याचे आप्तवर्गांत निकट, त्याचे येथे जावयाचा साप्रदाये या-करिता स्वारी तेथे गेली. समागमे राजश्री नाना फडनवीस व हरीपंत फडके आदिकरून सरदार व पागे वगैरे गेले होते. तेथे गेल्यावर जाधवराव मार याणी आपले डेन्याबाहेर इस्तकबाल

पुढे येऊन श्रीमंतास भेटले अणि डेऱ्यात घेऊन गेले. नंतर मदारुलमाहाम व फडके व पागे सरदार मानकरी याच्या भेटी जाल्या. दोन घटिका बैठक होऊन यात्रेचे वगैरे वर्तमान भापनात आले. या उपरांत माारनिले

३

याणी वस्त्रे द्यावयासी आणिली. पोशाक व सेले पागोटी बितौ.

१ श्रीमंतास पोशाक बऱ्हानपुरी उंतम प्रतीचा.

१ मदारुलमाहाम यास कंदीपो शाक.

१ हरीपंत फडके यासही कंदी पोशाक

२ मऱ्हाटे सरदार आा २.

१ दारकोजी निंबालकर सेला पागोटे.

१ सटवाजी गावडे सेला व पागोटे.

२

१ बालाजीपंत ढोसर सेला पागोटे

१ राघोपंत गोडबोले सेला पागोटे.

१ दिनकरपंत भडभडे यासी सेला व पागोटे.

१ बालाजीपंत केलकर सेला पागोटे.

४

५ ९

सदरहू येणे प्रौ नव पोशाक व सेले पागोटी दिल्ही. आतर पानदान जाल्यावर श्रीमंताची स्वारी तेथोन माघारा निघाली ते मागील दोन घटिका दिवस राहाता आपले वाड्यात आले. मदारुल-माहाम येताना बेलबागात येऊन देवदर्शण घेऊन नंतर आपले घरास आले. श्रुत होये. छ २६ रोज गुरुवारी त्रितीये प्रहरी मदारुल-माहाम याचे वाड्यात मत्सदी व दरकदार व मामलेदार आले होते. राजश्री दाजीबा फडके व लक्ष्मणराव फडके व सकारामपंत पानगे आले होते. ज्येष्ट वा। ७ रोज शुावारी छ २७ माहे मजकूर आरंबी सन तिसैनचं आखर साल होऊन छ २१ रोज शनवारीपासून मृगनक्षत्रापासून पुढे नवे साल, सन इहिदे तिसैनचे अवल साल शुरू जाले. यैसियासी आरब वगैरे गारदी सरकारात चाकर आहेत त्याची हाजरी आखर साली मदारुलमाहाम आपण आपले समक्ष घेत असतात. सबब रोज मारी हाजरी घ्यावयाची शुरुवात केली. रौ राघोपंत

गोडबोले यासी बोलाऊन सैद अहमद जादार अर्बाचा याचे बिरादरी पैा थोडीबहुत हाजरी आस्तमितपर्यंत घेतली. नंतर बेलबागात जाऊन आले. श्रीमंत मागील साहा घटिका दिवस राहता रमन्यात गेले होते. तेथून माघारा आस्तमिती येऊन आपले वाड्यात दाखल जाले पाच घटिका रात्रीस मदारुलमाहाम याणी राजश्री सदासिवपंत गुणे वकील यास जैनाबादी सेला पागोटे देऊन नागपुरास जावयासी निरोप दिल्हा. मारनिल्हे आमावाश्या जालियावर सत्वरच स्वार होऊन जाणार. श्रुत होये. छ २७ रोज शुक्रवारी त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याणी सैद आहामद आरबाचे जादार याचे बिरादरीची हाजरी घेतली. नंतर मागील तीन घटिका दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस आपले वाड्यातून निघोन मोरोपंत दमडेरे दरकदार दफ्तरचे याचा मृत्य जाला म्हणौन मारनिल्हेचे घरी जाऊन त्याचे बंधूस सेला पाघरविला आणि तेथून निघाले ते बेलबागात गेले. देवदर्श करून तैमेच परभारा बंगल्याचे बागात जाऊन सध्यावंदन तेथेच केले. आणि दोन घटिका रात्र होता माघारा येऊन आपले वाड्यात आले. टिपूकडील वकील यास पाचाश्या मानसाचे बेगमीचा सिदा श्रीमंताचे सरकारचा मदारुलमाहाम याणी यादी ठैराऊन दिल्ही, त्या प्रो पाटविला. राजश्री परशराम रघुनाथ तासगावीहून पुढे मिरजेचे नजीक कृष्णांतीरास जाऊन मुकाम केला आहे. येथून तोफखाना व फौजा वगैरे सरजाम त्याजकडे जावयाचा, त्याची मार्गप्रतीक्ष्या करितात. साहा तोफा येथून गेल्या च्यार आणिक जाणार आहेत पागे व सरदार व गारद वगैरे नेमणुकी प्रो रवाना होत आहे इंग्रेज याजकडील पलटने २ दोन ममईहून आवेरांधचे बारीने येऊन मिरजकराचे फौजेत मिळनार. पलटणे घाटाजवळ आली आहेत. श्रुत होये. याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा साभाल करनार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञापना.

---

A. R. No. 202

१२ शवाल १२०४ हिजरी

२५ जून १७९०

विनंती विज्ञापना ऐसी ज येथील कुशल तागाइत छ १२ माहे शवाल मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखण आज्ञा करीत असले पाहिजे विशेष येथील वर्तमान छ ५ माहे मजकूर रोज शनवारी त्रितीये प्रहर दिवसा अखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान राजश्री नाना फडणवीस याचे वाड्यात मागील प्रहर दिवस राहाता मुत्सदी व दरकदार आदि-करून सर्वत्र आले होते. त्यास काही जरूरियात कामकाजे दोन घटिका जाहाली. यानंतर दिल्ली शहर येथील आखबार आली होती. ते पत्रे व आणखी संस्थान वगैरे जागाची पत्रे आली ते मदारुलमाहाम याणी येकीकडे बसोन अस्तमीतपर्यंत वाचून पाहिली. उपरांत सर्वत्र आपलाले घरास गेले रोज मजकूर

(ओळ फाटली)

डी फेरावयासी गेले होते. ते (का. फा.) स्वारी माघारा येऊन आपले वाड्यात दाखल जाले. श्रुत होये. छ ६ रोज रविवारी मदारुलमाहाम मागील सवा प्रहर दिवस राहाता निद्रा करून उठिल्यावर आलीमर्दाखा जमादार याचे बिरादरीची हाजरी पाच घटिकापर्यंत बसोन घेतली. नंतर राजश्री त्रिंबकराव सबनीस याणी आपले राहावयाची हावेली नवी बांधिली आहे. माडी वगैरे जागा तरतूदीची केली म्हणौन मारनि-लेनी राजश्री नाना फडनवीस यासी विनंती करून जागा पाहावयासी मेजमानीचे निमित्य न्यावे ऐसा संकेत जाहाला होता. त्याजवरून मागील च्यार घटिका दिवस रहता मदारुलमाहाम सबनीस मजकूर याचे घरास गेले. तो तिकडून परभारा राजश्री हरिपंत फडकेही तेथेच आले. यावर दोन घटिका नाच जाला. आतर पानदान होऊन नंतर मारनिले याणी वस्त्रे येणे प्रो

१ मदारुलमाहाम यासी केशरी पागोटे व दुपठा.

१ बाबूराव केशव सेला व पागोटे चदेरीचे सुफेद.

१ हरिपंत फडके यासी (सेला) व पागोटे चदेरीचे सफेद.

१ राघोपंत गोडबोले सेला व पागोटे पैठणी कुसंबी.

सदरहू दिल्हयावर मदारुलमाहाम मागील दोन घटिका दिवस राहाता आपले घरास आले व फडके वगैरे आपलाले घरास गेले. यावर रो गोपाळजी गंड मदारुलमाहाम याजकडील यास सबनीस याणी बोलाऊन सेला पागोटे दिल्हे. वसई किला प्रांत कोकण येथील (का. फा.) साळवे हावलदार सस्थान मजकूरचे येथे आले आहेत. सबब मारनिलेस राजश्री माहादाजीपंत काले कारभारी दिा सरसुभा याणी मदारुल्माहाम यास भेटविले. त्याणी सेला व पागोटे देऊन भेट घेतली. राजश्री बलवतराव कासी पेशजी भिलाचे पारपत्याकरिता खांदेश प्रांती पाठविले होते. त्यास भिलाचा बदोबस्त येथे समक्ष होऊन कन्हेरगड किला राजश्री मालोजी जाधवराव वाघोलीकर याजकडेस सागितला आणि मारनिलेस बोलाविले होते. त्याजवरून त्याणी सरकार आज्ञे प्रो किला जाधवराव मजकूर याचे जिमेस करून आपण गारद वगैरे सरंजामसुधा माघारा येथ आले. सबब मारनिले याणी श्रीमंताचे दर्शण घेऊन नंतर मदारुल्माहाम याची भेटी घेऊन आपले घरास गेले. श्रुत होये छ ७ रोज सोमवारी पहिले दीढा प्रहरा दिवसा राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात रा

(ओळ फाटली)

यासी दोन घटिका खिलवत आपले येथे घरकृत्य कल्हे लागला आहे ते (का. फा.) चे करून माघारा गेले. नंतर त्रितीये प्रहरी मदारुल-माहाम (का. फा.) माहा घटिकापावेतो शामीरखा जादार याचे बिराधरीचे आरब व गारद आहेत त्याची हाजरी घेतली नंतर राजश्री हरिपंत फडके व रामजी पाटील वकील निा सिंदे असे आले. यैसियासी सुरत शहर, प्रांत गुजराथ, येथे कोण्ही गुजराथी वगैरे याचे गुरु राहातात

ते प्रतिवर्षी श्रीमंत व रौ नाना फडनवीस व हरिपंत फडके याजला वस्त्रे पाठवीत असतात. त्या प्रौ सांप्रत्यही त्रिवर्गास वस्त्रे आली आहेत. ते रामजी पाा घेऊन आले होते. त्यास मदारुलमाहम याची वस्त्रे देऊन श्रीमंताची वस्त्रे राजश्री नानास दाखविली. याउपरी श्रीमंताचे सेवेसी प्रविष्ट करतील. फडके याची वस्त्रे होती ते त्यास दिल्ही. राजे बहादर राजश्री रघुपतराव नारायेण व रगराव त्रिबक या उभयेतामधे कटाक्ष आज सात वर्षे लागला आहे. यैसियासी त्याचा कजिया विल्हे लाऊन बदोबस्त करून घ्यावा म्हणोन (का. फा.) माहादजी सिदे याची पत्रे मदारुलमाहाम व फडके यास येतात. हाली दोघाची वाटणी व्हावीसे ठैरले आहे. दोन हिसे रंगराव त्रिबक

२

याचे आणि रघुपतराव दतपुत्र म्हणौन त्याचा येक हिसा या प्रो बोलण्यात येऊन यादी जाहल्या आहेत. मालेगाव प्रो निबाईत प्रांत खादेश येथे कैलासवासी नारो शकर याणी किला मानबर बाधिला आहे. त्यास तेविसी उभयेताचा लढा पडला आहे म्हणौन फडके मजकूर व रामजी पाटील मदारुलमाहम यासी बोलावयासी आले होते. आद्यापि निश्चंये ठैरला नाही, पाहावे. दोन घटिका बलोण फडके व वकील माार माघारा आपलाले घरारा गेले आणि आस्तमिती राजश्री नाना बेलबागात जाऊन आले. श्रुत होये. छ ८ रोज मंगळवारी येकादसी म्हणौन प्राथःकालीच श्रीमंताची स्वारी पर्वतीस गेली होती. त्यास प्रहरा दिवसा तेथोन माघारा निघोन येताना बेलबागात आले. तेथे श्री विष्णुमूर्तीचे दर्शण घेतले आणि दाहा घटिका दिवस येता आपले वाड्यात आले. त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याणी च्यार घटिका गारद्याची हाजरी घेऊन नंतर दप्तरचे कारकून बोलाऊन दोन घटिका हिसेबाचे कामकाज जाहले. यावर राजश्री नाना मागील दोन घटिका शेष दिवस राहाता आपले वाड्यातून निघाले ते वो राजश्री गोविद-भट निरचेऊर याचे जेष्ट बंधु मृत्य पावले निमित्य त्याचे घरास सेला पाघरवावयाकरिता जाऊन तेथोन बेलबागात गेले. देवदर्शण करून सांइकाली मागती आपले वाड्यात आले. हिदुस्थान प्रांतीचे वर्तमान जैपूर व जोतपूर वगैरे येथील राजेरजवाडे यासी व इस्माईल-

बेग यासी अैक्येता होऊन आलीबाहादर व सिंदे व होळकर या त्रिव-
र्गासी व त्यासी वैमनस्व लागले आहे म्हणौन मथरेहून राजश्री बापूजी
होळकर व आंबोजी इंगळे व आबा चिटणीस वगैरे फौजा त्याचे
पारपत्यास गेल्या असता सांप्रत त्याची व याची लढाई जाली इस्मा-
ईलबेग याजपासी दोनच्यार हाजार गारद वगैरे होती त्यात होळकर
व इंगळे याणी फितूर करून त्याजला दोन लक्ष रुपये देऊ केले आणि
करार ठैराविला की समयास तुम्ही कामकाज करू नये. अैसे जाले
होते. तेव्हा लढाईचा प्रसंग छ ८ रमजानीस येऊन प्राप्त जाला
ते समई त्याणी संकेता प्रो। कमती केली तेणेकरून इस्माईलबेग
याचे फौजेची सिकास्त जाली पाचच्यार कोस हाटून मागे पळाले
तेव्हा त्याचे तळावर होळकर व इंगळे याणी जाऊन मकाम केला.
च्यारपाचसे माणूस लढाईत कामास आले या प्रो। जाल्यामळे नूर्त
त्याचा मोड होऊन कमजोर जाले गारद वगैरे याणी फितूर करून
फोडली होती ते याजपासी (का फा ) मिळाले पेसजी करार
त्यासी केला होता. त्यास येक लक्ष रुपये त्याजला दिल्हे आणि आपल्या-
जवळच ठेऊन घेतले आहे राजश्री कासीराव होळकर वगैरे फौज
गुलाम कादर याचे भावावर वनिकावर गेले होते त्यास त्याचीही
लढाई पूर्वी येकदोन जाली. तेणेकरून सिक भागीर्थीपार माघारा
टळून गेले. इकडे लढाईचा प्रसंग पडल्यामुळे रा। बापूजी होळकर
याणी रा। कासीराव होळकर याजला फौजेसुधा आपले मदतेस बोलाऊन
घेतले व मथरेहूनही पत्रे त्यास या प्रो।च गेली त्याजवरून कासीराव
होळकर ते संधान सोडून याजकडे यावयास माघारा निघाले येक
कंपू फिरंगी बापू होळकर वगैरे याजपासी मथुरेहून मदत गेले असोयेत
दोस्त जाली हे इस्माईलबेग व जैपूरवाले यासी समजले त्याजवरून
सख्यत्वाचा पैगाम वकील मथुरेस आहेत ते आलीबहादर याचे विद्य-
माने बोलणार. आजमेरचा किला माघारा द्यावा हे सिंदे याचे
बोलणे. त्यास बहुतेक किलाही माघारा देऊन सलुखोना तह करतील
येसे वर्तमान डाकेवरून आले आहे. पाहावे काये ठरते ते न कळे श्रुत
होये. छ ९ रोज बुधवारी दुसरी येकादसी राजश्री नाना फडनवीस याची

याआर्थी प्राथःकालीच बेलबागात जाऊन स्नानसंध्या व देवाचे पूजन येका प्रहरात करून नंतर माघारा आपले घरास आले. त्रितीये प्रहरी च्यार घटिका गारद्याची हाजरी जाली. या उपरी रास्ते याजकडील वकील टिपूकडील जाबमाल बोलावयासी आले होते. राजश्री तात्या जोसी या बोलण्यात आहेत. तेही आले होते. दोन घटिका खिलवत करून गेले नंतर वो राजश्री गोविदभट निरचेऊर येंऊन राजे बाहादर याजकडील बोलणे अस्तमीतपावेतो बोलोन गेले (का. फा.) दाजीबा फडके व सखारामपंत पानसे व बाबुरात्र केशव वगैरे आले होते. काही कामकाजही जाले. श्रीमंताची स्वारी रमन्यात गेली होती तेव्हा पाच घटिका दिवस होता. त्यास च्यार घटिका तेथे घोडी फिरवून साइंकाली माघारा आले. स्वारीसमागमे राजश्री माधवराव रामचंद्र व लक्ष्मणराव व माधोराव फडके व माहादाजी-पंत बेहरे व बिनीवाले व पेटे व पागे व सरदार या प्रो गेले होते दाहा तोफा पौ च्यार तोफा जाणे राहिल्या होत्या. त्याही येथून रवाना होऊन राजश्री परसराम रामचद्र मिरजकर याचे लस्करात गेल्या श्रुत होये.

---

**A. R. No. 203** १९ शव्वाल १२०४ हिजरी

२ जुलै १७९०

श्री

विनंती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल तागाईत छ १९ माहे शवाल मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ १२ माहे मजकूर रोज शनवारीं मागील प्रहर दिवस राहाता आखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले, ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान मागील सवा प्रहर दिवसा मदारुल-माहाम याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार व मामलेदार वगैरे सर्वत्र आले होते. राजश्री बहिरो रघुनाथ मेहेंदळे आपले कुलदेवीचे दर्शणास गेले होते. ते काल माघारे आले. सबब मारनिले राजश्री

नाना फडनवीस याचे भेटीस येऊन वरचेवर तैसेच आपले घरास गेले. यावर राजश्री हरीपंत फडके तेथे आले. तेव्हां काहीयेक कामाकाजा (का. फा.) मामलेदार याचे दोन घटिका जाले. नंतर मदारुलमाहाम (का. फा.) खिलवत सहा घटिकापावेतो जाले. त्याचा भावगर्भ ध्यानास आला की टिपू याणी वकीलाबराबर येक साला अैवज पाठविला आहे. रास्ते मध्यस्ततेविसी बोलणे करितात की त्याणी जो अैवज पाठविला आहे तो घ्यावा माघारा फिरऊ नये. यैसियांस राजश्री परशराम रामचंद्र याचीही पत्र आली की च्यार साला खंडणीचे करारा प्रो पैका यावयाचा. त्यात येक साला बारा लक्ष रुपये आले आहेत ते तुर्त घ्यावे. त्याजवरून उभयेताचा विच्यार होऊन अैवज दाखल करावयाविसी रास्ते यास सांगितले. मोहोरा व पुतळचा व होण या प्रो भरती आहे. त्यास रोज मारी पाचा लक्षा रुप्याचा भरणा सरकारचे जामदारखान्यात केला. आस्तमीतपर्येत ममलतप्रकरणी उभयेताचे बोलणे होऊन फडके आदिकरून आपलाले घरास गेले आणि राजश्री नाना [illegible] जाऊन आले. मागील साहा घटिका दिवस शेष राहता श्रीमंत रमन्यात गेले होते. तेथे गेल्यावर च्यार घटिका घोडी फिरविली. या उपरांत श्रीमंत तळयावर जाऊन रमन्यातील हारणे कालवीट वगैरे आणविली. त्याची परस्परे लढाई लावविली होती. ते आवलोकण करून त्यास दाणा भक्षावयासी देवविला आणि आस्तमितीं स्वारी तेथोन माघारा निघोन दो घटिका रात्रीस आपले वाडयात दाखल जाले. श्रुत होये. क १३ रोज रविवारी मागील दीड प्रहर दिवस राहता राजश्री नाना फडनवीस निद्रा करून उठिल्यावर राजश्री हरिपंततात्या याजला बोलाऊ पाठविले. दरकदार दफतरचे व मामलेदार वगैरे हाजर जाले होते. त्यासी मामलतीचे बोलणे दोन घटिका जाले. तो फडके मजकूर तेथे आले. रास्ते याचे यावयाचा संकेत जाला होता यास्तव याजकडील रा। बाळाजीपंत ढेकने वगैरे पुढे येऊन मदारुलमाहाम व फडके यासी विचारिले. त्याजवरून मागील साहा घटिका दिवस राहाता राजश्री लक्षमणराव व गंगाधरराव रास्ते राजश्री नानाचे वाडयात आले. तेव्हां मदारुलमाहाम व फडकेव रास्ते याचे

खिलवत च्यार घटिकापर्येत जाले. यावर मागील दोन घटिका दिवस राहता रास्ते मो माघारा निघोन परभारा राजश्री हरिपंततात्याचे वाड्यात गेले. आस्तमिती फडके मजकूरही आपले घरास आल्यावर दाहा घटिका रात्रपावेतो रास्ते तेथे राहून बोलणे बहुतच जाले. नंतर रास्ते मजकूर (का. फा.) गेले. खिलवताचा भाव ध्यानास आला की (का. फा.) परशराम रामचंद्र तासगावा (का. फा.) दो को-(सावर) कोठे म्हणोन गाव कृष्णेच्या उतर तीरास आहे तेथे उतरले आहेत. परंतु तेथून टिपूचे सरहादेचे गाव आहेत. त्यास उपद्रव करावा या उद्योगात आहेत विरुध्याचा प्रकार जाणौन कलहे निर्मान करावा या आर्थी हा विच्यार योजून उपद्रवास कारण करनार. इंग्रेज याज-कडील दोन पल्टने व तोफा व चालीस गा (?) पंनास गोरा मिरजकरा-जवल येऊन मुकाम केला. येथून नेमनुकी प्रो सरदार फौजासुधा तेथे जाऊन पोहोचावे हे मार्गप्रतीक्ष्या करितात आणि येविसी त्याची पत्रे दर-रोज येत आहेत. येमियासी हे सविस्तर वर्तमान टिपूस कळल्यावरून त्याणे रास्ते यास व आपले वकीलास पत्रे पाठविली ते काल दीढा प्रहरा रात्रीस येथे पावली तेविसीचे बोलणे रास्ते बोलावयासी आले होते की वकील मा॥र बारा लक्ष रुप्यांचा भरणा करून देतात. पुढे जाबसाल लागलाच आहे, या आर्थी तूर्त उतावली मिरजकर याणी करू नये, यैसी रदबदलीचा जाबसाल लागला आहे. पाहावे काये निश्चये होतो. रा परशरामपंत याचे पुत्र रा हरराव याजला बहुत समाधान न होते सांप्रत काहीयेक

२

आराम आहे श्रुत होये. छ १४ रोज सोमवारी राजश्री नाना फडनवीस याणी घोडदान केले शंभरदीडशे ब्रांम्हण दीढा प्रहरा दिवसा भोजनास आपले वाड्यात घेउन आधेली दक्षणा या प्रो सर्वास दिल्हे त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात राजश्री हरिपंत फडके आले राजश्री लक्ष्मणपंत कोपरकर याजकडे हुजरात पागेचे हिसेबाचे दफतरे आहेत, यास्तव कोपरकर मजकूर यास बोलाऊन च्यार घटिकापावेतो पागा याचे हिसेब ध्यानास आणिले. नंतर मदारुलमा-

हाम व फडके याचे भाषण दोन घटिका जाले. रो गणपतराव जिवाजी सरसुभे प्रांत कोकण यासी बोलाऊन आस्तमितपर्यंत त्याजकडील बोलणे प्रांत मजकूर वसई किला येथील संस्थानचे जाले. या उपरांत फडके वगैरे सांझकाली आपलाले घरास गेले आणि राजश्री नाना फडनवीस बेलबागात जाऊन घटिका रात्रीस आपले घरास आले. रा गणपत आनंदराव मेहेंदले घासीराम कोतवाल याचे तल्यावरून कूच करून गेले. ते हाडपसर व वानोडी दोहीचे दरमियान जाऊन मकाम केला. टिपूकडील येक साला खंडणीचा अैवज बारा लक्ष रुपये याचा भरणा होण व पुनव्या व मोहोरा या प्रो सरकारात दाखल जाले. श्रुत होये. छ १५ रोज मंगळवारी राजश्री नाना फडनवीस याचे येथे त्रितीये प्रहरी राजश्री रगराव त्रिबक राजे बहादर येऊन दोन घटिका खिलवत करून गेले. नतर मत्छदी व दफतरचे कारकून वगैरे याच्या कामाकाजाची बोलणी जाली. तो राजश्री हरिपंत फडके तेथे आले. यावर कोकणप्रकर्णं वसईकर सरसुभे याणी दोन घटिका बोलणे केले. या उपरांत मदारुल-माहाम व फडके याचे खिलवत होऊन मागील दोन घटिका दिवस शेष राहाता फडके आदिकरून आपलाले घरास गेले आणि राजश्री नाना फडनवीस बंगल्याचे बागात जाऊन आस्तमिति बेलबागात आले. तेथेच संध्यावंदन करून देवदर्शण घेतले. यावर माघारा निघोन दो घटिका रात्री आपले घरास आले श्रीमंताची स्वारी मागील साहा घटिका दिवस राहाता निघाली ते रोज मजकुरी आंगारिका चेतोर्थी म्हणोन श्रीगणपतीचे दर्शणास कसब्यात गेले होते. नंतर तेथोन माघारा निघोन तैसेच परभारा स्वारी रमन्यात गेली. ते घटिका रात्र होता माघारा येऊन आपले वाड्यात दाखल, जाले. रो दादा गजरे, किल्ले रायेगड येथील सरसुभे, याणी मदारुलमाहाम याची मेजमानी केली. सबब पाचा घटिका रात्रीस राजश्री नाना फडनवीस गजरे मजकूर याचे घरास गले. रात्रीचे भोजन तेथेच केले. नंतर आतर पानदान जाल्यावर च्यार घटिका नाच जाला गजरे मजकूर याणी मदारुलमाहाम यास केशरी आगोठे व दुपटा दिल्हा. या उपरांत आकरा घटिका रात्रीस तेथोन माघारा निघाले ते आपले हावेलीस आले. श्रुत होये छ १६ रोज बुधवारी

श्रीमंत सौवती मानुश्री रमाबाईसाहेब आपले माहेरास बुधवार पेठेत राजश्री बालाजी केशव थते याचे येथे गेली होतीत. त्यास तेथोन आडचा प्रहरा दिवसा माघारा निघोन स्वारी आपले वाड्यात येत आसता राजश्री माहालिंगराव घोरपडे त्याच रस्त्या जात होते. तो बाजारचा रस्ता स्वारीचे जिलेबीचे लोक खासबरदार व खिजमतगार वगैरे यासी व घोरपडे याचे लोकामी परस्परे दाटी जाल्यामुळे उपाध जाली. श्रीमंत बाईसाहेब याची स्वारी पालखीत होती. त्यास पालखी तो वाड्यात दाखल जाली. मागे लोकासी कटकट वाहडली. हे घोरपडे मजकूर याणी पाहून समजूत करावी आणि कटकटीचे निवारण करावे असे आसता सरकारवाड्यातून व मदारुलमाहाम याचे वाड्यातून लोक तेथे आले. त्याणी बेकैदीचा प्रकार पाहिल्यावरून घोरपडे मार यासी बोलिले आणि मारनिलेस घोड्याखाले उतरऊन त्याजला राजश्री नानाच्या वाड्यात घेऊन गेले. घोरपडे मजकूर तेथे आल्यावर सदर बारगीर व सिलेदार लोक चौकीस आसतात तेथे बसोन भाषण केले की आमचा आपराध काये जाला की सरकारचे लोकाणी गैर-आबरू करून येथे घेऊन आले याची चौकसी करावी. तेव्हा मदारुल-माहाम याणी निद्रा करून उठिल्यावर राजश्री हरिपंत फडके यासी बोलाऊन आणविले आणखीही मुत्सदी वगैरे दरोबस्त आले होते. तो फडके मजकूर येऊन आधी मदारुलमाहाम यासी बोलोन नंतर घोर-पडे बसले होते त्याजपासी आले समाधानाच्या च्यार गोष्टी सांगि-तल्या त्या प्रथम त्याच्या ध्यानास न आल्या म्हणौन काही दाब व काही समजूत या प्रो बोलोन घोरपडे यांसी फडके मार याणी आपले वाड्यात वाटे लाविले. राजश्री नारोपंत चक्रदेव बक्षी त्याचे समागमे दिल्हे की याजला समजाऊन वाटे लावावे. या प्रो करून घोरपडे यांसी फडके मार याणी तूर्त आपले हावेलीस पाठऊन आपण मागती राजश्री नानाजवल गेले. यावर मदारुलमाहाम व फडके व बहिरोपंत मेहेंदले याचे खिलवत इंग्रेजप्रकर्णी च्यार घटिका जाले व काही कामकाजे यादी वगैरे कागदपत्र असे दोन घटिका रात्र पो जाल्यावर सर्वत्र आप-लाले घरास गेले. फडके मजकूरही आपले वाड्यात गेले. तो तोपर्येत

राजश्री माहालिंगराव घोरपडे तेथेच बसले होते. तेव्हा फडके मजकूर याणी त्याचा समजाविश करून च्यार

३

घटिका रात्रीस घरास वाटे लाविले सारांश घोरपडे मजकूर मातबर सरदार, मानकरी सरकारचे पदरचे, त्याची भीड विशेष जाणौन महत्व ठेवितात. श्रुत होये. छ १७ रोज गुरुवारी मागील दाहा घटिका दिवस राहता राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात मुत्सदी व दरकदार आदिकरून सर्वत्र आले होते. राजश्री हरिपंत फडके आल्यावर रा। रामजी पाटील वकील नि॥ सिंदे मदारुल-माहाम याचे भेटीस आले होते. उतर प्रांतीची पत्रे आली होती ते त्याणी वाचून दाखविली. राजश्री सिवाजी विटल विंचुरकर सरदार पाचा हाजारा फौजेनसी राजश्री माहदजी सिंदे याजबराबर आहेत. त्यास त्याचे पुत्र आमृतराव होते त्याचा काल जेष्ट वद्य ३० आमावा-स्येस जाला. तेही त्याच प्रांती लस्करात होते. हे वर्तमान लि॥ होते ते मदारुलमाहाम व फडके याणी श्रवण करून बहुतच असंतोष मा-निला. पाटील मा॥र यासी दोन घटिका बोलणे जाल्यावर मा॥रनिले आपले घरास गेले. गढेकोटा प्रांत हिंदुस्थान येथील राजश्री मर्दनसिंग राजे याणी तेथून श्रीमंतास पोशाक वगैरे नजर पर्वतसिंग वकील या-बोरा पाठविले. ते पेशजीच भामरड्यात येऊन राहिले आहेत. मदारुल यास वस्त्र वगैरे पाठविले आहेत. ते रोज मा॥री वकील मा॥र याणी आणोन राजश्री ना( ना ) फडनवीस यास पोशाक १ व बंदूख सोनेरी मुलमेदार १ येसे व घोडा १ येसे दिल्हे राजश्री हरिपततात्या याजलाही या प्रो।च आनिले आहे ते तेथेच दाखऊन नंतर फडके याचे घरी पावते केले. वकीलाणी फडके मजकूर याचे नियेमाने भेट घेतली. यावर विडे देऊन त्याजला मार्गस्त केले. श्रीमंतास पोशाक वगैरे आणिले आहेत ते राजश्री नानास दाखविले. दरबार होईल ते दिवस द्यावयाचा निश्चये सांगि-(त) ला. या उपरात मदारुलमाहाम व फडके व बहिरोपंत मेहेंदले असे बोलत बसले होते तो रा। मोरो गंगाधर निफडकर ग्रहस्त श्री कासीयात्रेहून आले म्हणौन मा॥रनिले राजश्री नानाचे भेटीस येऊन

सेला पागोटे दिल्हे. नंतर मूसा मूतरम फिरंगी येथे आहे ते मदारुल-
माहाम याचे भेटीस आले त्याजलाही विडे देऊन रुकसत केले. यावर
हिसेब वगैरे कागदपत्र व कामकाजे आस्तमितपर्यंत होऊन राजश्री
नाना फडनवीस बेलबागात जाउन दो घटिका रात्रीस आपले वाड्यात
आले श्रुत होये. छ १८ रोज शुक्रवारी मागील दाहा घटिका दिवस
राहाता मदारुलमाहाम श्रीमंताचे वाड्यात गेले. राजश्री हरिपंत फडके
आदिकरून मुत्सदी व दफ्तरचे कारकून व संस्थानिक सुभे व मामलेदार
वगैरे सर्वत्र आले. आर्शेमाहालात श्रीमंत आल्यावर दरबार जाला
च्यार घटिका माली मुलकी कामे जाली. राजश्री मर्दनसिंग राजे
गढेकोटेकर याजकडील वकील पर्वसिंग याजला फडके याणी
श्रीमंताचे भेटीस आणिले होते. वकील मार याणी येक मोहोर नजर
करून भेटी घेतली. पोशाक वगैरे येणे प्रो श्रीमंतास

१ पोशाक
१ पागोटे
१ शालजोडी १ फर्दा २
२ जामेवार
१ किनखाब थान
२ आंबटे रंगीन

१ बंदूख सोनेरी मुलमेदार
१ ढाल गेंड्याची

९ मदरहू दिल्हे श्रीमंताची स्वारी रमन्यात जावयासी सिद्ध जाली.
तेव्हा दरबार बरखास्त करून श्रीमंत सातखणीवर गेले. बराबर मदा-
रुलमाहाम व फडके जाऊन येक घटिका खिलवत केले. राजश्री नाना
फडनवीस सिंव्हस्तस्नानाकरिता गंगातीरास जावयाचे त्याचा निश्चये.
छ २१ माहे मार रोज सोमवारी मागील दोन घटिका दिवस राहाता
रेवती नक्षेत्रावर आपले वाड्यातून निघोन बंगल्याचे बागात जाऊन
प्रस्तांनी राहावे असे ठरले. गंगातीरचे सुभे व मामलेदार यास पत्रे
साहित्याविसी गेली. पंधरा निदान वीसा दिवसात जाऊन माघारे यावेसे
बोलण्यात आले. मागील पाच घटि दिवस राहाता श्रीमंत घोडी फेरा-
वयासी जाताना गढेकोटेकर वकील यास विडे दिल्हे आणि स्वारी रम-

न्यात गेली. मदारुलमाहाम व फडके व कार्याकारण मुत्सद्दी वगैरे सातखणीवरच बसोन कागदपत्र व जाबसाल कामाकाजाचे जाले. यावर मागील दोन घटिका दिवस राहाता राजश्री नाना तेथोन आपले वाड्यात आले आणि औषध घेऊन तैसेच निघाले ते तोफखान्याजवळ श्रीव्यंकटेश आहेत त्याचे दर्शणास जाऊन बेलबागात आले. तेथोन घटिका रात्र होता माघारे आपले घरास आले. याउपरांत श्रीमंताची स्वारी रमन्यातून माघारा येऊन दो घटिका रात्री आपले वाड्यात दाखल जाले. श्रुत होय याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाना सांभाळ करनार स्वामी समर्थ बहुत काये लिहिणे. कृपा लोभ कीजे हे विज्ञापना.

---

**A. R. No. 204** २२ जमादिलावल १२०५ हिजरी
२७ जानेवारी १७९१

श्री

अखबार पुणें अज इा छ १९ माहे जमादिलावल ता छ २२ माह मजकूर सन १२०५ हिजरी रोज गुरुवार

पूर्वी छ १८ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ १९ रोजी सरकारचे डाकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ २२ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिले असे.

हरिपंत सिध्धटेकावर मुकामात करून होते. त्यास तेथून कूच करून पंढरपुरास जाण्याविशी बालाजीपंतांची पत्रे गेली त्याजवरून हरिपंतानी सिध्धटेकाहून कूच छ १९ रोजीं करून पंढरपुरास दरकूच गेले.

भीमाशंकरास जाऊन माहदेवचे दर्शन घ्यावे म्हणून बालाजी-पंताचे बहुत दिवसापासून मानस आहे. त्यास आजपर्यंत जाणें जाल नांहीं. याजकरिता सांप्रत जमादिसानीचे महिन्यात भीमाशंकरास जाऊन देवदर्शन घेऊंन यावें म्हणून पंत मारनिलेनी निश्चये केला आहे म्हणून यैकिले. शोध करून मागाहून लिहू

बालाजीपंतास दोघी स्त्रिया. त्यापैकी वडील स्त्रीस छ २२ रोजी उषःकालीच ऋतु प्राप्त जाला. ऋतुशांति जमादिलाखरचे महिन्यांत करणार.

माहदाजी सिंदे अजमेरीवर आहेत. जोतपूरवाल्याकडील पेश-कसीचा जवाबसाल ठरून सलूक होंणार म्हणून पेशजी लिहिले आहे त्यास साट लक्ष रुपये व अजमेर वगैरें च्यार मकानें देऊन सलूक जाला. जयेपूरवाल्याकडील जवाबसाल लागला आहे म्हणून रामजी पाटील जाधव वकील निंा सिंदे याजला सिंदे मजकूरानी लिहिले आहें. परन्तु राव पंतप्रधानास आद्यापि पत्रें आली नांहींत मागाहून येणार म्हणोन यैकिलें.

परशराम रामचंद्र मिरजवाले यानी धारवाडचे किल्यानजीक मोरचे चालविले आहेंत. कामाटी लाऊन किल्याचा खंदक भरायास लागले आहेंत. खंदक जमीनीसमान करून हल्ला करून लवकरच किला हस्तगत करितो. किल्यातील लोक हवालदिल जाले आहेत म्हणून छ २२ रोजी मिरजवाले मजकूराची पत्रें बालाजीपंतास आली.

बालाजीपंताचे स्त्रीस ऋतु प्राप्त जाला आहे. त्यास ऋतूशांति छ ३ माहे जमा(दि)लाखरी करणार

छ १९ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन तालीमखान्यात जाऊन तालमीचा हुनेर सिकून स्नानसंध्या देवपूजन समई कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम केला. अडीच प्रहर

दिवसास द्वितीये भोजन करून कागजावर दसखते केली. तीरंदाजी करून पतंग उडविले होते त्याची सयेर अस्तमानपर्येत करून रात्रौ सध्येसमई कवालाचे गायेन येकून भोजन करून गंजिफा वगैरें खेळून आराम करायास माहलात गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस बहिरोपंत मेंदळे व गोविंदभट निदमुरेस बोलाऊन आणऊन अस्तमानपर्येत खिलवत करून पंत मार्रनिले बेलबागात जाऊन संध्या करून देवदर्शन घेऊन तीन घटका रात्रीस आपले हवेलीस गेले.

छ २० रोज मंगळवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन करून कवालाचे गायेन येकून भोजन केले. नंतर आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून कागजावर दसखते केली. तीरंदाजी करून राव मवसूफ येनेमाहालातील दिवाणखान्यात बसून कृष्णराव बळवंत व चिंतामणराव फडक्यास बोलाऊन नेऊन दोन घटका खिलवत करून बरखास्त होऊन गेले. रात्रौ सध्यासमई कवालाचे गायेन येकून भोजन करून गंजिफा व चवसर खेळून राव मवसूफ आरामास माहालात गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस चिंतामणराव फडके व रामचंद्रराव फडके व कृष्णराव बळवंतास बोलाऊन आणऊ पत्रें लिहून हरिपंताकडे शुतरस्वारसमागमें रवाने करून बहिरोपंत मेंदळे व गोविंदभट निदमुरेस बोलाऊन घेऊन दोन घटका रात्रपर्येत खिलवत करून पंत मार्रनिले बेलबागात जाऊन सध्या करून देवदर्शन घेऊन च्यार घटका रात्रीस बालाजीपंत आपले हवेलीस गेले

परशरामपंत मिरजवाल्याकडील छ मारी तिसरे प्रहरी बालाजीपंतास पत्रें आली नारोपंत चक्रदेव दफ्तरनवीसास छ मजकुरी प्रातःकाली बालाजीपंतानी वस्त्रे सेला पागोटे देऊन हरीपंताकडे जाण्याकरिता निरोप दिल्हा.

छ २१ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन कवाल्याचे गायेन यैकून स्नानसंध्या देवपूजन करून भोजन करून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून कागजावर दस्खते करून स्वारी सिध करविली. चिंतामणराव फडके व नीलकंठराव खासगीवाले व गोविंदराव बाजी व सयाजीराव भापकर व वेंकटराव घोरपडें व देवलाते वगैरे सरदार व स्वार दोनतीनसें व गाडदी वगैरें जामियेत आणऊन राव मवसूफ तिसरें प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन च्यार घटका घोडी फेरून घटका दिवस राहता हवेलीस जाऊन पतग उडविले होते त्याची सयर घटकारात्रपर्यंत करून संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून गंजिफा वगैर खेळून आराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस चिंतामणराव फडके व रामचंद्रराव फडके व गोविंदभट निदसुरें व बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन घेऊन दोनतीन घटका खिलवत करून वेतालपेटेंत माहपुरुषाचे दर्शनास जाऊन माहपुरुषास शालजोडी पांघरऊन बालाजीपंत लेल्याचेथे जाऊन लेले मजकुराचे पुत्राची समाधानी करून हवेलीस जाऊन मेंदले मजकूर व निदसुरेसी घटका रात्रपर्यंत खिलवत करून पंत मारनिले संध्येस उठून गेले.

लक्ष्मणराव फडके व माधवराव फडके व नारोपंत चक्रदेव छ मजकुरी पुण्याहून हरिपंताकडे गेले.

छ २२ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन करून प्रहर दिवसास भोजन करून मस्त हाथी मौजे भांबरडे पुण्यानजीक तेथील कफेदस्त मैदानात हाथीचे गंडस्थली चिरकुटाचा पुतला बसऊन सोडला होता. त्याची सयेर सात मजली बंगल्यावरून दुर्बिनीतून तिसरे प्रहरपर्यंत करून यैनेमाहालातील दिवाणखान्यात जाऊन बालाजीपंतास बोलाऊन घेऊन यक घटका खिलवत करून पुन्हा राव मवसूफ सात मजली बंगल्यावर

जाऊन अस्तमानपर्यंत हाथीचा तमाशा पाहून हाथी माणस मारील म्हणून राव मवसूफानी हाथीच आसपास च्यारपांचसे स्वार पाठविले होते. रात्रौ राव मवसूफानी संध्या व भोजन करून कवालचे गायेन ऐकून आरामास माहलात गेले. बालाजीपंत आपले हवेलीस जाऊन बहिरोपंत गोविंदभट निदमुरेसी खिलवत घटका रातपर्यंत करून पंत मारनिले संध्येस उठले.

बालाजीपंतास दोघी स्त्रिया त्यापैकी वडील स्त्रीस छ मजकुरी उष:कालीन ऋतू प्राप्त जाला.

रघुनाथराव चिमणाजी गंचीव मोजे भोगहून छ मजकुरी पुण्यास येऊन बालाजीपंताचे हवेलीस तिसरे प्रहरी जाऊन पंत मारनिलेची भेटी घेऊन आपले हवेलीस गेले.

राव पंतप्रधानांनी छ मजकुरी च्यारपांच चार कैदेत होते त्याचे सिरछेद करविले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

**A. R. No. 205** १३ जमादिलाखर १२०५ हिजरी

१७ फब्रुवारी १७९१

(आरंभीचें पान अनुपलब्ध)

२

श्रुत होये. छ १ रोज रविवारी मागील साडे घटिका दिवस राहता मदारुलमाहाम आपले घरीहून निघोन आलीबाहादर याचे वाड्यात गेले कारण की श्रीमंत तथे आहेर करावयाचा संकत जाला होता तेव्हा श्रीमंतही तेथे आले बहादर याचे चिरंजीवास आहेर केला. बितपसील.

१ वस्त्रे बादली पोशाक गै किनखाब वगैरे.
१ कंठी मोत्याची.
१ सिरपेच.

३

या प्रो आहेर केल्यावर आतर पादान घेऊन अगोधर राजश्री नाना फडनवीस तेथोन निघाले ते राजश्री लक्ष्मणराव रास्ते याचे हवेलीस आले. श्रीमंताचे स्वारीची सिद्धता जाहली होती. त्यास मागील च्यार घटिका दिवस राहाना श्रीमंत निघाले ते अंबारीत स्वार जाले. खवामीत रा। दाजीबा फडके बसोन स्वारी निघाली ते रास्ते मा।र याचे हवेलीजवल मिवपुरीत श्रीमंत दाखल जाले. सांप्रदाया प्रो रा। लक्ष्मणराव रास्ते इस्तकबाल येऊन श्रीमंतास बैठकीचे स्थलीं घेऊन गेले तो नाचाची गुरूवात जाली. तेव्हा रास्ते मा।र याणी मेजवानीची वस्त्रे वगैरे येणेप्रमाणे

| श्रीमंतास | राजश्री नाना फडनवीस यास |
|---|---|
| १ मोत्याची कंठी | बऱ्हानपुरी सेला १ व पागोटे १ |
| १ पोशाक बऱ्हानपुरी जरी बुटीदार | लाल बुटीचे रंगाचे व जामेवार व किनखाब थान येकूण |
| १ सिरंगी घोडी रास येक सरंजाममुधा | च्यार वस्त्रे मिळून पोशाक १ |
| —— ३ | |

यासिवाये राजश्री बाबा पुरंधरे व आपा बलवंत व दाजीबा फडके व खासगीवाले व माधोराव रामचंद्र व राघोपंत गोडबोले आदिकरून तीस असामीस सेले पागोटी दिल्ही. आतर पानदान विडे व फुलाचे हार गजरे येसे दोन घटिका जाल्यावर रास्ते याणी श्रीमंतास व मदारुलमाहाम वगैरे यांस आपली नवी हवेली दरोबस्त दाखविली. नंतर बाहेर आल्यावर नवे पाणी आनिले आहे तो होज व नवे देवाल्ये होत आहे ते येसे सर्व दाखविले. याउपरांत श्रीमंत तेथोन निघाले ते आस्तमिति माघारे आपल्या वाड्यात आले राजश्री नाना आपले घरी आल्यावर मागती तैसेच निघाले ते गावात ग्रहस्त मंडली व भिक्षुक मंडली याचे घरी लग्न व मुंजी आहेत म्हणोन चौपाचा घरास जाऊन आहेर करून तीन घटिका रात्रीस माघारे आपले वाड्यात आले. रात्रौ अलीबहादर याचे येथील शर्गस्त निघाली

होती. श्रीमंताणी बहादर मजकुराचे घरी शादीचे खर्चाकरिता रोख पाच हजार रूपये व साहित्य सरंजाम मिळून बारा पंधरा सहस्रापर्यंत दिल्हे. श्रुत होये. छ १० रोज सोमवारी एकादसीस मागील तीन घटिका रात्र शेष राहाता राजश्री नाना फडनवीस बेलबागात जाऊन पूजन करून प्रहरा दिवसा आपले घरास आले. आणि श्रीमंत मागील दो घटिका रात्रीस पर्वतीस गेले. देवाची पुज्या जाल्यावर फराल करून स्वारी माघारा येता बेलबागात येऊन श्री विष्णुमूर्तीचे दर्शण घेतले. नंतर आपले वाड्यात दाहा घटिका दिवसा दाखले जाले. त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात सर्वत्र आले होते. मागील साहा घटिका दिवसा श्रीमंत मेजमानीस रो कृष्णंराव भिवजी सेलुकर सुभे आमदाबाद याचे येथे गेले. समागमे रो आपा बलवंत व दाजीबा फडके व बाबूराव केशव व खासगीवाले वगैरे होते. सेलूकर याणी श्रीमंतास पोशाक बऱ्हानपुरी गिवले रंगाचा व जामेवार व किनखाब येकूण पाच वस्त्रे व कंठी मोत्याची १ व सिरपेच १ यैसे दिल्हे. वरकड मंडलीस सेले पागोटी दाहाबारा आसामीस देऊन अतर पानदान जाले. नाचही जाला. या प्रो दोन घटिका होऊन श्रीमंत तेथोन माघारे निघाले ते साडेतीन घटिका दिवस शेष राहाता आपले वाड्यात आले. राजेश्री नाना फडनवीस याचे येथे सर्वत्र आल्यावर किरकोली कामकाजे च्यार घटिकापावेतो जाली. मागील दोन घटि दिवस राहाता मदारुलमाहाम आहेर करावयासी निघाले ते

| | |
|---|---|
| १ बलवंतराव जकातदार | १ त्रिंबकराव सबनीस |
| १ गोविंदपंत देवधरे | १ प्रतिनिधीचे बाळाजीपंत |
| १ माहादाजीपंत ढेरे | १ रामचंद्रपंत गोडबोले |

येस पाचसाहा ग्रहस्ताचे घरी जाऊन आहेर करून च्यार घटिका रात्रीस आपले वाड्यात माघारा आले. समसेर बाहादर, अलीबहादराचे पुत्र, याच्या मुंता रोज मजकुरी तेरा घटिका दिवसा जाल्या. सबब दाहा बार तोफेचे जाले. राजश्री हरीपंततात्या भंडारकोठ्यास दाखल जाले श्रुत होये. छ ११ रोज मंगलवारी त्रितीये प्रहरी श्रीमंताचे वाड्यात जेठी यांची कुस्ती होणार म्हणौन मागील सा घटिका दिवसा

मदारुलमाहाम सरकारवाड्यांत गेले. रो आपा बलवंत व दाजीबा फडके व बाबा पुरंधरे व बहिरो रघुनाथ मेहेदले व खासगीवाले वगैरे आल्यावर हजारा कारंज्याचे दिवानखान्यात बैठक जाली होती. तेथे श्रीमंत आले. त्यास प्रथम पाचसात पहिलवानाच्या जोडीच्या कुस्त्या जाल्या. नंतर नरसू व फुंला जेठी या दोघासी वज्रमुष्टीची शुरुवात जाली. ते च्यार घटिकापर्यंत कडो विकडीचे प्रकार दोघाचे बहुतच जाले. कसब होताना दोघेही समतोलच राहिले. त्यात एकाची जुंज कोवतल काहीयेक जास्त जाल्यावरून श्रीमंताणी त्याजला सोण्याचे कडे वजन आठरा तोल्याचे देविले व दुसऱ्यासी पंधरा तोल्याचे येकूण दोन कडी दोघास सेले पागोटी या शो बक्षीस दिल्हे. मागील दोन घटिका दिवस राहता बरखास्त होऊन सर्वत्र आपलाले घरास गेले. पाच घटिका रात्रीस राजश्री नाना फडनवीस रो कृष्णराव भिवाजी सेलुकर सुभे आमदाबाद याचे येथे मेजमानीस गेले. समागमे राघोपत गोडबोले वगैरे गेले होते आधिकोतर मंडली कोण्हीच नवते. सेलूकर याणी मदारुलमाहाम याजला मोत्याची कंठी १ व सेला पागोटे बसमेदार व जामेवार व किनखाब थान येकूण पोशाकाची वस्त्रे उतम प्रतीची दिल्ही. गोडबोले व यादोराव देवकाते राजपागे वगैरे खास सेले पागोटी दिल्ही अतर पानदान जाल्यावर च्यार घटिका पर्येत नाच जाला उपरांत राजश्री नाना तेथोन माघारा निघोन बारा घटिका रात्रीस आपले वाड्यात आले. श्रुत होये. छ १२ रोज बुधवारी त्रितीये प्रहरी राजश्री नाना फडनवीस याचे येथे सर्वत्र आले होते. राजश्री आपा बलवंत व सकाराम येशवत पानसे व बाजीराव बरवे व माधोराव रामचंद्र वगैरे पागे राजश्री हरीपत फडके याचे लस्करात जावयाकरिता श्रीमंताची आज्ञा घेऊन नंतर मदारुलमाहाम याचा निरोप घेऊन गेले आपा बलवंत सासोडास जाऊन नंतर तेथोन परभारा लस्करास जाणार व राजश्री बाबा पुरंधरे याचे द्वितीये संमधाचा निश्चये जाला म्हणोन माारनिले लग्न करावयासी सासोडास निरोप घेऊन गेले. नंतर राजेश्री रंगराव त्रिंबक राजे बाहादर व दाजीबा फडके व गोविंदभट निरचेऊर येऊन च्यार घटिका बाहादर

माराचे सरंजाम वाटनीविसींचे बोलणे जालयावर मागील दो घटिका दिवसा राजश्री नाना आपले घरीहून निघाले ते शनवार पेठेत श्री आमृतेश्वर माहादेव याचे देवाल्य श्रीमंताणी जीर्नोद्धार करून नवे सिध्ध करविले, रोज मारी देवाची स्थापना जाहाली म्हणौन दर्शणाकरिता जाऊन बेलबागात आले. संध्यावंदन नवे हवेलीस करून माघारे निघाले ते घटिका रात्रीस आपले घरास आले. मागील सहा घटिका दिवस राहता श्रीमंत रमान्यात गेले होते. त्यास अस्तमिती स्वारी माघारा येऊन साइंकाल होता आपले वाड्यात दाखल जाले श्रुत होये. छ १३ रोज गुरुवारी रो॥ कृष्णराव भिवाजी सुभे आमदावाद याजला मदारुलमाहाम याणी बऱ्हानपुरी सेला व पागोटे व त्याचे उभयेता चिरंजीवास बऱ्हानपुरी कचे रंगाची सेले व पागोटी उंच पासीची देऊन मारनिले संस्थान मारी जातात. सबब निरोप काल दिल्हा. रोज मारी त्रितीये प्रहरी राजेश्री नाना फडनवीस याचे वाड्यात सर्वत्र आले. यावर रो॥ बहिरो रघुनाथ मेहेंदले येऊन मदारुलमाहाम याचे व मेहेंदळे मार या उभयेताचे खिलवत ममलत प्रकर्णी साइंकालपर्येत येऊन सर्वत्र आपलाले घरास गेले. खिलवताखेरीज आणखी कामकाज जाहले नाही हिंदुस्थान प्रांतीचे वर्तमान राजेश्री माहादजी सिंदे आजमेरीकडून निघोन मेवाड प्राती आले. शापूर देवले येथे मुकाम आहे. सीकानी चाल पुढे बहुत केली. मथुरेस येऊन दोन पुरे लुटून गेले उपद्रव फारच केला राजेरजवाडे व इरमालबग व गीक वगैरे येकंचित जाले आहेत. होल्कर व अलीबहादर याचेही सूत्र आतून राज्यासी आहे. खंडनी किंवा सल्ल्य जोनपुर व जैपुरकराचा व्हावा यैसे ठीक दिसत नाही. पुढे सिकानी चाल करून मागे गिलचेही आहेत. पाहावे काये करतील ते न कळे सिंदे याचे कुटुंब किले ग्वालेरीस होते ते उज्यनीस रवाना करविले आणि आपणही उज्येनीस

(अपूर्ण)

---

**A. R. No. 206**

१९ रजब १२०५ हिजरी

२४ मार्च १७९१

(आरंभीची पाने अनुपलब्ध)

३

श्रीमताचे वाड्यात दाहा घटिका रात्रपर्यंत नाच व तमाशा जाला. श्रुत होये. छ १५ रोज सोमवारी श्रीमंत दो घटिका दिवसा आपले वाड्याबाहेर आले. तो फडके आदिकरून सर्वत्र आले. हे वर्तमान समजताच राजश्री नाना फडनवीस तेथेच गेले. साहा घटिका पावेतो सर्वांचे खेळने जाल्यावर मदारुलमाहाम माघारे आपले घरास आले. आणि श्रीमंत आपले वाड्यात जाऊन दिवानखान्यात बसले. पहिलवान व जेटी व शागिर्द पेशा वगैरे हजरच होते. त्यानी कुस्त्या व नाना प्रकारचे खेल बारा घटिका दिवसपर्यंत केले. ते जाल्यानंतर सर्वत्र आज्ञा घेऊन आपलाले घरास गेले. त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे वाड्यात सर्वत्र आले होते. त्यास रो माहादाजीपंत गुरुजी याचे घरी लग्न जाले म्हणौन त्याचे येथे राजश्री नाना फडनवीस मेजमानीस गेले. तेंव्हा मारनिलेंनी मदारुलमाहाम यास मेला व पागोटे जामेवार व किनखाबाचे थान यैसी च्यार वस्त्रे दिल्ही. आतर पानदान जाले. दोन घटिका नाच जाल्यावर राजश्री नाना माघारे आपले घरास आले. वो रो गोविदभट निरचेऊर व बहिरोपंत मेहेंदले आ (ल्यावर) त्यासी दोन घटिका बोलणे जाले. नंतर रो त्रिबकराव परचुरे वगैरे दरकदार येऊन मामलतीचे कामकाज थोडेबहुत होऊन साइंकाली सर्वत्र माघारे गेले. सरकारवाड्यात नाच दीड प्रहर रात्रपर्यंत जाला. श्रुत होये छ १६ रोज मंगलवारी श्रीमंत प्राथःकाली वाड्याबाहेर येऊन दरोबस्त मंडलीस बोलाविले. रा दाजीबा फडके याचे शरीर बहुत आशक्त यास्तव त्याचे यावयाचा आनमान. तेंव्हा श्रीमंताणी दप्तरचे कारकून याजला फडके मारावडे पाठऊन त्याजला आणविले आणि विनोदार्थ फारच शोभा करविली. चिखलमाती डाहारियात घालोन मंडलीस त्यात परस्परे लोटविले. रा नारो निलकठ मजमदार याजलाही डाहारियात ठकविले होते. साहा घटिका दिवसा मदारुल-

माहाम तेथे आले. ते दोन घटिका बसोन मागती आपले घरास गेले. नंतर खेळ पहिलवानाचा जाला. या प्रो सिमग्याचे माहात्म प्रतिपदे-पासोन चालत आहे. दीढा प्रहरा दिवसा मंडलीस आज्ञा देऊन श्रीमंत भोजनास आपले वाड्यात गेले. नंतर त्रितीये प्रहरी रमन्यात स्वारी जाऊन तेथे घोडी फिरविली. अस्तमित होता माघारी निघाले ते आपले वाड्यात आले. मागील प्रहर दिवसा मदारुलमाहाम याचे येथे मुत्सदी व दरकदार व सुभे मामलेदार यैसे येऊन आपलाले निसबतची कामकाजे च्यार सा घटिकापर्येत जाली. नंतर मागील दोन घटिका दिवस शेष राहाता राजश्री नाना फडनवीस वेळबागात जाऊन साइंकाली आपले घरास आले. रात्रौ नाच व तमाशा श्रीमंताचे वाड्यात व मदारुलमाहम याचे येथे दीड पावणेदोन प्रहर रात्रपर्येत जाला. श्रुत होये. छ १७ रोज बुधवारी श्रीमंताचे वाड्यापुढे दीड प्रहरपर्येत चिखलमातीचा खेळ जाला. नंतर त्रितीये प्रहरी मदारुलमाहाम याचे येथे सर्वत्र आले होते. रा। त्रिंबकजीपंत वार्धेकर वकील दि॥ राजश्री परशराम रामचंद्र येऊन च्यार घटिका त्यासी खिलवत जाले. त्याचा भाव ध्यानास आला की धारवाड येथून मिरजकराणी निघोन पुढे व्हावे. हे मानस येथील मुख्याचे. परंतु विरर्धात गोष्ट पडली आहे. याआर्थी हे मल्हा मिरजकर मार याचे ध्यानास येत नाही म्हणौन वार्धेकर वकील मजकूर याजला धारवाडासी पाठऊन मिरज-करासी बोलणे करावे यैसा काहीयेक विच्यार दिसे. येदर्थी च्यार घटिकापर्येत खिलवत होऊन रा नाना फडनवीस आपले घरीहून निघाले. ते आहेर कराव्यासी रा कुशाबा भाऊ फडनवीस सातारेकर याचे येथे जाऊन तेथून माधोराव सदासिव याचे घरास गेले. नंतर नारायेणपेठेत कोणे ग्रहस्ताचे येथून होऊन आपले घरास दोन घटिका दिवस शेष राहाता आले. तो सातारेकर कोण्ही रा त्रिंबकजी भोसले येथे आले होते. ते भेटीस आले होते. त्याजला विडे देऊन मार्गस्त केले. नंतर रा बहिरो रघुनाथ मेहेंदले आले त्यासी येक घटिका बोलणे होऊन आस्तमानी मदारुलमाहाम नव्या वाड्यास गेले. वेलबाग करून तेथून दो घटिका रात्रीस माघारे आपले वाड्यात आले. रात्रौ नाच

तमाशे श्रीमंताचे वाड्यात व मदारुलमहाम व रा हरिपंत फडके याचे येथे जाले. किले धारवाड येथे दारुगोल्याचे शंभर उट भरून पेशजी रा जनार्धनपंत सिलेदार कारकून याजबो किले मजकुरी पाठऊन दिल्हे होते ते कारकून मार पावते करून माघारा आला. आणखीही सरंजाम मिरजकराकडे जावयाचा. सबब मदारुलमाहाम याणी मेस्तर माल्लीट वकील दिा इंग्रेज याजला सागोन ममईहून परभारा दारू वगैरे सरंजाम

४

धारवाडास पावता करविला. हिंदुस्तान प्रांतीचे वर्तमान तर राजश्री माहादजी सिंदे याचे ठाणे आजमेरचे किल्यात छ २३ माहे जमादिलाखरीस दाखल जाले. सांप्रत सिंदेही तेथेच आहेत. किल्याची सैर करितात. होल्कर व आलीबहादर जैपूर प्रांतीच आहेत. या प्रो वर्तमान यैकिल्यात येत आहे. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याची फौज च्यार हाजार रा बलवंतराव भवानी घेऊन निघाले ते वर्धा नदी उतरून वासीम प्रांती आले आहेत. मजल दर मजल जाऊन राजश्री हरिपंत फडके याजला भेटनार श्रुत होये. छ १८ रोज गुरुवारी प्रथम प्रहरी रा बलवंतराव कासी धारवाडास जावयाकरिता श्रीमंताची आज्ञा घेऊन नंतर मदारुलमाहाम याचा निरोप घेतला. रा विसाजीपंत वार्धेकर वकील मिरजकराकडील याची रवानगी धारवाडास होते. सबब वकील मार प्रस्थानी जाऊन राहिले आहेत. रोज मारी पंचमीचा रंग श्रीमंताचे वाड्यात होणार म्हणौन मागील साहा घटिका दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस आपले येथून निघोन श्रीमंताचे वाड्यात गेले फडाचे दिवानखान्यात बैठक जाली. दरोबस्त मंडळीस बोलावनी गेली होती. त्याजवरून राजश्री पंतसचिव व बावा पुरधरे व माधोराव पेठे व रामचंद्र नारायेण व त्रिंबकराव जनार्धन सरसुभा प्रांत पुणे व रंगराव त्रिंबक व रघुपतराव नारायेण राजे बाहादर व माहाराव निंबालकर व मानाजी सिंदे फाकडे व सयाजीराव भापकर व माहालिंगराव घोरपडे व पाटणकर व पाग व मानकरी सरदार व सिलेदार व सरंजामी व नारो निलकंठ मजमदार

व त्रिंबकराव चिटणीस बहिरोपंत मेहेंदले व गोविंदभट निरचेऊर व दाजीबा व बाबा फडके व पानसे व खासगीवाले त थते व साठे आदिकरून मुत्सदी व दफ्तरचे दरकदार व वकील संस्थानिक वगैरे सर्वत्र श्रीमंताचे वाड्यात आल्यावर श्रीमंत त्या दिवानखान्यात मागाहून आले. मदारुलमाहम येक घटिका बसोन पुढे रंगाचा समारंभ होणार या आर्थी श्रीमंताची आज्ञा घेऊन राजश्री नाना फडनवीस विडे घेऊन निघाले ते बेलबागात गेले. इकडे श्रीमंताचे वाड्यात सर्वत्र आल्यावर आरंभी सर्वांस विडे दिल्हे. नंतर आतर व फुलले व गुलाल व बुका याची भडमार जाली. उपरात रंगाची शुरुवात जाली. ते च्यार घटिकापर्यंत मोठीच धूम जाली. रंगे करून सर्वत्र तर करून दिल्हे. दोन घटिका नाचही जाला. याप्रो रंगाचा समारंभ येथास्थित जाल्यावर मागील दोन घटिका दिवस शेष राहाता सर्वत्राणी श्रीमंताची आज्ञा घेऊन आपलाले हवेलीस गेले छ १२ माहे रजबची आखबार राजश्री रामचंद्र उद्धव याची सरकारात आली. त्या आखबारीलील वर्तमान ध्यानास आले की हजरत बंदगानआलीसाहेब याणी पानगलाहून राजश्री हरिपंत फडके याचे भेटीचे उद्येशे कूच करून गद्वालचे सुमारे आले व राजश्री गोविंदराव कृष्ण याणी हुजूरची आज्ञा फडके मार थाजकडे जावयाची घेऊन उभयंता गोविंदराव याच्या भेटी छ १२ रजबी राजश्री हरिपंततात्या याच्या जाल्या. पुढे हुजूरच्या भेटी सत्वरच होणार म्हणोन वर्तमान आले. श्रुत होये. याउपर पुढे प्रसंगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करणार स्वामी समर्थ बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञापना.

---

A. R. No. 207

८ शाबान १२०५ हिजरी
१२ एप्रिल १७९१

श्री

पोष्य बळवतराव नागनाथ सां नमस्कार विज्ञापना जे येथील

वर्तमान ता। छ ८ माहे शाबान चैत्र शुध नवमी भौमवासरपर्यंत वास्तव्य पुणें येथें स्वामीचे कृपेकरून स्वस्थ जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ५ माहे मजकुरी सरकारचे डांकेवर हुजूर आर्जी व आखबार व नवाब आजमलउमरा बहादर व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र पाठविलें ते पाऊन सविस्तार वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ ८ रोजपर्यंत वर्तमान लिहून सांप्रदायाप्रमाणें पत्राची रवानगी केली आहे. पत्रावलोकनी विस्तारें वर्तमान ध्यानारूढ होईल सेवेसी श्रुत होये. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

A. R. No. 208

१९ शाबान १२०५ हिजरी
२३ एप्रिल १७९१

श्री

पोष्य बळवंतराव नागनाथ सां। नमस्कार. विज्ञापना जे येथील वर्तमान ता। छ १९ माहे शाबान चैत्र वद्य पंचमी मंदवासरपर्यंत वास्तव्य पुणें येथें स्वामीचे कृपेकरून स्वस्थ जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १३ माहे मजकूरी सरकारचे डांकेवर हुजूर आर्जी व आखबार व नवाब आजमलउमरा बाहादर व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र पाठविलें ते पाऊन सविस्तर वर्तमान श्रुत जाले आसेल सांप्रत छ १९ रोजपर्यंत वर्तमान लिहून सांप्रदाया प्रो। पत्राची रवानगी केली आहे पत्रावलोकनी विस्तार वर्तमान ध्यानारूढ होईल सेवेसी श्रुत होये. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना

---

श्री

अखबार पुणें अज इा। छ १३ माहे शाबान ता। छ १९ माहे मजकूर सन १२०५ हिजरी रोज शेनिवार.

पूर्वी छ १२ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ १३ रोजी सरकारचे डांकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ १९ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिले असे.

इंगरेजाकडील कुल जमियेत बेंगरूळानजिक आहे व फतेअली-खान घाठाखाली होता. ते इंगरेजानी बेंगरूलचा किला घेतल्याचे वर्तमान यैकून उडबालचे घाठाने वरते येऊन इंगरेजाचे गिर्दनवाहीस आहे. इंगरेजाकडील कहीकबाड व रस्त खान मजकुराने बंद केली आहे व हररोज गोळागोली होत आहे म्हणून यैकिलें.

हुजूरची जमियेत इंगरेजास कुमक गेली हे वर्तमान फतेअली-खानाने यैकून हुजूरचे जमियेतीचे रुखावर खान मजकुराने पूरण-याममागमे जमियैत देऊन रवानें केले म्हणून यैकिले.

परशराम रामचद्र धारवाडाहून कूच करून श्रीरंगपटणचे रुख तुंगभद्रा नदीपर्यंत गेल्याचे वर्तमान आले तेथून दरकूच सिऱ्याचे जंगलात जाणार म्हणून यैकिले.

फतेअलीखानाकडील पत्रें राव पंतप्रधानास लक्ष्मणराव रास्त्याचे मारफातीने आली आहेत म्हणून पेशजी लिहिलेच आहे. त्यास रास्ते मजकुराकडील सुबराव नामे वकील याजला बाळाजी-पंतानी पुन्हा छ १८ माहे शाबानी राव रास्त्याकडे वांईस रवाना केले आहे. जवाबसाल करून उतर येईल त्याप्रमाणे खान मजकुराचें पत्राचा जवाब देणार म्हणून यैकिलें.

माहादजी सिंदे आजमेरीहून जरीदा पुष्करतीर्थाचे स्नानास गेले आहेत त्यास सिंदे मजकुरानी आजमेरचे किल्यास रस्त पाठविली होती. त्यास मार्गात दोनतीन हजार बेंदड येऊन रस्त लुटून नेली. त्यास जयपूर प्रांती तुकोजी होळकर व अलीबहादर आहेत. या उभ-यता सरदारानीच रस्त लुटून नेली याखेरीज या प्रांती रस्त लुटून नेणार कोण म्हणून सिंदे मजकुरानी बाळाजीपंतास पत्र छ १ माहे

शाबानचे पुष्करतीर्थाचे मुकामीहून पाठविले ते पत्र मारनिलेस छ १८ रोजी आली.

होळकराची व माहदजी सिंद्याची फारच नाखुषी आली आहे म्हणून यैकिलें.

मल्हारजी होळकर पैठणावर मुकामात करून तालुकियात उपद्रव केला. सबब अजमुलमुलक बाहदराकडील जमियत सातआठश व राव पंतप्रधानाकडील पांचसातसे जमियत यकत्र होऊन होळकर मजकुरावर चालून गेली. छ ९ माहे शाबानी लढाई जाली. त्यास बाहदर मवसूफाकडील व होळकराकडील शे दोनसे माणूस जखमी व ठार जाली म्हणून राव पंतप्रधानास वर्तमान आले. त्याजवरून बालाजीपंतानी बहिरो आनत पागेवाले सरदाराची छ १९ रोजी पुण्याहून रवानगी केली. त्यासमागमे पांचसात पागा व केशव माहदेव कोपरगावी दोन हजार जमियतीने आहे त्यापैकी हजार जमियत रवाने केली.

पुरंधरचे किल्यावर दारुगोली व जकीरा दाणे वगैरें कमी म्हणून बालाजीपंतानी किले मजकूरचे किलेदारास बोलाऊन आणऊन दारुगोली व दाणे व वैरण वगैर जंगी सरंजाम तयार करून ठेवण्याविशी ताकीद केली. त्याजवरून सरंजाम ज्यारी आहे व हरयक किलेदारास याचप्रमाणे सूचना केली आहें.

छ १३ रोज रविवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन वगैरे कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून तिसरे प्रहरी मिस्तर मालट वकील इंगरेज आपले हवेलीस येणार म्हणून बालाजीपंतास तेसमई हजर होण्याविशी तलब केली. त्याजवरून पंत मारनिले राव मवसूफासमीप हजर जाले होते. इतकियात मिस्तर मालट वकील राव मवसूफाचे हवेलीनजीक येताच बालाजीपंत गणपतीचे माहलात गेले वकील मजकूरही पंत मारनिलेसमीप

जाऊन बसला. बाद राव पंतप्रधानही जाऊन बसले. धारवाडचे किल्याची फते जाल्याचे वर्तमान यैकून वकील मजकूर मुबारकबादी करितां आले आहेत म्हणून बाळाजीपंतानी राव सवाईमाधवरावास सांगितले. उपरांतिक लार्ड कार्नवालीस इंगरेजाचे पत्राची थैली वकील मजकुराने राव सवाईमाधवरावास दिल्ही. दोन घटका निशस्त जाली. नंतर राव सवाईमाधवरावानी अतरपानदान देऊन बरखास्त होऊन गेले. मिस्तर मालेट वकील इंगरेज आपले मकानास गेला. बाद राव पंतप्रधान पुन्हा गणपतीचे दिवाण-खान्यात जाऊन बसले. बाळाजीपंत व बहिरोपंत मेहेंदळे हजर होते फतेअलीखान कोणते घाटाने बेंगरुळानजीक आला म्हणून नकशा पाहिला बातमीचे पत्र आले होते ते पाहून दोन घटका खिलवत करून राव सवाईमाधवराव बरखास्त होऊन शैनेमाहलात जाऊन नीरांजनी करून रात्रौ संध्या व भोजन केले. कवालाचे गायेन यैकून आराम करायास माहलात गेले बाळाजीपंत आपले हवेलीस आरामासीच गेले.

छ १४ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्यादिक व भोजन करून कागदावर दसखत केली नंतर आराम केला. दोन प्रहर दिवसास रात्रा चंद्रग्रहण म्हणून भोजन करून दाने करायाची नेमणूक करून पांच घटका रात्रीस चंद्रग्रहण-समई राव सवाईमाधवरावानी आपले हवेलीतच हौदावर स्नान करून अश्वदान यक व गोदाने व दक्षणा वगैरे च्यारपांच हजार रुपयेपर्यंत ब्राम्हणास खैरात केली नंतर जपजाप्य करून बारा घटका रात्री नंतर मुक्तस्नान करून भोजन केले राव सवाईमाधवरावांचे कबील्यानेही गोदाने वगैरे खैरात केली.

बाळाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस राम-चंद्रराव फडके व बहिरोपंत मेंदळे गोविंदभट निदसुरेग बोलाऊन आणऊन च्यार घटका खिलवत करून पंत मारनिले दीक्षितबावा माहपुरुषाचे येथे हणमंतजयंती म्हणून तेथे जाऊन क्षणभर बसून बेलबागात गेले. संध्या करून देवदर्शन घेऊन हवेलीस गेले चंद्रग्रहण-

समई स्नान दान व गोदान व दक्षणा वगैरें देऊन बारा घटका रात्रीस मुक्तस्नान करून उपहार केला. नंतर निद्रा केली.

छ १५ रोज मंगळवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन तालीमखान्यात जाऊन तालमीचे कितेक हुनर सिकून स्नान संध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन गायेन यैकून भोजन केले. नतर आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी तयार करायास सांगून नीलकंठराव खासगीवाले व नारोपंत मुजमदार व वेंकटराव घोरपडे व जोत्याजीराव व मलोजीराव जाधव वगैरें सरदार व स्वार हजारबारासे व गाडदी सातआठशे वगैरें जमियत आणऊन राव मवसूफ तिसरे प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून शराचे व हार्थीचे लढाईचा तमाशा पाहून राव मवसूफ हार्थीचे किलावियात स्वार होऊन अस्तमानी हवेलीस जाऊन रात्रौ सध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. चवसर खेळून आरामास गेले.

बालाजीपतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस गोविंद-भट निदसुरे व बहिरो रघुनाथ मेंदल्यास बोलाऊन घेऊन अस्तमान-पर्येत खिलवत करून पंत मारनिल्हे बेलबागात जाऊन संध्या तेथेच करून विष्णुदर्शन घेऊन आपले हवेली दोनतीन घटका रात्री गेले.

हरीपंताची व गोविद कृष्णाकडील पत्रें छ ७ रोजची छ मज-कुरी प्रात:काली बालाजीपंतास आली.

छ १६ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन कवालाचे गायेन यैकून स्नानसंध्या देवपूजन करून भोजन केले. कागजावर दसखते करून आराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यात च्यार घटका बसून चवसर खेळून ग्रैनेमाहलात जाऊन तीरंदाजी केली. रात्रो संध्यासमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. नंतर शतरंज खेळून आरामास माहलात गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस राम-चद्रराव व चिंतामणराव फडके व गोविंदभट निदसुरे व बहिरोपंत

मेंदल्यास बोलाऊन आणऊन सोलापूरवाले आमीलाचे हिशबची चवकसी दोनतीन घटका करून चिंतामणराव फडक्यासी आस्तमानपर्यंत खिलवत जाली. उपरांतिक बालाजीपंत बेलबागात जाऊन तेथेच संध्या करून देवदर्शन तीन घटका रात्रीनंतर हवेलीस गेले.

छ १७ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रातःकालीच बेदार होऊन तालीमखान्यात जाऊन तालमीचे कितेक हुनर सिकून स्नानसंध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. कागजावर दसखते करून आराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून दोन तीन घटका हरणाचे लढाईचा तमाशा पाहून च्यारपाच हाथी आणऊन फेर देविले. अस्तमानी यैनेमाहलात जाऊन दोन घटका बसले रामचंद्रराव फडके वगैरे हजर होते. नंतर राव मवमूफ बरखास्त होऊन गेले संध्येसमई कवालीचे गायेन यैकून भोजन केले. गंजिफा दाहा घटेका रात्रपर्यंत खेळून आराम करायास माहलात गेले.

बालाजीपंतानी छ मजकूरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस रामचद्रराव फडके व गोविंदभट निदसुरे व बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन घेऊन दोन घटका बोलून रंगराव त्रिंबक आले त्यासी दोन घटका खिलवत केली. नंतर पंत मारनिले पुन्हा आस्तमानपर्यंत निदसुरे व मेंदले मजकुरासी खिलवत करून बाहिरो आनंत पागेवाल्यास बोलाऊन घेऊन मल्हारजी होळकराचे पारपत्यास जाण्याविशी निरोप देऊन बेलबागात गेले. बागात संध्या करून देवदर्शन घेऊन च्यार घटका रात्रीस आपले हवेलीस गेले.

गोविंदराव कृष्णाकडील पत्र छ ११रोजची ते छ मजकुरी तिसरे प्रहरी बालाजीपंतास आली.

छ १८ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले कागजावर दसखते करून आराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी सिध करायास सागून चिंतामणराव फडके व

नारो नीलकंठ मुजमदार व जोत्याजीराव व मलोजीराव व संभाजीराव जाधव व धायेगोडे वगैरें सरदार व स्वार सातआठश व गाडदी वगैरें जमियत आणऊन राव मवसूफ तिसरे प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून हरणाचे रमण्यात जाऊन हरणे नजीक आणऊन दाणे घालून अस्तमानपर्येत तमाशा पाहून राव मवसूफ हाथीचे किलावियात स्वार होऊन दोन घटका रात्रीस हवेलीस जाऊन संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. चवसर खेळून आराम करायास माहलात गेले.

बाळाजीपंत छ मजकुरी प्रात:कालीच आपले बागात जाऊन स्नान सध्यादिक करून बागातच भोजन केले. दोन प्रहर दिवसास हवेलीस आराम करायास गेले. तिसरे प्रहरी रामचंद्रराव फडके व गोविंदभट निदसुरेस बोलाऊन घेऊन हरिपंताकडील व गोविदराव कृष्णाकडील पत्राचे जवाब घटका रात्रपर्येत लिहून पत्रें रवाने करून पंत मारनिले बेलबागात जाऊन देवदर्शन घेऊन आपले हवेलीस गेले

माहदजी सिंद्याकडील छ १ माहे शाबानची पत्रें छ मजकुरी तिसरे प्रहरी बाळाजीपंतास आली.

छ १९ रोज शनिवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन स्नानसध्यादिक व भोजन करून आराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून चितामणराव फडके व नारोपंत मुजमदार व जोत्याजीराव व मलोजीराव व संभाजीराव जाधव वगैरें सरदार व स्वार आणविले. परंतु स्वारीस न जाता च्यार घटका कागजावर दसखते करून तीरंदाजी केली. रामचंद्र सिवाजी किलेदार सोलापूर-वाल्यासी दोन घटका बोलून रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम करायास महालात गेले.

बाळाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस चिंता-मणराव फडके व बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन घेऊन दोन घटका-बोलून रामचंद्र सिवाजी किलेदार सोलापूरवाल्यासी दोनतीन

घटका खिलवत करून किलेदार मजकुरास सोलापूरास जावयाकरिता निरोप देऊन गोविंदभट निदसुरेस बोलाऊन घेऊन दोन घटका बोलून बेलबागात जाऊन देवदर्शन घेऊन हवेलीस गेले.

बहिरो आनंत पागेवाल्यास छ मजकुरी बालाजीपंतानी मल्हारजी होलकराचे पारपत्याकरिता पुण्याहून रवाने केले. पागेवाले मजकूर वाघोलीचे मुकामास गेले. तेथून दरकूच पैठणास जाणार. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

A. R. No. 209 १७ रमजान १२०१ हिजरी
२० मे १७९१

श्री

पोष्य बळवंतराव नागनाथ सां। नमस्कार विज्ञापना जे येथील वर्तमान ता। छ १७ माहे रमजान वैशाख वद्य चतुर्थी मंदवासरपर्यंत वास्तव्य पुणें येथे स्वामीचे कृपेकरून स्वस्थ जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ११ माहे मजकुरी सरकारचे डाकेवर हुजूर आर्जी व आखबार व नवाब अजमलउमरा बाहादर व स्वामीचे सेवेसी विनंतीपत्र पाठविलें ते पाऊन सविस्तार वर्तमान श्रुत जालें असेल. सांप्रत छ १७ रोजपर्यंत वर्तमान लिहून डाकेवर पत्राची रवानगी केली आहे. पत्रावलोकनी विस्तार वर्तमान ध्यानारूढ होईल. सेवेसी श्रुत होये. बहुत काय लिहिणें हे विनंती

---

(दुसऱ्या पानावरील आरंभीचा मजकूर फाटला आहे)

वर मुकामात करून होते. सांप्रत तेथून कूच छ २६ माहे शाबानी करून आजमेर व किसनगडचे दरम्यान मुकामांत करून राहिल्याचे वर्तमान राव पंतप्रधानास व बालाजीपंतास आले

तयेमूरशा बादशाकडील वकील माहदजी सिंद्याकडे आला होता.

त्यासमागमें सिदे मजकूर बादशास जवाहीर वगैरें रवाने करणार म्हणून पेशजी लिहिल आहे. त्याप्रमाणे सांप्रत जवाहीर व वस्त्रें व हाथी घोडा व तोफा रवान्या केल्याच वर्तमान राव पंतप्रधानास आलें.

हरिपंत हुंडे आनताचे मुकामीहून इंगरेजाकडे छ २४ माह शावानी कूच करून गेल्याची पत्रें राव पंतप्रधानास व बालाजीपंतास छ ८ माहे रमजानी आली.

छ ११ रोज रविवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. कागजावर दसखते करून अराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी सिध्द करायास सांगून बाबूराव केशव व नारोपंत मुजमदार व सदासिव रघुनाथ व राघोपंत गोडबोले व साबाजी नाईक निबांलकर वगैरें सरदार व स्वार च्यारपांचसे व गाडदी वगैरें जमीयत आणऊन राव मवसूफ तिसरे प्रहरी घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून बोथाट्या खेळून हाथीचे किलावियात स्वार होऊन अस्तमानी हवेलीस जाऊन रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून अराम केला.

बालाजीपंतानी छ मारी तिसरे प्रहरी अपले हवेलीस रामचंद्रराव फडके व बहिरोपंत मेहेंदले व गोविंदभट निदसुरे व गोपाल भगवंत नायब मुनसीस बोलाऊन घेऊन आलाहिदा अलाहिदा बोलून च्यारपाच मकानी मुतसदी याचेथे शादी म्हणोन पंत मारनिले गेले. वस्त्रे देऊन बेलबागात जाऊन देवदर्शन घेऊन अपले हवेलीस गेले. रात्रौ यशवंत नरसिंगराव पाग्याचे घरी नरसिव्हजयंतीचा उत्साहा सबब प्रहर रात्रीस तेथे जाऊन हरिकथा दोनतीन घटका यैकून हवेलीस गेले भवानराव घाटगे मलवडीकर यास राव पंतप्रधानानी हरीपंताकडे जावयाकरिता छ मजकुरी तिसरे प्रहरी रुखसत केले.

छ १२ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्यादिक व भोजन करून अराम केला. अडीच प्रहर दिवसात

द्वितीये भोजन करून हरणे आणवून च्यार घटका तमाशा पाहून तीरंदाजी दोनतीन घटका केली. रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. गंजिफा खेळून अराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी अपले हवेलीस रामचंद्रराव फडके व गोविंदभट निदसुरे व बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन आणून आलाहिदा अलाहिदा खिलवत करून रामजी पाटील जाधव वकील निा महादजी सिंद्यास बोलाऊन घेऊन सिदेप्रकर्णीची खिळवत अस्तमानपर्येत करून पंत मारनिले संध्येस उठून गेले

छ १३ रोज मंगलवारी रात्र पंतप्रधान प्रात काली बेदार होऊन स्नानसध्या देवपूजन व भोजन करून अराम केला. अडीच प्रहर दिवमास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यांत च्यार घटका बसून चवसर खेळून यैनेमाहलांत जाऊन तीरंदाजी दोनतीन घटका करून रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकिले. नंतर भोजन करून प्रहररात्रपर्यंत गंजिफा व चवसर खेळून आराम करायास माहलात गेले

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी अपले हवेलीस गोविंदभट निदसुरेस बोलाऊन घेऊन दोनतीन घटका खिलवत करून रामजी पाटील जाधव निा माहदजी सिंद्यासी अस्तमानपर्यंत खिलवत जाली. नंतर पंत मारनिले संध्येस उठून गेले

छ १४ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्रात काली बेदार होऊन तालीमखान्यात जाऊन तालमीचे कित्येक हुनर सिकून स्नानसंध्या देवपूजन व भोजन करून अराम केला. अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून स्वारी घोडी फेरायास जायाकरिता सिध करून आणविली. इतकियात प्रजन्य आला म्हणून राव मजमुफानी स्वारी मवकूफ करऊन कागजावर दसखते केली रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. गंजिफा खेळून अराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आपले हवेलीतच तिसरे प्रहरी बसून फडनविसी दसखते दोनतीन घटका कागजावर करून माहादाजीपंत जत्फते व विसाजी भिकाजी जकातदाराचेथे शादीचे मजलसीत जाऊन वस्त्रे देऊन बेलबागांत जाऊन देवदर्शन घेऊन आपले बागात गेले. रात्रौ बागातच भोजन करून बारा घटका रात्रपर्यंत तवाफाचा नाच पाहून हवेलीस गेले.

छ मजकुरी दिवसा व रात्री प्रजन्य अतिशये पडला. बिजली पडून पर्वतीस स्वामी कार्तिकाचे देवलाचा कलस पडला व देवल्यही भंग जाला.

छ १५ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन तालमीचे हुनेर सिकून स्नानसंध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. कागजावर दसखते करून अराम केला अडीच प्रहर दिवसास द्वितीये भोजन करून सात मजली बंगल्यात बसून दुर्बिनीतून जंगलाची व पर्वतीची च्यार घटका सयर करून तीरंदाजी दोनतीन घटका केली. रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले. चवसर खेळून अराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस रामचंद्रराव फडके व गोविंदभट निदसुरे व बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन घेऊन अस्तमानपर्यंत खिलवत करून पंत मारनिले बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन घटका रात्रीस आपले हवेलीस गेले

बालाजीपंत मुनसी वकील निा गाइकवाड व गोपालराव वकील निा फिरंगी गोवेकर छ मजकुरी तिसरे प्रहरी बालाजीपंताचे हवेलीस जाऊन पंत मारनिलेसी आलाहिदा आलाहिदा बोलून आपले मकानास गेले.

छ १६ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन करून भोजन केले. कागजावर दसखतं करून

अराम केला. तिसरे प्रहरी चिंतामणराव फडके व नारो नीलकंठ मुजमदार व सदासिव रघुनाथ व साबाजी नाईक निंबालकर व जाधव वगैरें सरदार व स्वार सातआटश व गाडदी वगैरें जमियेत आणऊन राव मवसूफ घोड्यावर स्वार होऊन पर्वतीनजीक जाऊन दोनतीन घटका घोडी फेरून बोथाटचा खेळून हाथी आणऊन फटेकड्यावर घालऊन दोन घटका तमाशा पाहून हाथीचे किलावियात स्वार होऊन घटका दिवस राहता हवेलीस जाऊन रात्रौ संध्या व भोजन करून कवालाचे गायेन यैकून अरामास माहालात गेले.

बालाजीपंतांनी छ मजकुरी तिसरे प्रहरी आपले हवेलीस रामचंद्रराव फडके व बहिरोपंत मेदल्यास बोलाऊन आणऊन अस्तमानपर्येत खिलवत करून पंत मारनिले रामचंद्र नाईक परांजपे याचे घरी लग्न म्हणून तेथे जाऊन परांजपे मजकुरास वस्त्रें देऊन बेलबागात गेले. विष्णुदर्शन घेऊन दोन घटका रात्रीस आपले हवेलीस गेले.

भवानी शंकर पंत राजआज्ञा लग्न म्हणून बालाजीपंताचे हवेलीस जाऊन पंत मारनिलेस आक्षद देऊन गेले

छ १७ रोज शेनिवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या व देवपूजन करून भोजन केले कागजावर दसखते करून अराम केला. अडीच प्रहर दिवसास बालाजीपंतास दरबारास यण्याविशी सूचना केली होती त्याप्रमाणे पंत मारनिले राव पंतप्रधानाचे हवेलीस जाऊन थोरल चौकातील चापेखणात च्यार घटका बसून दिवाणी फडनविसी दसखते कागजावर करून राव मवसूफ यैनेमहालांत बसले होते तेथे जाऊन अस्तमानपर्येत खिलवत जाली उपरांतिक राव पंतप्रधान बरखास्त होऊन गेले.

(अपूर्ण)

A. R. No. 210

५ मोहरम १२०६ हिजरी
४ सप्टेंबर १७९१

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल तागाईत छ ५ माहे मोहरम मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे विशेष येथील वर्तमान छ १ माहे मजकूर रोज गुरुवार त्रितीये प्रहर दिवसा अखबार पत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान मागील प्रहर दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस याचे येथे सर्वत्र आले होते. मागाहून रा गोविंदभट निरचेऊर व बहिरो रघुनाथ मेहेदले आल्यावर उभयेता व मदारुलमहाम या त्रिवर्गाचे खिलवत मसलतसमंधी वगैरे मागील च्यार घटिका दिवसापासोन ते पाच घटिका रात्रपावेतो जाले. उपरांत निरचेऊर आदिकरून आपलाले घरास गेले आणि प्रहरा रात्रीस मदारुलमहाम आपले येथून निघाले ते बेलबागात जाऊन तेथून परभारा रा बलवंतराव घोठोलेकर याचे घरी गेले. दोन घटिकापर्येत कीर्तन श्रवण केल्यावर माघारा निघाले ते दीढा प्रहरा रात्रीस आपले घरास आले. सरकारवाड्यात त्रितीये प्रहरापासोन च्यार घटिका नाच जाला. नंतर दो घटिका रात्रीस कीर्तनास आरभ होऊन दाहा घटिका रात्री समाप्ती जाली. यैसे प्रतिपदेपासोन नित्यशा होत आहे. श्रुत होय. छ २ रोज शुकुरवारी भाद्रपद शुा ४ स श्रीगणपतीचे उछाहाचा दिवस. त्यास श्रीमंताचे वाड्यात सर्व साहित्याची सिध्धता जाली. दीढा प्रहरा मृत्तिकेचे गणपतीची स्थापना होऊन पूज्याअर्च्या मोठ्या गजेर करून जाली. वीसपंचवीस तोफेचे बार जाले व गारद्याच्या सिलका वगैरे जाल्या या प्रा राजश्री नाना फडनवीस याचे येथे व राजश्री दाजीबा फडके याचे येथे पूज्याविधी येथास्थित जाली. त्रितीये प्रहरी श्रीमंत आपले वाड्यातून निघाले ते राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात

आले. श्री (गण)पतीचे दर्शण घेऊन अैनेमाहालात दोन घटिका बैठक जाली. मदारुलमहाम याणी श्रीमंतास पोशाक हिरवा वऱ्हानपुरी दिल्हा. अतर पानदान व सर्वास विडे व फुलांचे हार व गजरे यैसे दिल्हे यावर श्रीमंत तेथून निघाले ते आइतवार पेठेत राजश्री दाजीबा फडके याचे हावेलीस गेले. मदारुलमाहाम समागमेच होते. तेथे देवदर्शण जाल्यावर येक घटिका स्थिर जाले. तेव्हा फडके मजकूर याणी श्रीमंतास कुसंबी पोशाक दिल्हा. आतर पानदान इत्यादिक मुदारतीचे साहित्य सर्वास पावल्यावर, श्रीमंत तेथून निघाले ते कमट्यात श्री गणपतीचे देवाल्ये आहे त्याचे दर्शणास येऊन, नंतर तैसेच आपले वाड्यात माघारा गेले. राजश्री नाना फडनवीस व दाजीबा फडके आदिकरून सर्वत्र सरदार सरकारवाड्यात येऊन गणपतीचे दिवानखान्यात श्रीमंत जाऊन बसल्यावर नाच व गायेनादिक तीन घटिकापर्यंत जाले. नंतर सर्वास विडे दिल्ह्यावर मदारुलमहाम वगैरे आज्ञा घेऊन निघाले ते आपलाले घरास माघारा आले. रात्रौ श्रीमंताचे वाड्यात व मदारुलमहाम व दाजीबा फडके वगैरे याचे घरी कीर्तन जाले. घासीराम कोतवाल मेला. गेला त्याचे कलेवर गारपीरापलीकडे दोन दिवस तैसेच पडले होते आग्निसंस्कार जाला नाही तेव्हा सरकारची परवानगी मोठ्या रदबदली करून जाली. पाच मन लाकडे देविली

२

मारनिलेचा मेहुना वगैरे पाचसात जने जाऊन घासीरामाचे शरीर आग्नीत घातले मारनिलेची स्त्री व दोघे पुत्र व सुना व मेहुने व कारकून व दिवान कारभारी व जासूद व प्यादे यैसे दरोबस्त कैद केले आहेत त्यात दोघे पुत्राचे व दिवान कारभारी वगैरे जे जे अग्रसर का(मा)काजात होते त्याचे पायांत शकळ्या घातल्या. (घरास) ताळा पेशजीच जाला आहे. त्याची आता मौजुदाद व द(रो)बस्त चोकशी होत आहे. चौकसीचे आन्वये जे जे ठिकानी पडेल तेथवर सरकारात जप्त होईल तूर्त कोतवालीचे कामाची देखरेख रा रावो विस्वनाथ गोडबोले याजकडे सागितली आहे.

पुढे निवल जाल्यावर कोण्हाकडे निश्चंये होऊन कामकाज सागतील ते पाहावे. घामीराम याचे अविच्यार वर्तनुकीचा विच्यार केवलच अघटित होता. त्याचा विस्तार आता सर्वांस जाहिरा समजल्यात येऊ लागला. पापाचरण अतिपयेसी केले. ते आजपर्येत लोटले गेले. सेवटी उघड जाले तेव्हा माारनिलेचे कोठे ठिकान राहिले नाही. चौकसी होत आहे. माद्यंत पकेपणे ध्यानास आल्यावर सेवेसी लेखण केले जाईल. तळघरात चौतीसा ब्रांम्हणापैकी बारा ब्रांम्हण सजीव राहिले होते. त्यात पाच ब्रांम्हण व येक ब्रांम्हण स्त्री यैसी साहाजने मेली. येकूण पहिले व हालीचे मिलोन सतावीस जीव मृत्य पावले. आणखी काये होईल ते न कले. श्रुत होये. छ ३ रोज शनवारी मागील प्रहर दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस आपले येथून निघाले ते सरकारवाड्यात गेले. आर्शेमाहालात येक घटिका बसोन कागदापत्रावर तेरखा वगैरे केल्या तो श्रीमंत तेथे आले. तैसेच बंगल्यावर गेले. मदारुलमहामही तेथे जाऊन अर्ध घटिका उभयेताचे खिलवत जाले. नतर श्रीमंत व रो। नाना फडनवीस गणपतीचे दिवानखान्यात आले. नाचाची शुरवात जाली होती. त्यास राजश्री महाराव निंबालकर व व्यंकटराव घोरपडे व खंडेराव वोढेकर व रामजी पाटील जाधव वकील निा। सिंदे व पानसे व खासगींवाले व यादोराव मोरेश्वर आदिकरून सरदार मानकरी व मुत्सदी व दरकदार व सुभे यैसे बोलाविले होते. सांप्रदाया प्रो। दस्तूरच्या यादी सालाबाद नावनिसीवार जाऊन त्या प्रो। सर्वत्र बोलावण्याचे आंन्वये येतात. त्यास सदरहू प्रो। तेथे आले होते. च्यार घटिका नाच जाला आतर पानदान व विडे सर्वांस दिल्हे. नंतर मागील दोन घटिका दिवस शेष राहाता निंबालकर आदिकरून आपलाले घरास गेले. मदारुलमहाम आपले वाड्यांत आल्यावर वो। रो। गोविंदभट निरचेऊर यासी बोलाऊन साइंकालपर्येत त्यासी भाषण केले. नंतर सहा घटिका रात्रीस राजश्री नाना फडनवीस आपले येथोन निघोन राजश्री दाजीबा फडके याचे येथे कथा श्रवण करावयांकरिता गेलें. दोन घटिका

नंतर माघारा निघाले ते आपले घरास आले. श्रुत होये. छ ४ रोज रविवारी प्राथःकाली श्रीमंताची स्वारी आपले वाड्यातून निघोन मौजे भामरड्यास गेले. शामसुंदर हाती मस्त तेथे बांधविला आहे. त्याजला सोडऊन त्याचे माहोताकडौन त्या हाती फेरविले. नंतर श्रीमंताणी दोन घटिका तेथे घोडी फेरून माघारा निघाले. ते प्रहरा दिवसा आपले वाड्यात येऊन दाखल जाले. त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे येथे सर्वत्र आले. रो। बहिरोपंत मेहेंदले येऊन त्यांसी दोन घटिका खिलवत जाले. उपरांत राजश्री नाना आपले येथून (निघोन) सरकारवाड्यात गेले ते आर्शेमाहालात अर्ध घटिका बसोन कागदपत्र जरुरियात केले. श्रीमंतही तेथे आले होते तो तसेच बंगल्यावर जाऊन श्रीमंत व मदारुलमहाम याचें भाषण होत होते. रो। मानाजी सिंदे फाकडे याजला राजश्री दाजीबा फडके याणी आपले येथून बोलाऊ पाठविले की नाचास यावे. यैसियासी सिंदे मजकूर

३

याचे समजल्यात आले की सरकारवाड्यातील बोलावणे आहे. सबब सिंदे मा।र वाड्यात येऊन आर्शेमाहालात आले. हे वर्तमान विदित जाल्यावर श्रीमंत व मदारुलमहाम बंगल्यावरून तेथे आले. सिंदे मा।र यासी भाषण वरचेवर जाले. नंतर आतर पानदान दिल्हे. ते घेऊन रा। मानाजी फाकडे माघारा आज्ञा घेऊन निघाले ते फडके मा।र याचे येथे येऊन नंतर आपले ठिकानास भवानी पेठेत गेले. श्रीमंत व रा। नाना मागती बंगल्यावर जाऊन येक घटिका बोलणे जाले. रोज मा।री पंडित व शास्त्री यास बोलाविले होते. त्याजकडून ते समस्त येऊन गणपतीचे दिवानखाण्यात सभा जाली. तेथे श्रीमंत व मदारुलमहाम गेले. च्यार घटिकापर्यंत नाच जाला. सर्वास सुगंध द्रव्ये येथास्थित देऊन नंतर श्रीमंत उठोन देवग्रहात गेले आणि राजश्री नाना आपले घरास आले तो बहिरोपंत मेहेंदले व गोविंदभट निरचेऊर बसलेच होते. त्यासी बोलणे साइंकालपर्येत होऊन सर्वत्र माघारा गेले. राजश्री

मंल्हारराव होलकर छ २ माहे मार रोज शुकुरवारी वाफगावीहून बाहेर येऊन राजश्री रंगराव त्रिंबक राजेबहादर यासी भेटले. रा भगवंतराव बलाल दिवान पूर्वीच लस्करात आला होता. होलकर मजकूर आल्यावर इथःपर येथे यावे. त्यांसी सिंदी वगैरे गारद होलकरापासी चाकर आहे. त्याणी आपले तलबेकरिता गौगंवा केला. हे वर्तमान सविस्तर राजेबहादर याणी येथे लेहून पाठविले. त्याचे उतर गेले की गारदी वगैरे याचा हिसेब करून तुम्ही हावाला घ्यावा. त्याजवरून हिसेब होत आहे. काही यैवजही येथून रंगरावजीकडे रवाना जाला. काल छ ३ रोज शनवारी होलकर मार यास रंगराव याणी मेजमानी केली. येका दो दिवसात सिबंदीचे लोकाचा निकाल पडल्यावर होलकर याजला घेऊन रंगराव वगैरे फौज येथे सत्वरच येणार. होलकर रंगरावजीचे लस्कराजवलच उतरले आहेत. वाफगावी बज्याबा वगैरे दोन-तीनसे स्वार ठेविले आहेत. या प्रो होलकराकडील वर्तमान आहे. घासीराम कोतवाल याचा भाऊ शहर अवरंगाबादेस होता. तो काल येथे आला. त्याजलाही कैद केले. नित्यशा मारनिलेचे वस्तभाव वगैरेची चौकसी होत आहे. साठ हाजार रुपये हाली सिका व चालीस हाजार रुपये सिका चादवड व च्यार हाजार मोहोरा यासिवाये सोणे व रुपे याचे डागिने व बाहेर सावकाऱ्यात वगैरे अमानती या प्रो मारनिलेचे येथे निघाले. आणखी शोध कर्ता काये काये जे ठिकानी लागेल ते न कले कंण्यागत समाप्त होत आला यास्तव कृष्णांश्नानास श्रीमंत जातात. द्वादसीराह त्रयोदसी रोज शुकुरवारचे मुहूर्त आहे. राजश्री नाना फडनवीस हेही स्वारी-बराबर जाणार म्हणौन वर्तमान आहे. येक वर्तमान की श्रीमंतच जातात, मदारुलमहाम तूर्त जात नाहीत. यैसी दोण्हीही वर्तमाने आहेत. याचा निश्चये अद्यापि जाला नाही. आजउद्यात सिध्धांत जाल्यावर ध्यानास येईल. सारांष, स्वारी कृष्णांश्नानास जात आहे यात गुंता नाही. पुढे आस्विन मासी पौर्णिमेस चद्र-ग्रहण आहे. हेही सध्धी आहे. स्वारी मास पक्ष बाहेर राहून

कृष्णांश्नान व धुम महाबळेश्वर इत्यादिक देवदर्शण करावयास जाणार यैसी वदंता दाट आहे. रोज मारी च्यार घटिका रात्रीस श्रीमंत आपले वाड्यातून निघाले ते राजश्री दाजीबा फडके याचे येथे गेले. मागाहून मदारुलमहाम बेलबाग करून तेथे आले तीन घटिकापर्येत बैठक होऊन कीर्तन श्रवण केले. नंतर आतर पानदान घेऊन तेथून श्रीमत माघारा निघाले ते सात घटिका रात्र होता आपले वाड्यात आले. उपरांत वाड्यातील कीर्तनाची समाप्ती जाली मदारुलमहाम फडके याचे येथून निघोन रा। नारो नीलकंठ मजमदार व जिवबा चिटणीस व दादा गद्रे याचे येथे जाऊन कीर्तन श्रवणानंतर अकरा घटिका रात्रीस आपले घरास माघारा आले. श्रुत होये. याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्या-नास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञापना.

---

A. R. No. 211

१० जमादिलावल १२०६ हिजरी
५ जानेवारी १७९२

श्री

पोष्य बळवंतराव नागनाथ सा। नमस्कार. विज्ञापना जें येथील वर्तमान ता। छ १० माहे जावल पौष्य शुध द्वादसी गुरुवासरपर्येत वास्तव्य पुणे येथे स्वामीचे कृपेकरून स्वस्थ जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ ४ माहे मारी सरकारचे डाकेवर हुजूर आर्जी आखबार व नवाब आजमलउमरा बाहादर स्वामीचे सेवेसी विनतीपत्र पाठविले ते पाऊन ते सविस्तार वर्तमान श्रुत जालें असेल सांप्रत छ १० रोजपर्येत वर्तमान लिहून साप्रदायाप्रमाणें पत्राची रवानगी केली आहे पत्रावलोक्नी विस्तार वर्तमान ध्यानारूढ होईल. सेवेसी श्रुत होये. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

A. R. No. 212

१ जमादिलाखर १२०६ हिजरी
२६ जानेवारी १७९२

पैा छ १३ जाखर

श्रीनिवास

श्रीमंत राजश्री राज्याजी स्वामीचे सेवेसी

पो। हायेपतीराये गोपाल सां। नमस्कार. विनंती उपरी यथील कुशल माघ शुध्ध ३ त्रितीया छ १ जमादिसानी गुरुवार यथास्थित जाणौन स्वकीय कुशल लेखन करीत असावें. विशेप चिरंजीव राजश्री राजे रघोत्तमरायेदादा याची पत्रं पानगलीहून चिरंजीव राजश्री नारायेणरायबापू याजकडें दुर्गास पां। तें पत्र बापूनी खेडास पाठविली. त्या पत्राचें प्रत्योत्तर चिरंजीव राजश्रीचे नावे लिफाफा करोन पाठविला आहे. कृपा करोन सरकारचे डाके बोार रवाणा करोन द्यावा पूर्वी मदनूरचे मार्ग चिरंजीव राजश्रीचे नांवच पत्र लिफाफा आपले सेवेसी पाठविला होता तो चिरंजीवाकडं रवाना जाहला असेल. बहुत काय लिहिणं, कृपावृधी करावी हे विनती.

---

A. R. No. 213

२ रजब १२०६ हिजरी
२५ फेब्रुवारी १७९२

श्री

विनंती विज्ञापना अैसी जे येथील कुशल तागाईत छ २ माहे रजब मुकाम पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशाप येथील वर्तमान छ २८ माहे जमादिलाखर रोज बुधवारी प्रथम प्रहर दिवसा आख-बारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर येथील वर्तमान त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे यथे रा। सदाशिव दिनकर वकील आले होते त्याणी राजश्री नानासी दोन घटिका भाषण केले. नंतर मामलत-आजमास वगैरे कागदपत्र अवलोकण होऊन राजश्री दाजीबा फडके संमधी दरकदार दफ्तरचे व मामलतदार येऊन दोन घटिका माहलचे

याचे व मदारुलमहाम याचे खिलवत साइकालपर्यंत होऊन सर्वत्र आपलाले घरास गेले. प्रहरा रात्रीस मदारुलमहाम आपले येथून निघाले ते रा बापू मोघे याचे घरी कीर्तन श्रवणास गेले होते ते आकरा घटिका रात्रीस माघारे आपले येथे आले. रोज मारी मागील पाच घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत रमन्यात गेले होते. ते दो घटिका रात्रीस माघारे आपले वाड्यात येऊन दाखल जाले. श्रुत होये. छ २९ माहे जागखर रोज गुरुवारी मागील प्रहर दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस निद्रा करून उठिले ते बेलबागात जाऊन देवदर्शण करून आपले घरास आले. मुत्सदी व दरकदार आदिकरून सर्वत्र मदारुल-महाम याचे वाड्यात आलें होते. राजश्री व्यंकटराव घोरपडे येऊन राजश्री नानासी भाषण करून वरचेवर माघारे गेले नंतर मदारुल-महाम याणी कागदपत्र दोन घटिका केले. यावर मागील तीन घटिका दिवस शेष राहाता पानगलची डाक आली होती ते पत्रे रा आपाजी कोंडाजी याणी आणौन दिल्हयावर मदारुलमहाम याणी ते पत्रे वाचून उपरात रा बहिरोपंत मेहेदले यासी बोलणे तीन घटिका-पर्येत होऊन घटिका रात्रीस सर्वत्र माघारे गेले. श्रुत होये छ १ माहे रजब रोज शुक्रवारी आंमृतसिध्धीयोगावर राजश्री नाना फडनवीस याचे कनिष्ट स्त्रीचे फलशोभन जाहाले स्त्रीस रज्योदर्शण जाल्यास तो दिवसगत जाले परंतु रुतुशांती केली नाही. कारण की वो राजश्री शंकर जोसी राजश्री नाना फडनवीस याजपासी आहेत. ते ज्योतिषविद्येत बहुत निपुन आहेत. त्याणी नेग मागितला होता त्या प्रो शांतीचा विधी करावा ऐसे होते. साप्रत महूर्तांची सध्धी जोसी मार याचे विच्यारास आली आणि रुतूचा योगही घडून आला म्हणौन कालपूर्व दिवसी



शांतीचे हावण मात्र केले आणि आज गर्भाधानविधीचा निश्चये जाला होता त्या प्रो प्रथम प्रहर दिवसात फलशोभन जाले. राजश्री दाजीबा फडके व बाबूराव केशव व दादा गजरे व मेहेदले

आदिकरून सर्वत्र विधीप्रसंगाचे समई आले होते. सर्वही आहेर आणिले होते. परंतु राजश्री नाना फडनवीस याणी आपले श्वशुराचा आहेर मात्र घेतला. वरकड आणखी कोणाचा आहेर येकरूप घेतलाच नाही. राजश्री दाजीबा फडके वगैरे याणी विच्यारून पाहिले. परतु नकाराचेच उतर जाले. आठदाहा घटिकापर्येत शांतीचा समारभ येथास्थित जाल्यावर सर्वत्रास विडे दिल्हे. नंतर फडके आदिकरून आपलाले घरास गेले. त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे वाड्यात मुतसदी व दरकदार व सुभे मामलतदार आले होते. राजश्री रंगराव त्रिबकराव राजे बहादुर आले होते. त्यासी येक घटिका भापण जाल्यावर बाहादर मार माघारे गेले नंतर काही कागदपत्र तेरखा वगैरे करून दिल्हे. उपरांत मागील च्यार घटिका दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस आपले येथून निघाले ते सरकारवाड्यात जाऊन आर्शमाहालाच बंगल्यावर गेले. श्रीमंत तेथेच होते तेव्हा मदारुल याणी श्रीमंतासी अर्ध घटिका वरचेवर भापण केले तो रमन्यात स्वारी जावयाची सिध्धता जाली होती तेव्हा तीन घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत बगल्यावरून उतरोन आपले वाड्याबाहेर निघाले ते रमन्यात गेले आणि मदारुलमहाम तेथून आपले घरास आले तो रा माहादाजीपंत काले, कारभारी दिा सुभा वसई, प्रांत कोकण, याजला बोलाऊन रत्न-गिरी तालोक्याचे तफावतीचे बोलणे आस्तमितपर्येत जाले व किर-कोली लोकाची बोलणी जरूरयातीची होणे होती तेही थोडीबहुत जाहाली. सांझकाली सर्वत्र माघारे आपलाले घरास गेले ते राजश्री माहादजी सिंदे उज्यनीहून तीसा कोसावर होते ते बारापध्रा कोस देवाशास आले. तेथे रा कृष्णाजी पवार याचे घरी मेजमानी होणार. नंतर मजल दर मजल पुढे येऊन हुताशणी बऱ्हानपूरचे शुमारास करतील. महेश्वरावरून आंहिल्याबाईची भेट घेऊन येणार. येक वर्तमान की परभाराच येणार. मग पाहावे कोणत्या मार्गे येतात. दक्षणेकडील वर्तमान राजश्री परशराम रामचंद्र कूच करून पटनाकडे आले. वीसा कोसाचा नफावत राजश्री हरिपंततात्यासी राहिला होता म्हणौन पत्रे आली होती. श्रुत होये. याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान

ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. वहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञापना.

---

**A. R. No. 214**

९ रजब १२०६ हिजरी
३ मार्च १७९२

श्री

विनंती विज्ञापना ऐसी जे येथील कुशल तागाईत छ ९ माहे रजब मुकाम पुणे स्वामीचे कृपावकनेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखण आज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २ माहे मजकूर रोज शनवारी प्रथम प्रहर दिवसा आखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनतर येथील वर्तमान त्रितीय प्रहरी मदारुलमहाम यांचे वाड्यात राजश्री बाबा फडके व बाबूराव केशव आदिकरून मुत्सदी व दरकदार वगैरे आले होते. दोन घटिका दफ्तरचे कामकाज जाल्यावर छ २५ माहे जमादिलाखरची पानगलची डाकेची पत्रे आली ते मदारुलमहाम याणी वाचून पाहिल्यानंतर रा बहिरो रघुनाथ मेहेंदले याजला बोलाऊन आस्तमिनपर्येत मसलतप्रकर्णी खिलवत करून साइकाली राजश्री नाना बेलबागात जाऊन दो घटिका रात्रीस माघारे आपले घरास आले. पत्राचा भाव ध्यानास आला की पटनावर छ १० माहे जाखरीस टिपूसी व आपले फौजेसी लढाई मातबर जाली. टिपूने सिकस्त खाऊन मागे निघोन गेला पटनानजीक बातेऱ्या होत्या त्या आपले फौजेने घेऊन तेथे मोरचे कायम केले. या प्रो वर्तमान पानगलास आले. खुर्मीच्या तोफा जाल्या ईस्वरसतेकरून शत्रूचे पारपत्य लौकरच व्हावे ऐसे वर्तमान आले परंतु राजश्री हरिपंत फडके याची पत्रे आद्यापि आली नाहीत. श्रुत होये छ ३ रोज रविवारी राजश्री नाना फडनवीस बंगल्याचे बागात प्राथकालीच भोजनास गेले. स्नानसंध्यादि

तेथेच करून दीढा प्रहरा भोजने जाली. पानदान विडे घेऊन माघारें येताना बेलबाग करून दो प्रहरा आपले घरास आले. त्रितीये प्रहरी राजश्री नाना आपले यथून निघाले ते सरकारवाड्यात गेले. ते आर्शे-माहालाचे बंगल्यावर गेले. तेथे राजश्री बालाजीपंत ढेकने दिा रास्ते याजला बोलाऊन दोन घटिका त्यासी बोलणे जाले. श्रीमंताची स्वारी कृष्णांस्नानास वांईस गेली होती. तेसमई रास्ते याणी दोन लक्ष रुपये नजर द्यावयाचे भाषणात आणिले आहे. तेविसीचे मारनिलेसी बोलोन माघारे मारनिले गेले. उपरांत रा बहिरोपंत मेहेदले व राघो विस्व-नाथ गोडबोले यांसी आस्तमितपावेतो खिलवत होऊन मदारुलमहाम साइंकाली आपले घरास आले. मागील पाच घटि दिवस राहाता श्रीमंत रमन्यात गेले होते. घोडी फिरविल्यावर हातीचा तमाशा दोन घटिका पाहिला. नंतर तेथून स्वारी माघारे निघोन दो घटिका रात्रीस आपले वाड्यात आले. शृत होये. छ ४ रोज सोमवारी श्रीबनेश्वर माहादेव येथून बारा कोस आहे त्याचे दर्शणास श्रीमंताची स्वारी जावयाची रोज मारचा नेम जाला होता त्याजवरून डेरे राहुट्या वगैरे सरंजाम काल पूर्व दिवसी येथून रवाना होऊन तेथे तरतूद जाली. हाती व रथ व घोडी याच्या डाका जागा जागा बसविल्या की आजच स्वारी तेथे जाऊन माघारे यावे म्हणौन मागील प्रहर साहा घटिका रात्रीपासोन स्वारीची तयारी

२

जाली. च्यार घटिका रात्र शेष राहाता श्रीमंत आपलें (वा) ड्यातून निघोन आंबारीत स्वार जाले. खवासीत रा दाजीबा फडके होते. राजश्री नारो नीलकंठ मजमदार व त्रिबकराव चिटणीस व सदासिब रघुनाथ गजरे व व्यंकटराव घोरपडे व व्यंकटराव रास्ते व पेठे व पानसे आदिकरून मुत्सदी व सरदार सरंजामी मिलोन दोनतीन हाजार स्वार व दोन हाजार गारद वगैरे सरंजाम स्वारीबराबर होता. कातरजचे घाठाने स्वारी जाऊन साहा घटिका दिवस येता श्रीमंत बनेश्वरी दाखल जाले तेथे स्नानसंध्या जाल्यावर दीढा प्रहरा भोजने

जाली. मुत्सदी व दरकदार व मानकरी मऱ्हाटे सरदार पंचवीस चालीस येकूण शंभर पात्र भोजनास जाले. नंतर पानदान विडे सर्वास दिल्हे. दोन घटि बैठक होऊन दो प्रहरा श्रीमंत तेथून माघारे निघाले ते डाकेवर हाती व रथ व घोडे स्वारीस ठेविले होते त्याजवर बसोन कातरजचे तल्यावर आले. तेथे बागात द्वितीये समईचे भोजन त्रितीये प्रहरी जाले. तल्याचा तमासा पाहिला. उपरात आंबारीत बसोन निघाले ते मागील तीन घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत आपले वाड्यात येऊन दाखल जाले. श्रीबनेश्वर माहादेव याजपासी श्रीमंताणी येक मोहोर व येक श्रीफळ ठेविले मदारुलमहाम येथेच होते. त्रितीये प्रहरी राजश्री नाना फडनवीस याचे वाड्यात सर्वत्र आले होते. कागदापत्रा-वर लेखा वगैरे कामकाज होऊन मागील च्यार घटिका दिवस राहाता मदारुलमहाम आपले घरीहून निघाले ते सदासिव पेठेत राजश्री सदा-सिवभट दांड्ये याचे येथे लग्नाचे मेजमानीस गेले. दान्ये मार याणी राजश्री नानास बऱ्हानपुरी आबासी रंगाचा पोशाक दिल्हा नाच जाल्या आतर पानदान घेऊन निघाले ते व्यंकटराव दाभोलकर याचे घरी मेजमानीस आले. तेथे मारनिलेनी मदारुलमहाम यांस केसरी पोशाक दिल्हा. आतर पानदान जाल्यावर माघारे निघाले ते आपले नवे वाड्यात येऊन तेथे संध्या केली. उपरांत बेलबागात देवदर्शण घेऊन निघाले ते घटिका रात्र होता आपले वाड्यात आले. शुन होये. छ ५ रोज मंगल-वारी मागील साहा घटिका दिवस शेष राहाता मदारुलमहाम याचे वाड्यात मिस्तर माल्लिट वकील व दुसरा मेस्तर असामी येक व नुरुदी हुसेनखा दुभासिया वगैरे आले. कारण की छ १० माहे जाखरची लढाई पटनावर जाल्याची पत्रे इग्रेजाची आली सबब वकील मार पत्रे घेऊन वर्तमान सागावयासी आले. मदारुलमहाम यास पत्राचे वर्तमान निवेदन केले. उपरांत मदारुलमहाम व बहिरोपंत मेहेदले व मेस्तर मार व दुभासिया यैसे बसोन च्यार घटिकापर्येत मसलतप्रकर्णी खिलवत जाले. यावर मागील दोन घटिका दिवस शेष राहाता वकील मार वगैरे माघारे निघोन आपले ठिकानास गेले उपरांत राजश्री नाना फडनवीस आपले येथून निघाले ते रा बालाजी हरी भिडे याचे येथे

मेजमानीस गेले. भिडे मार याणी मदारुलमहाम यांस आंबासी पोशाक दिल्हा. येक घटिका नाच जाला. आतर पानदान घेऊन माघारे निघाले ते बेलबागात येऊन देवदर्शण घेतलें आणि घटिका रात्र जाली तो आपले घरास आले. पाचा घटिका रात्रीस भोजन जाले. उपरांत माहावीरें आमलात मदारुलमहाम मागती आपले येथून निघाले ते राजश्री बापूजी बलाल लेले, फडचे सरदफतरदार याचे घरी लग्न मार्गनिलेचेच पेशजी जाले आहे सबब त्याचे

३

येथे मेजमानीस गेले. लेले मजकूर याणी मदारुलमहाम यास कंदी पोशाक दिल्हा व वो राजश्री गोविंदभट निरचेऊर यास सेला पागोटे दिल्हे नाच दोन घटिका जाला. अतर पानदान घेऊन माघारे निघाले ते नव घटिका रात्रीस आपले वाड्यात आले. शृत होये. छ६ रोज बुधवारी मागील सात घटिका दिवस राहाता राजश्री नाना फडनवीस आपले येथून निघोन सरकारवाड्यात गेले. रोज मारी मिस्तर मालिट वकील निा इंग्रेज कलकतेकर याचे येण्याचा निश्चय ठैरला होता. त्याजवरून गणपतीचे दिवानखान्यात बैठक जाली. मदारुलमहाम तेथे गेले. गोविंदहिरो रघुनाथ मेहेंदले व जरूरियात मंडली दरकदार वगैरे तेथे आले. यावर पाच घटिका दिवस शेष राहाता मिस्तर मालिट वकील व च्यार असामी मिस्तर आणखी व नुरदी हुसेनखा वगैर येमे दिवानखान्यात आले. तेव्हा मदारुलमहाम यासी व वकील मार व दुभाषिया व मेहेंदले यासी दक्षण प्रांती छ १० माहे जाखरीस लढाई जाली तेविसीचे बोलणे होत आहे तो श्रीमंत तेथे आले. लढाई जाल्याची पत्रे इंग्रेजाची आली होती त्याचे वर्तमान वकील मार याणे श्रीमंतास विदित केले नौदावे तेरखीस लालबाग घेतला. पटनाजवल बानेच्या होन्या त्या घेऊन आपले मोरचे पटनास लागू जाले. टिपूची सिकस्त जाली मागे हाटून गेला म्हणौन आपल्याकडील फते जाल्याचें वर्तमान आले ते श्रीमंतास वकील माराणे निवेदन केले. त्याजवरून इग्रेजाचे वकीलाची खातरपाश, सबब पंनास तोफा खुसीच्या सोडावयाची परवानगी

जाली. आज्ञे प्रा पानसे याणी सदरहू पंनास तोफा सोडिल्या. दोन घटिका वकील याची बैठक जाली. आतर पानदान दिल्ह्यावर मार-निले रुकसत घेऊन आपले ठिकानास माघारे गेला. स्वारी रमन्यात जावयाची तयारी जाली होती. मागील तीन घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत रमन्यात गेले होते ते दोन घटिका रात्रीस माघारे येऊन आपले वाड्यात दाखल जाले. मदारुल्महाम सरकारवाड्यातून निघाले ते गावातील ग्रहस्त मंडली राजश्री कृष्णाजी भयेराव थते वगैरे याचे माहा सात घराश जाऊन लग्नाचे आहेर केले आणि बेलबागात येऊन दो घटिका रात्रीस आपले घरास माघारे आले. कैलासवासी दादासाहेब याचे दतपुत्र राजश्री आंमृतराव कोपरगावी आहेत. त्याची स्त्री कार्तिक मासी निवर्तली. द्वितीये संमध करावयाचा म्हणौन वधू येथून त्याजयास कारकून व पचवीस स्वार वगैरे सरजाम घेऊन कोपरगावीहून येथे आले होते ते वधूस घेऊन रोज मार्गी कोपरगावास गेले. त्याज बरोबर सरकारचा कारकून व गारदी वगैरे दिल्हे आणि रवाना केले. शन हाये छ ७ रो गुरुवारी त्रितीये प्रहरी मदारुल्महाम याचे येथे राजश्री रंगराव त्रिबक राजे बहादर व दाजीबा व बाबा फडके व बहिरोपत मेहेंदले व धारराव सिंदे आदिकरून मुत्सदी व दरकदार वगैरे सर्वत्र आले होते. राजश्री तुकोजी होलकर याणी मुकाम देवासनजीक जैपूर येथून विलायेती मेवे जातच्या वहग्या श्रीमंतास व मदारुल्महाम यास पाठविल्या. दालिबे व बिदाना आगूर व सेव व नासपाती वगैरे मेवा पाठविला तो राजश्री दादाजी गंगाधर दिवान दिा मारनिले याणी श्रीमंतास डाल्या व राजश्री नाना फडनवीस यास डाल्या येणे प्रा प्रविष्ट केल्या व कंबू जनावर येक पाठविले आहे ते व मेवा येणे श्रीमंताचे नजर गुजरानिले. राजश्री माहाराव निबाल्कर मदारुल्महाम याचे भेटीस आले होते. भेट घेऊन पानदान विडे दिल्ह्यावर निबाल्कर मार वस्त्रेवर माहावारीचे यैवजाविसीची सूचनार्थ बोलोन माघारे आपले हावेलीस गेले. साइंकालपर्यंत लोकाची कामकाजे होऊन सर्वत्र आपलाले घरास गेले आणि राजश्री नाना बेलबाग करून दो घटिका रात्रीस आपले घरास आले. रोज मारी श्रीमंत रमन्यात गेले होते. तेथे

घोडी फिरविल्यावर हातीचा व हारणे रमन्यातील आणऊन त्याचा तमाशा पाहिला. नंतर साइंकाली श्रीमंत तेथून माघारा निघाले ते तिमरे घटिकेचे आमलात आपले वाड्यात दाखल जाले. किले राजमाची येथील किल्याचा हवालदार येथे आला आहे. त्यास मा।।रनिलेने सेला पागोटे पैठनी देऊन मदारुलमहाम याची भेट घेनली.

४

श्रुत होये. छ८ रोज शुकुरवारी बंगल्याचे बागात मिस्तर माल्टि, वकील इंग्रेज कलकतेकर याजकडील, याजला गुलाला पाहावयासी बोलाविले. होते सबब राजश्री नाना फडनवीस सात घटिका दिवस मागील राहा (ता) बंगल्याचे बागात गेले. रो।। बहिरो रघुनाथ मेहेंदले याजला बोलाऊन आनिल्यावर मागील सा घटिका दिवस राहाता मिस्तर मालिट वकील वगैरे मिस्तर आसामी पाच व नुरदीहुसेनखा यैसे बागात आले. तथे बैठक होऊन नाचाची शुरवात जाली. मेवेजात जिनस वकील मा।।राकडे देविली. आतर पानदान जाले. मदारुलमहाम याणी मिस्तर मालिट वकील यास हिऱ्याची आंगोठी १ येक दिल्ही. च्यार घटिका नाच वगैरे या प्रे।। जाले व गुलांला याचे तखियाजवल बैठक जाली होती. सदरहू तरतूत फार चागलीच करविली होती. मागील शेष दोन घटिका दिवस राहाता मिस्तर मजकूर रुकसत घेऊन तेथून निघाले ते आपले ठिकानास गेले. नंतर राजश्री नाना फडनवीस बागातून निघोन नवे वाड्यात आले. संध्या करून देवदर्शण बेलबागात घेतले. उपरांत दोन घटिका रात्र होता माघारे निघाले ते आपले वाड्यात आले. राजश्री माहादजी सिंदे नर्मदातीरास आले आहेत. हांडियाचे घाटे आशेरीस येणार. आशेर किला पाहून हुनाशनी शहर ब-हानपूर येथे करावी, नंतर मजल दर मजल इकडे यावे. सिंदे याज बोरोबर दाहा हाजार फौज वगैरे सरंजाम आहे. इकडे येऊन पुण्यास श्रीमंताचे भेटीस यावयाचा निश्चंये ठैरल ते ध्यानास आल्यावर मागाहून सेवेसी लेखण केले जाईल. श्रुत होये. सदैव कृपा करून आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. आपणापासी आज्ञा घेऊन स्वार

जालो ते काल छ ८ माहे मजकूर रोज शुकुरवारी येथे पुणियास येऊन पोहोचलो. येका दो दिवसानी श्रीमंताची व मदारूलमहाम याची भेट घेतो. येथील प्रसंगाचे वर्तमान सविस्तर आखबारपत्रा व रून ध्यानास येईल. याउपर प्रसंगीचे वर्तमान सेवेसी लेखण केले जाईल. सांप्रदाया-प्रो हुजूरचे जवाबी इनायेतनामे सादर होत असावे व आपणास विनती-पत्रे पा। आहेत याची उतरे आज्ञापत्री सादर होत असावी बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञापना.

---

**A. R. No. 215** मुमारें २० शवाल १२०६ हिजरी
११ जून १७९२

(आरंभीची पाने अनुपलब्ध)

५

घटिका दिवस राहाता राजश्री आपा बलवंत तेथे आले ते खिल-वतात दाखल जाले या प्रो येक घटिका रात्रपर्यंत बोलणे होऊन नतर फडके आदिकरून आपलाले घरास गेले. रोज मारी मागील पाच घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत रमन्यात गेले तेथे घोडी फिरविली व हांती सोडविले होत त्याचा तमाशा पाहून अस्तमिति स्वारी तेथून माघारा निघोन घटिका रात्र होता श्रीमंत आपले वाड्यात दाखल जाले. राजश्री माहादजी सिंदे याणि कोरेगावीहून कूच करून निघाले ते नव कोस येऊन पुण्याबाहेर मुळामुठा नदीचे पलिकडे लस्करचा मुकाम करून राहिले. छ २२ माहे मार रोज बुधवारी मागील पाच घटिका दिवस शेष राहाता श्रीमताच्या व सिंदे मजकूर याच्या भेटी व्हावयाचा निश्चये जाहाला आहे त्या प्रो ते दिवसी भेटी होतील. सिंदे मार याजबरोबर च्यारपाच हाजार स्वार व तीनच्यार पलटने येकून आजमासे फौज आठदाहा हाजार व सिवाये किरकोली बाहिर-बुनगे आहे. तोफखाना पंनाससाट तोफा जिलेबी व मोटया. त्यापैकी

चवदा तोफा हाली बराबर आल्या आहेत. वरकड मागाहून येणार राजश्री राजे कल्याणराव निबालकर व बाबाराव वकील हेही सिदे याचेसमागमे आले आहेत. उदईक भेटीचा समारंभ होईल तेव्हा मागाहून सविस्तर वर्तमान सेवेसी लेखण केले जाईल. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याजकडील फौज पाच हाजार कर्नाटकचे मोहिमीस बराबर होती त्यास मोहीम फते होऊन स्वारी माघारे आली. त्याजबराबर भोसले याचीही फौज माघारा येऊन सदरहू फौज तो तुगभद्रेवरूनच परभारा नागपुरास गेली. फौजेचे सरदार राजश्री बलवंतराव भवानी होते. ते दोनसे स्वारानसी राजश्री हरीपंत फडके याजबराबर येथे आले आहेत ते तूर्त (का. फा.)ही येथेच आहेत. श्रुत होये. हुजूरचे जवाबी इनायेतनामे आलिकडे सेवकाम सादर जाहले नाहीत. यास्तव विनंती लिहा जाते की पूर्ववत साप्रदाया प्रो सरकारचे जवाबी इनायेतनामे व स्वामीची आज्ञापत्रे सादर होत असावी. याउपरी पुढे प्रसंगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाळ करनार स्वामी समर्थ. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 216**

२ मोहरम १२०७ हिजरी
२० आगस्ट १७९२

श्री

विनती विज्ञापना येसी जे येथील कुशल तागाईत छ २ माहे मोरम मुा पुणे स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानद लेखण आज्ञा करीत आसिले पाहिजे विशेष येथील वर्तमान छ २८ माहे जिल्हेज रोज शुक्रवारी त्रितीये प्रहरी अखबारपत्र सरकारचे डाकेवरून सेवेसी रवाना केले ते पाऊन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनतर येथील वर्तमान त्रितीये प्रहरी मदारुलमहाम याचे येथे मुत्सदी व दरकदार व सुभे मामलेदार आदिकरून सर्वत्र आले

होते. मामलतप्रकर्णी कागदपत्राचें कामकाज तीन घटिका जाल्यावर राजश्री रामजी पा वकील तेथे आले. मागाहून राजश्री हरीपंततात्या आल्यावर त्रिवर्गाचे खिलवत तीन घटिकापर्यंत जाले. नंतर वकील मजकूर माघांरा गेल्यावर राजश्री नाना फडनवीस व हरीपंत फडके याचे बोलणे अस्तमीनपावेतो होऊन फडके आदिकरून सर्वत्र आपल्याले घरास गेले. रोज मजकुरी मागील पाच घटिका दिवस शेष राहाता श्रीमंत आपले वाड्यातून निघाले ते मौजे आबे वडगाव येथील रमन्यात हारणाचा तमाशा पाहावयास गेले होते ते साइंकाळी माघारे येऊन आपले वाड्यात दाखल जाले श्रुत होये. छ २९ रोज शनवारी भाद्रपद शुध्य १ प्रतिपदेपासोन श्रीमंताचे वाड्यात श्रीगणपतीचे उछाहास आरंभ म्हणौन सरकारवाड्यात गणपतीचे दिवानखान्यात गालाचार प्रो मखर वगैरे सर्व साहित्याची सिध्धता जाली. प्रहर दिवसा राजश्री नाना फडनवीस यांणी आपले येथे स्नानसंध्यादि करून वेलबागात गेले. तेथून माघारे आले ते तैसेच परभारे मदारुलमहाम सरकारवाड्यात गेले. तो शास्त्री पंडित आदिकरून सर्वत्र जमा जाले होते. महूर्ताचा समये समीप येताच श्रीमंत तथे आले तेव्हा दाहा घटिका दिवस येता महूर्तेकरून श्रीमताणी सुवर्णाची श्रीगणपतीची मूर्ती आहे त्या मूर्तीची स्थापना त्या दिवा (नवा) त्याचे मखरात केली. पुज्याअर्च्या सर्व विधीपूर्वक जाल्यावर आर्तीचे समई वाद्ये गजर नाना प्रकारचा जाला. तोफखान्यातील तोफेचे वीस बार जाले व दिली दरवाज्यापुढे पाच सा तोफा आनविल्या आहेत त्याचे बारापंधरा बार या प्रो दोहीकडील तोफेचे तीस पस्तीस बार जाले समारंभ बहुत चांगला जाला. या प्रो जाल्यावर राजश्री नाना आपले घरासी आले

---

A. R. No. 217 — १३ मोहरम १२०७ हिजरी

३१ आगस्ट १७९२

श्री

अखबार पुणें अज डा छ १० माहे मोहरम ता छ १३ माहे मजकूर सन १२०७ हिजरी, रोज शनिवार.

पूर्वी छ ९ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ १० रोजी सरकारचे डाकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ १३ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिले असें.

माहदजी सिंदे छ ११ माहे मोहरमी तिसरे प्रहरी राव पंतप्रधानाचे हवेलीस जाऊन राव मवसुफासी दोनतीन घटेका खिलवत जाली. बालाजीपंत व रामचंद्रराव फडके व कृष्णराव बलवंत व दौलतराव सिंदे व अबाजी रघुनाथ व कृष्णराव रघुनाथ व कडोजी सितोले व रामजी पाटील जाधव खिलवतीत शेरीक होते. यक घटका राव पंतप्रधानाची व सिंदे मजकूर व बालाजीपंत व अबाजी रघुनाथ चिटनवीस याची खिलवत अलाहिदा जाली. छ १२ रोज शुक्रवारी बारा घटका दिवसास माहदजी सिंदे राव मवसूफा

(अपूर्ण)

---

A. R. No. 218 — २५ मोहरम १२०७ हिजरी

१२ सप्टेंबर १७९२

(आरंभीची पानें अनुपलब्ध)

४

यास होत आले अद्यापि मनोदयानरूप होत नाही येविसी मीर सिकारी यास सागोन अस्तमिती स्वारी तेथून माघारी निघाली. त्यास मार्गी येता श्रीमंताणी नदीवर साइंकाळ समयाचे संध्यावंदन अंबारीत स्वार जाले. खवासीत रो अपा बळवंत होते. घटिका रात्र होता श्रीमत आपले वाड्यात येऊन दाखल जाले. नंतर मागाहून दो घटिका रात्रीस राजश्री नाना फडनवीस आपले घरास आले. श्रुत होये छ २५ रोज गुरुवारी त्रितीये प्रहरी मदारुलमहाम आपले येथून निघाले ते सरकारवाड्यात जाऊन आर्शेमाहालचे बंगल्यावर गेले. तेथे रा नारायेणराव यादव भागवत, कमाविसदार प्रो आमोद वगैरे माहाल प्रांत गुजराथ,

यांस बंगल्यावर बोलाऊन मामलतप्रकर्णी येक घटिका बोलणे जाले तो श्रीमंतही त्या स्थली आले. नंतर रा बाबूराव केशव व त्रिंबकराव परचुरे वगैरे मत्सदी व दरकदार आले होते त्यासी बोलणे जाले. उपरांत दसरियाचे कापड सालाबांदचे सांप्रदाया प्रो सातारे व कोपरगाव व भागानगर इत्यादिक जागा जागा रवाना करावयाचे आहे. त्यास ते पोशाक व कापड यैसे बंगल्यावर आनऊन श्रीमंताचे समक्ष रवानगी कापडाची करणे त्याची नेमणूक केलियावर मदारुलमहाम तेथून निघाले ते कापडाचे जामदारखान्यात गेले. तेथेही हेच कार्ये कापड पाहावयाचे जाल्यावर मागील दोन घटिका दिवस शेस राहाता राजश्री नाना सरकारवाड्यातून माघारी निघाले ते रोज मारी प्रदोष आहे म्हणौन परभारा बगल्याचे बागात भोजनास गेले. तेथे घरमंडली व उभयेता स्त्रियास आणविले होते. भोजनोतर च्यार घटिका नाच होऊन आकरा घटिका रात्रीस मदारुलमहाम बागातून माघारी येऊन आपले घरास आले. शृत होये. याउपरी पुढे प्रसगीचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. सदैव आज्ञापत्रे सादर होऊन सेवकाचा सांभाल करनार स्वामी समर्थ. पूर्वीप्रमाणे सरकारचे ज्यवाबी इनायेतनामे व स्वामीची आज्ञापत्रे सादर होत नाहीत त्यास ज्यवाबी इनायेतनामे व आज्ञापत्रे साप्रदायेप्रमाणे सादर होत असावी बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती

---

**A. R. No. 219** ३ रजब १२०७ हिजरी
२८ फेब्रुवारी १७९३

श्रीनिवास

पोष्य रघोतम हैबतराव सां नमस्कार विनती जे येथील वर्तमान ता छ ३ माहे रजब फालगुण शुध पंचेमी शुक्रवारपर्येत मुकाम पुणें स्वामीचे कृपेकडून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा जाली पाहिजे. विशेष व पूर्वी छ २६ माहे जाखरी सरकारचे डाकेवर हुजूर अर्जी व अखबार

नवाब अजमुलउमरा बहादुर व स्वामीचे सेवेसी विनंतीपत्रें पाठविले त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ २ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान लिहून सांप्रदायाप्रमाणें पत्राची रवानगी केली असे विस्तारें पत्रावलोकनी ध्यानारूढ होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

A. R. No. 220

२६ रमजान १२०७ हिजरी

७ मे १७९३

श्रीनिवास

अखबार पुणे अज इा छ २५ माहे रमजान ता। छ २६ माहे मा।र सन १२०७ हिजरी रोज बुधवार.

पूर्वी छ २४ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ २५ रोजी सरकारचे डाकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ २६ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदाया प्रो। दफेवार लिहिले असे.

छ २४ रोजी बाळाजीपंत माहदजी सिंद्याचे खेम्यास जाऊन तरफियाचा मजकूर बोलून आले म्हणून म्हणोन पेशजी लिहिले आहेच. त्यास छ २४ माहे मजकुरीच बाळाजीपंत व सिंदे बहादुर याची कसम अकसाम जाली. पंत मा।रनिलेनी तुळसी साळीग्रामाच्या सिंद्यास दिल्हचा व सिंद्यानी आपल्या गुरूची उदी अंगरा बाळाजीपंतास दिल्हा. परस्परें जररावर नसावे आबरू हुरमत उभयताची यक याप्रमाणें ठरले म्हणून यैकिलें.

शिंदे मजकूर बरसातीत जामगांवी छावणी करणार. शवाल आखर येथून जामगावास जाणार म्हणून यैकिलें. निश्चये ठरल व जातील ते समई लिहू. तूर्त यैकिल्या प्रो। लिहिले असें.

हिंदुस्तानात होलकरासी व सिंद्याकडील जमियेतीसी बहुतकरून लढाई जाली असेल किंवा होईल या प्रों बोलत आहेत

मिस्तर मालिट वकील इंगरेज मुंबईस जाणार म्हणौन पेशजी लिहिले आहेच. त्यास छ २६ रोजी राव पंतप्रधानाचे हवेलीस भोजनास वकील मार आला होता दाहाबारा असामीनी भोजने केली. नंतर राव पंतप्रधानानी वकील मजकुरास यक रकम कंठी मरवारिद व सिरपेंच मुरसा व चार पारचे व हमराही अहलनसार तीन असामीस च्यार पारचे व नुरदीहुशनखान वगैरें सातआठ असामीस सेले पागोटी येणे प्रों देऊन वकील माारास रुखसत केले नंतर मालिट मजकूर बालाजीपंताचे हवेलीस आला. बालाजीपंतानी वकील माारास पांच पारचे वस्त्रें देऊन रुखसत केले मिस्तर मालिट लवकरच जाणार.

परशरामपंत मिरजकरास टिपूकडील मुलक सुटला त्यापैकी गदक लक्ष्मेश्वर वगैरें तीन लक्षाचे माहल कदीम जागीरीत होते ते बदस्तूर कदीम देयाचा करार केला. सनदपत्र करून देणार.

छ २५ रोज मंगळवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजनसमई कवालाचे गायेन यैकून भोजन केले आखरवख्ती दोनतीन घटका दिवाणखान्यात बसले होते. रात्रौ संध्या व भोजन करून आराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी आखरवख्ती हरिपंतास बोलाऊन घेतले व रामजी पाटील वकील आला त्यासी तीनच्यार घटका बोलणे जाले. उपरांतिक गोविंदराव भगवंतास बोलाऊन च्यार घटका रात्रपर्यंत खिलवत जाली. उपरांतिक बालाजीपंत संध्येस उठून गेले. हरिपंत आपले हवेलीस गेले.

छ २६ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्यादिक व भोजन करून आराम केला. आखरवख्ती दाहा

घटका दिवस बाकीस राहता मिस्तर मालट वकील इंगरेज सूचने प्रो भोजनास आला. भोजनसमई राव पंतप्रधान बाळाजीपंत व हरिपंतासहित वकीलचे परामृषास पाव घटका बसले. नंतर गणपतीचे दिवाणखान्यात जाऊन बसले. तवाफाचा नाच शुरु करविला होता. मिस्तर मालटास राव मवसूफानी कंठी मोत्याची व सिरपेंच मुरसा व च्यार पारचे वस्त्रें व हमराही तीन असामीस च्यारच्यार पारचे व नुरदीहुशनखान वगैरे आठ असामीस सेले पागोटी दिल्ही. नंतर दुसरे मकानी राव मवसूफ वकील मजकुरासहित बसले. वकील राव पंतप्रधानास काही बिलवरी जिनस व वकलीचा काही जिनस देऊन बाळाजीपंताचेथे जाऊन यक घटका पंत मारनिलेसी बोलणे जाले. बाळाजीपंतानी वकीलास पांच पारचे वस्त्रें देऊन रुखसत करून बाळाजीपंत बेलबागात जाऊन देवदर्शन घेऊन हवेलीस गेले व हरिपंत आपले हवेलीस गेलें. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

---

**A. R. No. 221**

७ जिल्काद १२०७ हिजरी
१६ जून १७९३

श्रीनिवास

पोष्य रघोतम हैबतराव साष्टाग नमस्कार. विनंती जे यथील वर्तमान ता। छ ७ माहे जिल्काद जेष्ठ शुध नवमी सोमवारपर्यंत मुकाम पुणें स्वामींचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानद लेखनाज्ञा जाली पाहिजे विशेष पूर्वी छ ५ रोजी सरकार डांकेवर हुजूर अर्जी व अखबार व नवाब अजमुलउमरा बहादूर व स्वामीचे सेवेसी विनंतीपत्र पाठविले त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ ६ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान लिहून सांप्रदायाप्रमाणे पत्राची रवानगी केली असे. विस्तारें पत्रावलोकनी ध्यानारूढ होईल. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विनंती.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ ५ माहे जिलकाद ता छ ६ माहे मजकूर सन १२०७ हिजरी रोज रविवार.

पूर्वी छ ४ रोजचे वर्तमान लिहून छ ५ रोजी सरकारचे डांकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ ६ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदाया प्रो। दफेवार लिहिले असें.

माहदजी सिंद्याकडील सरदारासी व कासीराव व बापूजी होलकर वगैरेंसी लढाई छ १७ व छ १८ व छ २१ माहे शवाली जाली. याचे वर्तमान पेशजी लिहिलच आहे. सांप्रत तुकोजी होळकर व कासीराव व बापूजी होलकर वगैरें रामपुरा व भानपुरा व हिंगळाजगडचे रुखे आले व सिंद्याकडील सरदार चमेल नदी उतरून होळकराचे ताकुबावर आहेंत. छ २१माहे शवालचे लढाईत होळकराची खराबी फार जाली. सध्या होल्कर पाच हजार जमले. वरकड बुनग वगैरे फार. लुटले म्हणौन येकिले

अली बहादर झरने परण्याचे मकानास बहुत दिवसपासून महसरा करून होते. त्यास छ १० शवाली तेथील बारी घेतली त्याज (व)रून धोकलसिंग राजा पटवी व खठोले नामें मकान आहे तेथे पलून गेले बाद अलीबाहदरानी झरने परण्यात ठाणे छ ११ शवाली बसविले. दोन हाथी व बाग तोफा बाहदर मवसूफास सापडलें म्हणून यैकिलें. झरने परणे तालुका वीस पंचवीस लक्ष रुपयाचा आहे म्हणून वर्तमान आलें.

छ ५ रोज शनिवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नान संध्यादिक व भोजन केले. आखरबख्ती राव मवसूफानी बालाजीपंत व हरिपंतास तलब केली. बमोजिब तलब उभयेता पंत मारनिले

हजर जालें. येक घटका बोलणे जाले. च्यार घटका दिवस राहता राव पंतप्रधान बालाजीपंत व हरिपंतासहित गोविंदराव नीलकंठ खासगीवाले याचे हमसीराची शादी जाली म्हणोन जियाफतीस गेले. दोन घटका तवाफाचा रकस जाला. नंतर खासगीवाले मजकुराने राव मवसूफास तयारी पोशाक पागोटे व दुपठा पैठणी आबासी रंगाचे व सफेद ज्यामा व किमखाबी पायज्यामा दिल्हा. बालाजीपंत व हरिपंतास वस्त्रे दिल्हीं नांहींत. आतर पांदान राव मवसूफास देऊन तवाजा केली. राव मवसूफ उभयता कारपरदाजासहित हवेलीस जाऊन घटका रात्रपर्येत धारवाडप्रकर्णी हिशब पाहिला. नंतर बरखास्त होऊन रात्रौ व संध्या व भोजन करून आराम केला. बालाजीपंत बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन हवेलीस गेले. हरिपंत आपले हवेलीस गेले.

बालाजीपंत छ मजकुरी वैजनाथभट, पंत मजकुराचे सासरे, याचे घरास मये कबीले भोजनास आकरा घटका दिवसास जाऊन भोजन केले. नंतर भट मजकुराने सेला पागोटे ज्यामा व किमखाबी पायेजामा दिल्हा. पंत मजकूर आपले हवेलीस गेले.

छ ६ रोज रविवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूजन करून भोजन केले आखर वख्ती राव मवसूफानी बालाजीपंत व हरिपंतास बोलाविले होते गोविंदराव भगवंतही हजर जाले होते. अस्तमानपर्येत धारवाडचा हिशब पाहिला. नंतर दोन घटका बोलणे जाले राव मवसूफ बरखास्त होऊन रात्रौ संध्या व भोजन करून च्यार घटका शतरंज खेळून आराम केला बालाजीपंत व हरिपंत आपलाले हवेलीस गेले. साहा घटका रात्रीस बालाजीपंत विश्वनाथ जोसी याचे घरी शादी म्हणून तेथे जाऊन शादीचे मजलसीत दोनतीन घटका बसले. तवाफाचा नाच जाला. नंतर पंत मारनिले नव घटका रात्रीस आपले हवेलीस गेले. सेवेसी श्रुत होये हे विनंती.

A. R. No. 222

२९ जिलकाद १२०८ हिजरी
२८ जून १७९४

श्री

पाष्य आनंदराव केशव दिा राजे रघोतमराव साष्टांग नमस्कार विनंती जे येथील वर्तमान ता छ २९ माहे जिलकाद आषाढ शुध प्रतिपदा मदवारपर्यंत मुकाम पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणौन स्वानंद लेखनाज्ञा जाली पाहिजे. विशेष पूर्वी छ २२ माहे मजकुरी सरकारचे डांकेवर हुजूर अर्जी व अखबार व नवाब अजमुलउमरा बहादुर व स्वामीचे सेवेसी विनंतीपत्रें पाठविले त्याजवरून विस्तारें वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ २८ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान लिहून सांप्रदाया प्रो पत्राची रवानगी केली असे. विस्तारें पत्रावलोकनी ध्यानारूढ होईल हे विज्ञापना.

---

श्री

अखबार पुणें अज डा छ २२ माहे जिलकाद ता छ २८ माहे मजकूर सन १२०८ हिजरी रोज शुक्रवार

पूर्वी छ २१ माहे मजकूरपर्यंत वर्तमान लिहून छ २२ रोजी सरकारचे डांकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ २८ रोजपर्यंत यैकिले व जाले वर्तमान सांप्रदायाप्रमाणें दफेवार लिहिले असे.

हरिपंत फडक्याचा इंतकाल जाल्याचे वर्तमान पूर्वी लिहिले आहेत. त्यास मार्गनिलेचे पुत्र चितामणराव व रामचंद्रराव फडके हरिपंत मुतवफाचा आखर लवाजमा मिधटेकी करून पुण्यास आल्यानंतर राव पनप्रधान आवल मातमीची खिलअत देऊन बाद फौजेचे बक्षीगिरीचे काम त्याजकडेच बहाल ठेऊन खिलअत देणार म्हणौन येकिले.

हरिपंत फडके मुतवफाचे पुत्राचे समाधानीकरिता राव पंतप्रधानानी कृष्णराव बलवंतास छ २५ माहे जिलकादी रुखसत केले. मारनिले छ २६ रोजी पुण्याहून स्वार होऊन सिधटेकास गेले.

श्रीधर लक्ष्मण मुनसी निा रघोजी भोसले छ ३० माहे जिलकादी गारपीरानजीक जाऊन राहणार व छ ३ माहे जिल्हेजी तेथून कूच करून नागपुरास जाणार.

दौलतराव सिंद्याकडील मुतसदी आपस आपमात कजिया करून नाखुष होऊन अबाजी रघुनाथ चिटनवीस महिना पंधरा दिवसापासून कामकाज सोडून आपले मकानी बसून राहिले होते. सांप्रत छ २६ रोजी दौलतराव सिंदे त्याचे मकानास जाऊन आबाजी रघुनाथ चिटनवीसाची समजावीश केली. चिटनवीस मजकुरानी सिंद्यास च्यार पारचे व घोडा रास यक दिल्हा.

राव पंतप्रधानानी स्वाराची नवनिगा(दा)स्त करविली आहे. त्यास पुण्यात बाजे सरदार लोक नवनिगादास्त करीत आहेंत व गाड्याचीही निगादास्त होत आहें.

गोविंदराव भगवंत हरिपंत फडक्याचा इंतकाल जाला म्हणौन खबर यैकून इंदापुराहून मातमपुरसीकरिता सिधटेकास गेलें तेथून मारनिलें पुण्यास लवकरच येंणार.

दौलतराव सिंदे राव पंतप्रधानाचे सूचने प्रों हिंदुस्तानातील जमियेती पैा कांही फौज वगैरें जमियत आणवण्याविशीची तजवीज करीत आहेत म्हणौन यैकिलें.

परशरामपंत मिरजकरास जरीदा जलद यण्याविशी बालाजीपंतानी शुका लिहून छ २६ माहे जिलकादी हरकारे जोडीसमागमे रवाना केला आहें. निकडीचा शुका पाठविला म्हणौन यैकिले.

हरिपंत फडके मुतवफाचे आखर लवाजम्याकरिता राव पंतप्रधानानी तोषखान्यातून पंनास हजार रुपये देविलें.

छ २२ रोज शनिवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. आखरवख्ती राव मवसूफ माहलात होते. रात्रौ संध्येसमई कवालाचें गायेन यैकून भोजन करून आराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आवलवख्ती बेलबागात जाऊन विष्णु-दर्शन घेतलें. आखरवख्ती पंत मारनिले हरिपंत फडके मुतवफाचे घरास मातमीस जाऊन यक घटका बसून आपले हवेलीस आले.

छ २३ रोज रविवारी राव पतप्रधान प्रात:काली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. आखरवख्ती राव मवसू-फानी कागजावर दसखतें करून रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम केला.

बालाजीपंतानी छ मजकुरी आवलवख्ती आपले वाल्दचे श्राध करून कृष्णराव बलवंतास भोजनास बोलाऊन भोजन करून पंत-मारनिले बेलबागात गेले. विष्णुदर्शन घेऊन आपले हवेलीस गेले. आखरवख्ती बालाजीपंतानी कृष्णराव बलवंतास बोलाऊन घेऊन दोन घटका खिलवत करून संध्येस उठून गेले

छ २४ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन स्नानसंध्यादिक व भोजन करून आराम केला. आखरवख्ती राव मवसूफानी स्वारी तयार करऊन कृष्णराव बलवंत वगैरें सरदार व स्वार दोनतीन हजार बोलाऊन घेऊन येकादसी म्हणून अवल बेल-बागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन पर्वतीस हाथीवर अंबारीत स्वार होऊन गेले. देवदर्शन घेऊन रमण्यातील बंगल्यात जाऊन बसले. बालाजीपंतही बमोजिब तलब राव मवसूफानजीक हजर जालें. नरवरकर यक पठाण आला आहे. त्याने दोन घोड्यावर दोन पाय ठेऊन उभ्याने घोडी फेरून दाखविल्ली. उपरांतिक राव मवसूफानी बोथाट्या खेळून हाथी वाघावर घालविले. नंतर घोड्यावर स्वार होऊन दोन घटका रात्रीस हवेलीस येऊन संध्या व भोजन करून

आराम केला. बालाजीपंत आपले बागात जाऊन संध्या करून तीन घटका रात्रीस आपले हवेलीस गेलें.

छ २५ रोज मंगलवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. आखरवख्ती पांच घटका दिवस राहाता राव मवमूफ यैन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत बमोजिब तलब हजर जाले. गोविंदराव कृष्णाकडील पत्रें आली होती ती पत्रे वाचून पाहून दोनतीन घटका खिलवत करून राव मसूफ बरखास्त होऊन रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करू(न) आराम केला. बालाजीपंत कृष्णराव बलवंतासी यक घटका बोलून आपले हवेलीस गेले.

बालाजीपंत छ मजकुरी आवलवख्ती प्रहर दिवसास बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन आपले हवेलीस जाऊन राजे कल्याणराव व राय बाबूराव आले त्यास दोन घटका बोलणे जाले. नंतर उभयता मारनिलेम निरोप देऊन आखरवख्ती श्रीधरपंत मुनसी व कृष्णराव चिटनवीस निा रघोजी भोसले यासी दोन घटका बोलून पंत मारनिले बमोजिब तलब राव पंतप्रधानाचे हवेलीस गेले होते.

छ २६ रोज बेधवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून तालीमखान्यात जाऊन जोर काहाडून बारा घटका दिवसास भोजन करून आराम केला. आखरवख्ती राव मवमूफ यैन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत बमोजिब तलब हजर जाले. दोनतीन घटका उभयताचीच खिलवत जाली नंतर माहलाती वगैरेंची बोलणी जाली. उपरांतिक राव मवसूफ बरखास्त होऊन रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम केला. बालाजीपंत आपले हवेलीस गेलें

राव पंतप्रधानानी छ मजकुरी कृष्णराव बलवतास हरिपत फडके मुतवफाचे पुत्राचे समाधानीकरिता पुण्याहून सिधटेकास रवाना केले.

छ २७ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या व भोजन करून आराम केला. आखरवक्ती राव मवसूफानी दोनतीन घटका कागजावर दसखते करून दोन तीन घटका तसबीऱ्याचा मुलाहिजा करून रात्रौ सध्येसमई कवालाचे गायेन येकून भोजन करून आराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आवलवक्ती चवदा घटका दिवसास बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेतले. आखरवक्ती राव मवसूफानी कागजावर दसखते करून तसबीऱ्याचा मुलाहिजा केला. रात्रौ सध्येसमई कवालाचे गायेन येकून भोजन करून दोनच्यार घटका चवसर खेळून आराम केल.

बालाजीपंत छ मजकुरी आवलवक्ती चवदा घटका दिवसास बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेतले. आखरवक्ती काही कागदपत्र पाहून बाबूराव वैद्यासी दोनतीन घटका बोलून पंत मारनिले मध्येस उठून गेले.

छ २८ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. नंतर आराम केला. आखरवक्ती राव मवसूफानी कागजावर दसखते करून रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन येकून भोजन करून आराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आखरवक्ती खडोपंत वर्तक व बाबूराव वैद्यासी दोनच्यार घटका बोलत बसले होते. नंतर मध्येस उठून गेले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

**A. R. No. 223**

६ जिल्हेज १२०८ हिजरी
५ जुलै १७९४

श्री

अखबार पुणें अज इा छ २९ माहे जिलकाद ता छ ६ माहे जिल्हेज सन १२०८ हिजरी रोज शुक्रवार.

पूर्वी छ २८ माह जिलकदपर्यंत वर्तमान लिहून छ २९ रोजी सरकारचे डांकेवर हुजूर अखबार पाठविली त्याजवरून वर्तमान श्रुत जाले असेल. सांप्रत छ ६ माहे जिल्हेजपर्येत यैकिलें व जालें वर्तमान सांप्रदाया प्रो दफेवार लिहिले असें.

श्रीधर लक्ष्मण निा रघोजी भासलें राव पंतप्रधानापासून रुखसत जाले. नेकसात पाहून नागपुरास जाणार म्हणौन पेशजी लिहिले होते. सांप्रत श्रीधर लक्ष्मण मुनसी छ १माहे जिल्हेजी गार-पीरानजीक जाऊन राहिले. छ ५ राजी तेथून बाणदाजाचे कूच केले. छ ७ रोजी श्रीधर लक्ष्मण व राव पंतप्रधानाचे तरफेनें बाबूराव विश्व-नाथ वैद्य हे उभयता मिळून दरकूचे नागपुरास जाणार.

दौलतराव सिंद्यानी राव पंतप्रधाना सूचने प्रो हिंदुस्तानातील जमियती पैा जिवाजी बलाल व डभाई (बेन्वॉ डी बॉइन) या हर दु शखसास दाहापंधरा हजार सवार व दाहा पलटणें घेऊन जलद येण्याविशी सिंद्याची पत्रें गेली.

गोविंदराव भगवंत इंदापुराहून छ २९ माहे जिलकादी पुण्यास आले. मारनिले हररोज दुवख्ता दरबारास व बाळाजीपंताकडे जात आहेत.

हरिपंत फडकें मुतवफाचा आखर लवाजमा छ ३ माहे जिल्हेजी केला. याउपरी मारनिलेचे पुत्र चितामणराव वगैरें छ ८ रोजी पुण्यास येणार आल्यानंतर चितामणराव फडक्यास राव पंतप्रधान मातमपुरसीची खिलअत देणार आहेत.

कृष्णराव बलवंत सिधटेकास गेले होते. त्यास मारनिले छ ४ माहे जिल्हेजी माघारा सिधटेकाहून पुण्यास आलें.

छ २९ रोज शनिवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. आखर वख्ती राव मवसूफ

घोडी फेरायास पर्वतीनजीक घोड्यावर स्वार होऊन गेले. हमराही रघुनाथराव मिरजकर वगैरें सरदार व स्वार हजार दीड हजार व गाडदी होते. दोनतीन घटका घोडी फरून राव पंतप्रधान हाथीवर आंबारीत स्वार होऊन अस्तमानी हवेलीस येऊन रात्रौ संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून आराम केला.

बालाजीपंत छ मजकुरी आवलवख्ती भोजन करून बसले होते गोविंदराव भगवंत आपले कन्यचे लग्न करून तेरा घटका दिवसास पुण्यास येऊन आपले घरास न जाता बालाजीपंताची भटी घेऊन च्यार घटका बोलून गेले नंतर बालाजीपंत बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेतले. आखर वख्ती पंत मार्गनिलेनी दोन घटका गाडदियाची हजरी घेतली. नतर रामजी पाटील वकीलासी दोन घटका बोलून रघोजी भोसल्याकडील कारभारी आल त्यासी यक घटका बोलून गोविंदराव भगवंतासी तीन घटका रात्रपर्येत खिलवत जाली. नतर बालाजीपंत संध्येस उठून गेले.

छ १ माहे जिल्हेज रोज रविवारी राव पतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या व भोजन करून आराम केला आखर वख्ती राव मवसूफ यैन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले बालाजीपंत व गोविंदराव भगवंत बमोजिब तलब हजर जाले होते. च्यारपांच घटका खिलवत जाली नंतर रघोजी भोसल्याकडील कारभारी श्रीधर लक्ष्मण गारपीरानजीक जाऊन राहिले आहेत तेथून राव पंतप्रधानाचे हवेलीस येऊन राव मवसूफासी यक घटका बोलून रुखसतीचे विडे घेऊन गेल्यानंतर राव पतप्रधान बरखास्त जाले. रात्रौ संध्या व भोजन करून आराम केला. बालाजीपंत आपले हवेलीस गेले.

श्रीधर लक्ष्मण मनसी छ मजकुरी आवल वख्ती बारा घटका दिवसास गारपीरानजीक जाऊन राहिलें.

छ २ रोज सोमवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन

स्नानसंध्या देवपूज्या करून आवल वख्ती सात घटका दिवसास बालाजीपंत व गोविदराव भगवंतास बोलाऊन घेऊन च्यारपांच खिलवत केली. नंतर राव पंतप्रधानानी भोजन करून आराम केला. बालाजीपंत आपले हवेलीस गेले. आखरवख्ती राव मवसूफ येन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत व गोविदराव भगवंत बमोजब तलब हुजर जाले. गोपाल भगवंत नायब मुनसीम बोलाऊन पत्राचे मसविदे करून दोनतीन घटका खिलवत केली नंतर राव पंतप्रधान बरखास्त होऊन रात्रौ संध्ये-समई कवालाचे गायेन येकून भोजन करून आराम केला. बालाजीपंत बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन पंत मारनिले घोड्यावर स्वार होऊन हवेलीस जाऊन गोविंदराव भगवंतासी दोनतीन घटका रात्र-पर्येत खिलवत करून संध्येस उठून गेले.

बालाजीपंतानी छ मजकुरी अवलवख्ती श्रीधर लक्ष्मण निा रघोजी भोसले यासी बारा घटका दिवसास भोजनास बोलाऊन घेतले भोजनोतर पंत मारनिले श्रीधरपंत व मारनिलेचे बिरादरास साडेतीन पारचे वस्त्रा प्रो देऊन हमराही साहा आसामीस रोले पागोटा दिल्ही. नतर निरोपाचे विडे देऊन मार्गस्त केले. आखर वख्ती पंत मारनिले दरबारास गेले होते.

छ २ रोज मंगलवारी राव पंतप्रधान प्रात:काली बेदार होऊन स्नानसध्यादिक व भोजन करून आराम केला. आखरवख्ती राव मवसूफ येन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत बमोजिब तलब हुजर जाले. गोविदराव भगवतास बोलाऊन घेऊन अस्तमानपर्यंत त्रिवर्गाचीच खिलवत जाली. नंतर राव पंतप्रधान बरखास्त जाले बालाजीपंत आपले हवेलीस गेले. बालाजीपंत छ मजकुरी आवलवख्ती पंधरा घटका दिवसास बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेतले. आखरवख्ती पंत मारनिले बमोजिब तलब राव पंतप्रधानाचे हवेलीस गेले होते.

छ मजकुरी राव पंत प्रधानानी दौल(त)राव सिंद्याम हुरारत येत आहे म्हणौन यैकून सिंदे मजकुराचे खबरगिरीकरिता गोविंदराव बाजीस पाठविले होते.

छ ४ रोज बुधवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले आखर वख्ती राव मवसूफ यैन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले बालाजीपंत व गोविंदराव भगवंत बमोजिब तलब हजर जाले पांचसाहा घटका त्रिवर्गाची खिलवत जाली नंतर राव पंतप्रधान बरखास्त होऊन संध्येसमई कवालाचे गायेन यैकून भोजन करून दोनतीन घटका चवसर खेळून आराम केला. बालाजीपंत आपले हवेलीस गेले.

छ ५ रोज गुरुवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले आखर वख्ती राव मवसूफ यैन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत व गोविंदराव भगवंत बमोजिब तलब हजर जाले दोनतीन घटका खिलवत करून माहलाती हरयक जवाबसाल जाले. उपरांतिक राव पंतप्रधान बरखास्त होऊन संध्येसमई कवालाचे गायेन येकून भोजन करून आराम केला बालाजीपंत आपले हवेलीस जाऊन तीन घटका रात्र-पर्यंत गोविंदराव भगवंतासी खिलवत जाली. बापूराव वैद्य शरीक होते.

बालाजीपंत छ मजकुरी आवल वख्ती साहा घटका दिवसास आपाजीपंत दाभोलकराचे घरास भोजनास जाऊन भोजनोतर नवाफाचा नाच दोन घटका पाहिला नंतर दाभोलकर मजकुराने बालाजीपंतास दुपटा पागोटे व महमुदी थाने दोन व किमखाबी थान येक व शालेचा रुमाल येक येण प्रा। देऊन नवाजा केली. बालाजीपंत बेलबागात जाऊन विष्णुदर्शन घेऊन आपले हवेलीस गेले आखर वख्ती पंत मारनिले दरबारास गेले होते.

छ ६ रोज शुक्रवारी राव पंतप्रधान प्रातःकाली बेदार होऊन स्नानसंध्या देवपूज्या करून भोजन केले. आखरवख्ती राव मवसूफ येन्याचे दिवाणखान्यात बरआमद जाले. बालाजीपंत व गोविदराव भगवंत बमोजिब तलब हजर जाले. दोनतीन घटका खिलवत करून बाबूराव विश्वनाथ वकीलास साडेतीन पारचे वस्त्रे व मारनिलेंचे पत्रास सेला पागोटे देऊन नागपुरास जाण्याविशी रुखसत केले. उपरांतिक राव पंतप्रधान बरखास्त होऊन रात्रौ संध्या व भोजन करून आराम केला. बालाजीपंत आपले हवेलीस गेले. बालाजीपंत छ मजकुरी आवलवख्ती बहिरोपंत मेंदल्यास बोलाऊन घेऊन इंग्रेज-प्रकर्णी तीनच्यार घटका खिलवत केली. आखर वख्ती गोविदराव भगवंतास व बाबूराव विश्वनाथ वैद्यास बोलाऊन घेऊन दोनतीन घटका खिलवत भोंसल्लेप्रकर्णी करून बालाजीपतानी बाबूराव विश्वनाथ यास साडेतीन पारचे वस्त्रे व मारनिल्हे पुत्रास सेला पागोटे देऊन नागपुरास जाण्याविशी रुखसत केले. बहुत काय लिहिणे. लोभ कीजे हे विनंती

# पुणें अखबारांतील कठिण शब्दांचे अर्थ

(अ.)–अरबी ; (फा.)–फारसी ; (तु.)–तुर्की ; (हिं.)–हिंदुस्थानी ;
(स.)–संस्कृत ; (म.)- मराठी ; (इं.)–इंग्रजी ; (रा. व्य. को.) राज्यव्यवहारकोश.

### अ

**अखबारनवीसी (फा.)**, वार्तालेखन, बातम्या कळविणे.
**अज् (फा.)**, पासून, मुळे
**अदा करणे (फा.)**, प्रकट करणे, फेड करणे.
**अलाहिदा (अ.)**, पृथक, विभक्त, निराळे
**अवल (अ.)**, पहिला, सुरवातीचा
**अवल वख्ती (अ.)**, वेळेच्या प्रारंभी.
**अहलनसार (अ.)**, त्यागी लोक
**अहदसिकनी (अ.)**, वचन करार मोडणे.

### आ

**आखर लवाजमा (अ.)**, अंतिम संस्कार
**आखर वख्ती (अ.)**, वेळेच्या शेवटी
**आबरू हुरमत (अ.)**, पत, सन्मान.
**आबादी (फा.)**, दाट वस्ती, लावणी, पीक
**आमिल (अ.)**, अधिकार गाजविणारा, सरकारनियुक्त अधिकारी.
**आवई (हिं.)**, लोकवार्ता गप्प बातमी

### इ

**इजहार (अ.)**, प्रसिद्धीकरण, प्रकट करणे.
**इत्तिफाक (अ.)**, मतैक्य, योग घडणे
**इत्तिला (अ.)**, वार्ता, खबर
**इनायतनामा (अ.)**, कृपापत्र, शिफारसपत्र.
**इप्तदाय (अ.)**, प्रारंभ.
**इस्तकबाल (अ.)**, सामोरे, भावी.
**इस्म (अ.)**, नाम, नाव, मनुष्य.
**इहदे (अ.)**, एक.

### उ

**उपाध (सं.)**, त्रास.
**उभारणी**, ऊर्जितावस्था, पुढे आणणे.
**उमदा (अ.)**, थोर, विश्वासू

### क

**कजिया (अ.)**, तंटा, वाद, प्रकरण
**कदीम (अ.)**, जुना, पुरातन.
**कफेदस्त**, तळहाताचे सपाट मैदान.
**कबीला (अ.)**, कुटुंब, बायकामुले, परिवार.
**कबू**, एक प्रकारचा पक्षी.
**कमती (फा.)**, कमीपणा, उणीव.
**कमाविसदार (फा.)** वसूली कामावरील मुख्य अधिकारी.
**कर्ज हसना (फा.)**, लोकांसाठी दिलेले ऋण.
**कलगी (तु. फा.)**, शोभादायक रत्नजडित शिरोभूषण
**कली**, कमळाच्या कळीच्या आकाराचे एका जातीचे हातिदर्शी किंवा लाकडी भांडे.
**कश्चित (सं.)**, अमुक, कोणीतरी एक.
**कसबी लोक (अ.)**, वेश्या.
**कसम अकसाम**, भिन्न भिन्न प्रकार.
**कसर कम (फा.)**, थोडेसे कमी.
**कसीस, कशिश (अ.)**, ओढ.
**कहीकबाड (हि.)**, चारा, गवत व लाकूडफाटा.

**कामाठी** (सं.), झाडलोट करून बैठक घालणारा

**कायम मिजाज** (अ.), स्वभावात दर्शविक तीव्रता व शांतता असलेला.

**कारचोबी** (फा.), जरीचे, वेलबुट्टीदार

**कारपरदाज** (फा.), कार्यकर्ता, मुत्सद्दी.

**कासदजोडी** (अ.), वार्तावाहक जोडी

**काहिली** (अ.), आजारपण, आळशीपणा

**किनखाब** (फा.), बहुरंगी जरतारी कापड

**किलती** (अ.), उणीव.

**किलावा** (हि.), माहुताला पाय अडकविण्यासाठी हत्तीच्या गंडस्थळावरून खाली सोडलेली दोरीची रिकीब, हत्तीचा गळपट्टा

## ख

**खवास** (अ.), उमराव, मानकरी

**खातरजमा** (फा.), स्वास्थ्य, संशयानिराकरण, हिंमत

**खातरपाश** (अ. फा.), विश्वास उत्पन्न करण्यासाठी.

**खारिज** (अ.), उडत उडत, हद्दपार, कर्णोपकर्णी, बाहेर

**खासा** (अ.), चांगला, अभिजात, राजा, स्वार

**खिलअत** (अ.), सन्मानाचा पोशाख

**खिलवत** (अ.), एकांतात केलेले भाषण

**खुश्क** (फा.), कोरडे, कोमी.

**खुशबोई** (फा.), सुगंधी

**खेमे** (अ.), तंबू

**खैरात** (अ.), दानधर्म, परोपकारबुद्धी

**खोल**, अंतःकरणी

## ग

**गरूर** (अ.), गर्व, घमेंड, प्रौढी.

**गिर्दनवाह** (अ. फा.), भोवतालचा प्रदेश.

**गिलचे** (फा.), भटके शिपाई.

## घ

**घटवटना** (स.), वाटाघाट, चर्चा, जुळवाजुळव.

**घासदाणा** (स.), सैन्याला गवत व दाणा पुरविण्यासाठी लावलेला कर.

राजाराम काळी हा उत्पन्न केला नागपूरकर भोसल्याकडे हा वसूल करण्याचे काम असे हा साधारणपणे वीस टक्के असे.

## च

**चिचेरे** (हिं.), चुलत.

**चोपदार** (हिं फा.), सोन्याचांदीची काठी हातात धरून राजापुढे चालणारा हुजऱ्या.

## छ

**छावा** (सं.), सिंहाचे किंवा हत्तीचे पिल्लू

**छेजा**, सज्जा, गच्ची, घरावरील भाग.

## ज

**ज्यामेवार** (फा.), वेलबुट्ट्याचे छापे मारलेले एक प्रकारचे कापड.

**ज्याहिल** (अ.), अज्ञानी

**ज्वाबसाल, जवाबसाल, जाबसाल** (अ.), प्रश्नोत्तर, संभाषण, तह.

**जकीरा, जखीरा** (अ.), कोठार साठा, संचय

**जरर** (अ.), जखम

**जरीदा** (अ.), माहितीपत्र (सरकारी); सडा, एकटा 'एकाकी तु जरीदा स्यात्' (रा.व्य.को).

**जरूरियात** (अ.), आवश्यक वस्तु.

**जातजाबता** (अ.), कायदेशीर वैयक्तिक बाब.

**जामनो** (अ.), हमी, जबाबदारी.

**जिंदगानी सरंजाम (फा.)**, जीविरवमामुग्री.

**जिलेबो (फा.)**, परिवार, स्वारी, मिरवणूक (सहा प्रकारच्या लोकासह).

**जीगा (फा.)**, मस्तकावर धारण करण्याचा हिऱ्याचा अलंकार

**जुंज फोवतल**, लढण्यात यशस्वी होत्साता

**जुबानी (फा.)**, तोंडी.

**जेटिया (सं.)**, मल्ल, पहेलवान.

ड

**डाहारी**, धाण पाण्याचे डबके.

त

**तई (सं.)**, तिकडे.

**तकयुद (अ.)**, दक्षता, अवधान देणे.

**तकाजा (अ.)** मागणी.

**तजवीज (अ.)**, व्यवस्था, उपाय, सल्ला.

**तफावत (अ.)**,अंतर, फरक

**तंबी (अ.)**, कानउघाडणी, शिक्षा, सुधारणा.

**तर (फा.)**, पावसाळी, ओले

**तरकश (फा.)**, बाणाचा भाता.

**तरदूद (मराठी प्रयोग)**, हुन्नरबाज, उपाय-स्वरतूद समृत (रा. व्य. को.)

**तलब (अ.)**, मागणी, पगार, बोलावणे

**तवाजा (अ.)**, बक्षीस, नेमणूक.

**तवाफा (अ.)**, नाचणाऱ्यांचे किंवा कला-वंतिणीचे नाडे.

**तशफी (अ.)**, समाधानकारक.

**तसखर (अ.)**, उपहास, कह्यात आणणे

**तसफिया (अ.)**, निर्णय, निकाल, तह.

**तसरूफी (अ.)**, अम्मल, ताबा, अम्मलातील, ताब्यातील

**तहकीक (अ.)**, सत्य, निश्चितपणे, खात्री.

**ताकुब (अ.)**, पाठलाग.

**ताख्तताराज (फा.)**, लूटमार, विध्वंस.

**तामकदूर (अ.)**, सामर्थ्याप्रमाणे

**ताराज (फा.)**, उध्वस्त.

**तिसैन (अ.)**, नक्त्द

**तैनाती (अ.)**, वेतन, पगारी, दुसऱ्याच्या ताब्यात दिलेली (सैन्याची तुकडी); सोपविलेला, ताब्यात दिलेला (एखाद्याच्या निर्वाहाकरिता—जिल्हा, शहर इ.); मदतनीस

**तोफखाना (फा.)**, कोठार, जामदारखाना.

थ

**थाने**, कापडाचे ताग, ठाणे.

द

**दफेवार (अ.)**, प्रकरणश.

**दर्दशिकम (फा.)**, पोटदुखी.

**दरकदार (अ.)**, दरक धारण करणारा अधि-कारी, फडणीस, मुजुमदार इ.

**दरोबस्त (फा.)**, पूर्ण, सर्व.

**दस्तक (फा.)** परवाना; लायसेन्स.

**दस्तगिरी (फा.)**, वंदना, कृपा, साह्य, स्नेह

**दस्ताना (फा.)** मोजे, हस्तत्राण, हातमोजा

**दहकपट्टी (स.)**, इनाम जमीनी सोडून इनाम-दाराकडून अंमलदार उत्पन्नावर घ्यावयाचा कर. हा दर दहा वर्षांनी वसूल करीत.

**दारमदार (फा.)**, ठराव, करार भिस्त

**दारोगा (फा.)**, मुख्य, व्यवस्थादार, निरीक्षक.

**दिकत (अ.)**, मुद्दसदोष शंका. हरकत अडचण.

**दुचंद (फा.)**, दुप्पट भरपूर

**दुपट्टा (हिं)**, खांद्यावरून टाकावयाचे दोन पाटांचे उपवस्त्र, वस्त्र

**दुरस्ता**, (रस्त्याच्या) दोन्ही बाजूंना.

**दुराई (फा.)**, दोन मार्गी.

**दुवस्ता (फा.)**, दोन वेळा.

**दौलत (अ.)**, संपत्ती, राज्य, सैन्य, ऐश्वर्य.

## न

**नक्त** (अ.), रोकड

**नजरंदाजी** (अ.), उपेक्षा, दृष्टीआड, मोज-मापाशिवाय अवलोकनाने केलेला पिकाचा अजमास.

**नजरा** (नजर शब्दाचे अनेकवचन), भेटी, उपायन.

**नमूदात** (फा.), प्रगट, उजेडात

**नवनिगादास्त** (फा.), नवीन सैन्यभरती.

**नावनवेशी** (फा.), नाव लिहिणे

**नावफी** (अ.), अपूर्ण

**निकाहत**, आजारानंतरचा अशक्तपणा

**निगाहदास्त** (फा.), शुश्रुषा, फौजभरती

**निशस्त** (फा.), बैठक

**निशा** (अ.), उधारीची पत, वचन, कैफ.

**निसबती** (फा.), संबंधी

**नेकसात**, शुभ घडी.

## प

**परवरसी** (फा.), उत्तेजन, सांभाळ, शिक्षण.

**पसपा** (फा.), पिछेहाट

**पागा** (फा.), अश्वशाळा.

**पारचे** (फा.), कापड, वस्त्रे, पोशाख

**पालखीनसीन** (फा.), पालखीत बसलेला

**पिछेलो** (हिं.), मागील

**पेशकबज** (फा.), एक प्रकारचे कट्यार, खंजीर

**पेशजी** (फा.), पूर्वी मागे.

**पेशकश,**
**पेशकस** } (फा.), खंडणी, उपायन

**पैगाम** (फा.), संदेश, निरोप

**पैदल** (फा.), पायदळ.

## फ

**फरोख्त** (फा.) विक्रय.

**फाकेकसी** (अ.), उपासमार.

**फारसी ख्वान** (फा.), फारशी वाचणारा.

**फारसी गो** (फा.), फारशी बोलणारा.

**फासला** (अ.), अंतर.

**फिरंगी** (फा.), युरोपीयन मनुष्य, टोपीवाला, पोर्तुगीज.

**फिरस्ते** (फा.), पाठविलेला, भटक्या, देवदूत.

**फीलखाना** (फा.), गजशाळा.

## ब

**बइतिफाक** (अ.), सुमगत

**बख्तरपोष** (फा.), चिलखत धारण केलेला.

**बग्या** (हि.), पुडके, पेटारे.

**बतरीक** (फा.), म्हणून, दाखल, प्रमाणें.

**बदस्तूर** (फा.), परवानगीप्रमाणे, नियमा-प्रमाणे, वहिवाटीप्रमाणे, कुवला-मर्जीप्रमाणे.

**बमय** (अ.), त्यासह, त्याबरोबर.

**बमोजितलब** (फा. अ.), मागणीप्रमाणें, बोला-चालीप्रमाणे, पगारप्रमाणे.

**बरआमद** (फा.), येणे.

**बरखिलाफ** (फा.), विरुद्ध

**बरचे जवान** (फा.), भाला बाळगणारे शिपाई.

**बरतरफ** (फा.), (कामावरून) काढून टाकणे, पदच्युत करणे.

**बसमेदार** (फा.), रंगीत छटा असलेले.

**बागी** (फा.), बंडखोर, स्वामीद्रोही.

**बाज** (फा.), काही, उल्टपक्षी, ससाणा.

**बाजिदी** (फा.), आग्रहपूर्वक, हट्टाने.

**बाणाच्या कैच्या** (तु.), दारूच्या बाणाचा समुदाय (दारूच्या २४ बाणांची एक जुडी म्हणजे कैची).

**बाणदार**, बाण धारण करणारा शिपाई.

**बातन** (अ.), अंतस्थ.

**बातमी**, वार्ता, हकीकत.

**बातेऱ्या** (इं), ब्याटऱ्या, वीज उत्पन्न कर-णाऱ्या पात्रसंचय, तोफखाना.

**बाद बरसात**, पावसाळ्यानंतर.

**बादली (फा.)**, सोनें, रुपे, तांबें यांच्या ताराचे कांही सूत, रेशीम व कांही जर मिळून विणलेले भरजरी.

**बानीकार (फा.)**, लेखक, शिल्पकार, अभिमानी, प्रेरक.

**बार (फा.)**, परवानगी.

**बारगीर (फा.)**, धन्याने दिलेल्या किंवा सरकारी घोड्यावर बसणारा लष्करांतील शिपाई ; अश्ववाह.

**बारबरदारी (फा.)**, प्रवासखर्च.

**बारी**, दोन डोंगरामधील घोक्याची खिंड. अडचणीचा मार्ग.

**बिलवरी (फा.)**, कांचेचें, स्फटिकासारखें स्वच्छ.

**बुनगा (फा.)**, बिनलढाऊ लोक, सैन्याच्या सामुग्रीचा तळ.

**बेगर्मा (फा.)** निश्चिती, पुरवठा, संग्रह. "नैश्चिन्त्य बेगर्मास्यात्" (रा. व्य. को).

**बेंदडे**, सैन्याबरोबर असलेली लुटारू जात

**बेदार (फा.)**, जागृत

**बोहरी ( सं. व्यवहारी)**, मुसलमानांतील एक जात व इसम. हे लोक लोखंडी सामान, स्टेशनरी इ. चा व्यापार करतात.

**म**

**मार (अ.)**, 'मजकूर'चे संक्षिप्त.

**मारनुले (अ.)**, 'मशारनिल्हे'चे संक्षिप्त; वर सांगितलेला.

**मकदूर (अ.)**, सामर्थ्य, ताकद, जोर.

**मकान (अ.)**, ठिकाण, टप्पा, रक्षणस्थान, मुक्कामाची जागा.

**मकानोमकान (अ.)**, वस्तीच्या ठिकठिकाणी.

**मजमदार (फा.)**, वसूलीचा हिशेब नपासनीस, कारकून.

**मदारुलमहाम (अ.)**, कारभारी, महनीय राजकारणाचा आस ; नाना फडणवीसांचा किताब.

**मनसुबेजात (अ.)** मनोगत, ठराव

**मये (फा.)**, सह, बरोबर.

**मये कबिले (अ. फा.)**, परिवारासह.

**मरकूम (अ.)**, लिखित.

**मरवरिद (फा.)**, मोती.

**मवकूफ (अ.)**, तहकूब.

**मवसूफ (अ.)**, स्थगित

**मसलहत (अ.)**, सल्ला, योग्य विचार.

**मसविदे (अ.)**, कच्चे खर्डे

**महासरा (अ.)**, वेढा.

**मातबर (फा.)**, विश्वास.

**मातम (फा.)**, शोक, दुःख.

**मातमपुरसी (फा.)**, दुखवटा, दुखवट्यासंबंधी विचारपूस.

**मातमी (फा.)** शोक, दुखवटा.

**मामलतदार (अ.)**, तालुक्याचा अधिकारी.

**माहालात (फा.)**, 'महाल' शब्दाचे अनेकवचन, तालुक्याचा पोट भाग.

**माहावत (सं. महामात्र)**, माहूत, हत्ती हाकणारा, राखणारा.

**मिनत (अ.)**, मनधरणी करणारा.

**मुकरब (अ.)**, प्रिय लाडका, आवडता.

**मुख्तार (अ.)**, नियोजित, अधिकृत प्रतिनिधि.

**मुनजमन तलब (अ.)**, एखाद्याचा समावेश करून बोलावणे, निमंत्रण देणे

**मुतफिक (अ.)**, एकमत असलेले एकमताचें.

**मुतसद्दी (अ.)**, कारकून.

**मुनवफा (अ.)**, मेहनत.

**मुदबाख (अ.)**, संपाक.

**मुदारन (अ.)**, संभावना.

**मुदारात (अ.)**, 'मुदारन' चें अनेकवचन.

**मुबादला (अ.)**, ऐवजी, बदली.

**मुबारकबाद (फा.)** मंगलचिंतन, अभिनंदन.

**मुबालगा** (अ.), पाल्हाळ, विस्तार.
**मुरसा** (अ.), रत्नजडित.
**मुलाजमत** (अ.), नौकरी, सेवा.
**मुलाहिजा** (अ.), प्रेक्षण, पर्वा, मान, आदर, विचार, क्षमा, गय.
**मुसाहब** (अ.), सहचर.
**मेवेजात** (फा.) फळफळावळ.
**मोहरी** (फा.), सही-शिक्केदार.
**मौजुदात** (अ.), दृश्य वस्तु.

### य

**याद** (फा.) स्मरण, सूची, स्मरणार्थ टिपण.
**याबू** (फा.), घोडा.
**येतमाद** (अ.) विश्वास

### र

**रकस** (अ.), नाच.
**रदबदली** (फा.), सहचर्चा, वकीली, शिष्टाई, तरफदारी, भीडखर्ची.
**रफीक** (अ.), स्नेही, मित्र
**रमजा**, गूढ, कूट, गुप्त.
**रहकले** (हि.), लहान तोफा.
**राजदारी** (फा.), गुप्तता.
**रावत** (सं.), घोडेस्वार.
**रास** (अ.), नग
**रियासत** (फा.) सत्ता, राज्य.
**रुकसत, रुखसत** (अ.), सोडून जाण्याची परवानगी, रजा, निरोप.
**रुकसती** (अ.), निरोपाच्या वेळी दिलेली वस्तु.
**रुखावर** (फा.), निरोप रजा, परवानगी
**रुबकार** (फा.) मार्गावर.
**रुखे** (फा.) मार्गे, दिशेने.
**रुसवाई** (फा.) अप्रतिष्टा. राग, गुस्सा
**रूबकार** (फा.), सन्मुख, फलदायी.
**रोजमरा** (फा.), मजूरी, दिवसाचे वेतन.
**रोजमुरे** (फा.), 'रोजमरा' चे अनेकवचन.

### ल

**लगायत** (अ.), ते, पासून.

### व

**वतनी** (अ.), इनामी, वंशपरंपरेच्या उत्पन्नाचे, जन्म झालेले (गाव).
**वरात, बरात** (अ.), मागणीपत्र, हुंडी.
**वाकफकारी** (अ.), हुशारी, माहितगारी अनुभव, बुद्धिमत्ता, ज्ञान.
**वाजबुल अर्ज** (अ.), विनंती करण्यास योग्य.
**वालदा** (अ), मातोश्री.

### श

**शकल** (अ.), आकृति, योजना, व्यवस्था प्रकार.
**शब** (फा.), रात्र, अंधार.
**शबेरोज** (फा.) रात्रंदिवस एकसारखे.
**शयेर, सयेर** (अ.), महल.
**शर्गस्त** (फा.) मिरवणूक.
**शरीक मसलहत** (अ.), विचारविनिमयांत भागीदार.
**शह** (फा.), धाक, दरारा.
**शागिर्दपेशा** (फा.), घरचाकर
**शाहरस्ता** (फा.), राजमार्ग, हमरस्ता.
**शाहगोश** (फा.) रानमांजर.
**शुका** (अ.), राजाज्ञा, पत्रिका.
**शुतरस्वार** (फा.), उंटावर बसणारा.
**शोदे** (हि.), स्वैर, लुच्चे.
**शोहरत** (अ.), प्रसिद्धी, कीर्ति.

## स

**सचणी (स.)**, जमवाजमव ; गवत, गोवऱ्या, कवळ वगैरे गोळा करण्याची खोताकडून सुरवात.

**सदरहू (फा.)**, उपरिनिर्दिष्ट.

**सरफराजी (फा.)**, मानात बढती. "ऊर्जितं स्यात् सर्फराजी (रा. व्य. को.).

**सरंजाम (फा.)**, साधना, सामुग्री, निकाल. "सारंजामी नाम बुधा अनुकूल प्रचक्षते" (रा. व्य. को.)

**सरबराई (फा.)**, कृति, तरतूद, पाहुणचार.

**सरबराह (फा.)**, प्रवासखर्च, व्यवस्थित, पुरे.

**सलाह (अ.)**, मत, उपदेश.

**सलूक, सळूक (अ.)**, सलोखा, सख्य.

**सवदागीर (फा.)**, व्यापारी.

**सिकस्त (फा.)** पराजय.

**सिकारखाना (फा.)**, रानटी पशुपक्षी ठेवण्याची जागा.

**सिबंदी (फा.)**, किल्ल्यातील फौज.

**सिरंगी**, तीन रंगाचे, बहुरंगाचे.

**सिल्यावर (अ.)**, प्रतिष्ठेप्रमाणे.

**सिलका (फा.)**, सरबत्ती, फैरा

**सिलसिला (अ.)**, मामला, सूत्र, राग, ओळ संबंध, परंपरा, वहिवाट.

**सिलेदार (अ.)**, हत्यार बाळगणारा, बहुमानाची पदवी.

**सुतरस्वार**, 'शुतरस्वार' पहा.

**सुभेपटी (फा.)**, सुभ्यातील धर्मकृत्याकरिता जमावंदीची यादी, खर्ड

**सुरखरोई (फा.)**, बहुमान, सुटका.

## ह

**हंगाम करणे (फा.)** धुमाकूळ घालणे.

**हमराह (फा.)**, सगती, बरोबर, सामील.

**हमराही (फा.)**, बरोबरीचा, प्रवासातील मित्र.

**हमसिरा (फा.)**, बहीण.

**हरकत मकान (फा.)**, राहण्याची जागा बदलणे.

**हरकारे (फा.)**, जासूद, टेहळे, पडेल ते काम करणारे.

**हर दु शाखस (फा.)**, दोघांपैकी प्रत्येकजण.

**हरारत (अ.)**, उष्णता, ज्वर

**हवेली (फा.)**, राजवाडा घर, प्रासाद

**हुताशणी (स)**, होळी

**हुनेर (फा.)**, कौशल्य, युक्ती.

**हुरमत (अ.)**, स्वाभिमान, दर्जा

**हौसला (अ.)**, कर्तृत्व, शक्ती, हेतू.

# सूची

## व्यक्तिनिर्देश

**प**



**फ**



**ब**

भ

ल



व

---

# स्थलनिर्देश